श्रीसयाजी-साहित्य-ग्रंथमाला-अंक १९२

ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळीच्या नवीन योजनेंपैकीं

श्रीसयाजी-साहित्य-मालेंतील पुष्प २ रें.

# पाश्चात्य-तत्त्वज्ञान.

पुष्प १ लें

ग्रीक आद्यतत्त्वज्ञ थेल्स व त्याचे शिष्य.

पुष्प २ रें

# सॉक्रेटिस.

लेखक

कै. प्रोफेसर दत्तात्रेय गोविंद केतकर, एम्. ए.

दुय्यम संस्कृत अध्यापक, बडोदा कॉलेज.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी

नं. ३८०, ठाकुरद्वार, मुंबई नं. २

सन १९३१ इ.

किंमत १॥। रुपये.

सकलगुणैश्वर्यमंडित, साहित्यप्रेमी, विद्याभिलाषी,

गुर्जराधिपति



श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड

सेनाखासखेल. समशेर बहादूर-राज्य बडोदें.

श्री

# विज्ञापना

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें विद्याभिलाषि श्रीमंत सरकार महाराज साहेब श्री. सयाजीराव गायकवाड, सेनाखासखेल समशेर बहाद्दर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. इ., एलएल. डी.; यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून " श्री सयाजी–साहित्य–मालेंतून " विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

तदनुसार " पाश्चात्य–तत्त्वज्ञानमाला " या नांवाचा हा ग्रंथ कै. दत्तात्रेय गोमिंद केतकर एम्. ए., दुय्यम संस्कृत अध्यापक बडोदा कॉलेज, बडोदें, यांजकडून तैयार करून उक्त मालेंतील शिक्षणगुच्छांत १९२ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

| भाषांतर शाखा, विद्याधिकारी कचेरी बडोदें, ता., ५–४–३१ | मं. र. मजमुदार भा० मदतनीस. | भा. का. भाटे, विद्याधिकारी, राज्य बडोदें. |
|---|---|---|

# प्रकाशकाचे दोन शब्द.



विद्याभिलाषि श्रीमंत महाराज सयाजीराव गायगवाड सेनाखासखेल समशेरबहादर यांच्या इच्छेस अनुसरून बडोदें राज्याच्या कौन्सीलनें ता. ५ जानेवारी सन १९३१ रोजीं केलेल्या ठरावान्वयें बडोदें राज्याचे मेहेरबान विद्याधिकारी साहेब यांनीं श्रीसयाजी साहित्यमालेपैकीं मराठी साहित्य प्रकाशनाचें कार्य आमच्या मंडळीकडे सोंपविलें आहे, वगैरे हकीकत 'बालक—त्याची प्रकृति व संवर्धन' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सविस्तर कळविली आहेच. अर्थात् त्या हकीकतीचा येथें पुनुरुच्चार करण्याची आतां आवश्यकता नाहीं.

श्रीसयाजी—साहित्यमालेंत तयार असलेल्या १३ हस्तलिखित ग्रंथांपैकीं, पहिला ग्रंथ—कै. वासुदेव गोविंद आपटे कृत—'बालक—त्याची प्रकृति व संवर्धन' दोन महिन्यापूर्वींच वाचकांच्या सेवेंत आम्हीं सादर केला आहे, आणि आज हा दुसरा ग्रंथ सादर करीत आहोंत. पहिल्या ग्रंथांत बालकाची प्रकृति आणि त्याच्या उपजत बुद्धीचें संवर्धन कसें करावें, यासंबंधानें साधार व सोपपत्तिक विवेचन केलें आहे, त्यामुळें प्रत्येक कुटुंबवत्सल गृहस्थांस तें पुस्तक विशेष उपयोगीं असें झालें आहे, हें वेगळें सांगावयास नको. हल्लींचें हें पुस्तक तत्त्वज्ञान प्रतिपादनपर आहे. तत्त्वज्ञान हा विषय विशेष प्रौढ असून त्यांत मानवीजीवाचें श्रेष्ठतम कर्तव्य दर्शविलें आहे. तत्त्वज्ञानावर आमच्या आर्यऋषींनीं फार परिश्रमपूर्वक अनेक ग्रंथ लिहिले आहेत; व त्यांतील तत्त्वें शोपेनहार सारख्या जर्मन पंडितानेंही मान्य केलीं आहेत.

आपल्या आर्यऋषींनीं वेगवेगळ्या प्रसंगीं प्रतिपादन केलेल्या अनेक तत्त्वज्ञानपर ग्रंथांपैकीं उपनिषदें, व ब्रह्मसूत्रभाष्य यांसारखे कित्येक महत्त्वाचे ग्रंथ मराठी वाचकांच्या उपयोगार्थ श्रीमंत महाराजांच्या उदार आश्रयाखालीं भाषांतररूपानें महाराष्ट्र ग्रंथमालेच्या द्वारें पूर्वींच प्रसिद्ध झाले आहेत. तसेंच श्रीमंत महाराजांच्याच आश्रयाखालीं स्थापन झालेल्या आमच्या ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळीनीं—भाष्य व भाषांतरासह सान्वय—सार्थ—सटीक दशोपनिषदें, श्रीमद्भागवत, श्रीमद्भगवद्गीता, योग-वासिष्ठ, पंचदशी इत्यादि ग्रंथांच्या द्वारें आपल्या आर्यऋषींनीं प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानाची ओळख करून दिली आहेच. आज ह्या ग्रंथाच्या द्वारें पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांनीं वेगवेगळ्या प्रसंगीं आपलें तत्त्वज्ञान कशाप्रकारें प्रतिपादन केलें आहे त्याची ओळख पटाची म्हणून हा ' पाश्चात्य तत्त्वज्ञान माला ' ग्रंथ वाचकांच्या सेवेंत सादर करण्यांत येत आहे.

हा ग्रंथ बडोदा कॉलेजांतील संस्कृताचे दुय्यम प्रोफेसर कै. श्रीयुत दत्तात्रेय गोविंद केतकर, एम. ए., यांनीं इंग्रजी ग्रंथाधारें तयार केला असून तो श्रीसयाजी साहित्यमालेकरितां नेमलेल्या ग्रंथपरीक्षक मंडळीनीं पसंत केला आहे. आणि श्रीसयाजी साहित्यमालेचा १९२ वा ग्रंथ म्हणून आज प्रसिद्ध करण्यांत येत आहे. या ग्रंथांतील विषयांचे दोन भाग पाडले असून, त्यांस पुष्प पहिलें व पुष्प दुसरें असें म्हटलें आहे. पहिल्या भागांत-ग्रीक आद्यतत्त्वज्ञ थेल्स व त्याचे शिष्य, अॅनॅक्झिमँडर व अॅनॅक्झिमीनस; आणि पायटॅगोरॅस, हिरॅक्लीटस, झेनोफेनस, पारमिनाइड्स, झेनो, मेलीसस, एंपिडोक्लस, अॅनॅक्झगोरस, ल्युसीपस, डिमॉक्रीटस, अशा तेरा तत्त्ववेत्त्यांच्या तत्त्वज्ञानांचें सांगोपांग विवेचन आलें आहे, आणि दुसऱ्या भागांत प्रसिद्ध तत्त्ववेत्ता सॉक्रेटीस यांच्या तत्त्वज्ञानाचा उहापोह त्यांच्या संपूर्ण चारित्र्यासह केल

तत्ववेत्त्यांत सॉक्रेटिसाचें जीवनचरित्र आणि त्याचें तत्त्वज्ञान अत्यंत श्रेष्ठ मानलें आहे. त्याचें जीवनचरित्र आपणाकडील संतशिरोमणी तुकाराम महाराजांच्या चरित्रासारखें निस्पृह व निस्वार्थि असून लोककल्याणाच्या कामीं त्यानें आपलें जीवितसर्वस्व अर्पण केलें. सॉक्रेटिसाचें तत्त्वज्ञान, त्याची भाषाशैली व वक्तृत्व, त्याच्या उपदेशानें त्याकाळीं लोकांच्या मनावर झालेला परिणाम, संसारांतील त्याचा जीवनक्रम आणि लोककल्याणार्थ त्यानें अर्पण केलेलें सर्वस्व, इत्यादि गोष्टी वाचकांच्या मनावर परिणाम केल्यावाचून राहत नाहींत. सारांश, हा पाश्चात्यतत्त्वज्ञानाचा ग्रंथ तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणाऱ्या जिज्ञासु मराठी वाचकांस तर आदरभूत होईलच, परंतु सर्वसाधारण वाचकांसहि तो मनोरंजक व बोधपर होईल यांत संशय नाहीं. आमचे महाराष्ट्रभाषाभिमानी प्रेमळ वाचक, श्रीमंत महाराज गायकवाड सरकार यांनीं श्रीसाहित्यमालारूप लावलेल्या या वृक्षांपासून उत्पन्न होणाऱ्या मनोहर ग्रंथरूपीं पुष्पांचा व फलांचा यथेच्छ उपभोग घेऊन मालाकार श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांच्या इच्छेचें चीज करतील अशी आम्हांस उमेद आहे.

| मुंबई, ता. ५ एप्रिल, | दा. सां. यंदे, |
|---|---|
| सन १९३१. | व्यवस्थापक, ग्रंथसंपादक व प्रकाशक मंडळी. |

# अर्पणपत्र

श्रीमान् महात्मा मोहनदास गांधी

यांस

त्यांचे ठायीं वसत असलेली श्रेष्ठतम तत्त्वज्ञानदृष्टि

त्यांनीं स्वीकारलेलें अहिंसात्मक ध्येय

त्यांचें निःस्वार्थ राष्ट्रप्रेम

आणि

त्यांचे ठायीं वसत असलेली अपूर्व आत्मनिष्ठा

इत्यादि गुणांच्या अभिनंदनार्थ हा पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा ग्रंथ

प्रकाशकाकडून

प्रेम व आदरपूर्वक

त्यांचे चरणीं अर्पण करण्यांत येत आहे.

प्रकाशक

श्रीमान् महात्मा मनमोहनदास गांधी




यांस प्रेमपूर्वक समर्पण.

# अनुक्रमणिका.

## पाश्चात्यतत्त्वज्ञान–पुष्प १ लें.

## थेल्स व त्याचे शिष्य

## पाश्चात्यतत्त्वज्ञान – पुष्प दुसरें

# सॉक्रेटिस

# पाश्चात्य-तत्त्वज्ञानमाला

## पुष्प १ लें.

## ग्रीक-आद्यतत्त्वज्ञ

## प्रकरण १ लें

### ग्रीसमधील आद्यतम तत्त्वज्ञ थेल्स व त्याचे शिष्य.

### थेल्स.

ग्रीसमधील सर्वांत प्राचीन तत्त्वज्ञ म्हणजे आयलीशिया येथील थेल्स हा आहे. सोलोन वगैरे जे एकंदर सात शहाणे पुरुष प्रसिद्ध आहेत त्यामध्येंच थेल्सचीही गणना होते. परंतु या ज्ञानीपुरुषांहून थेल्सची योग्यता तत्त्वज्ञानदृष्ट्या अधीक समजली पाहिजे. हे पुरुष ज्ञानी व शहाणे म्हणून प्रसिद्ध असले तरी त्यांचें ज्ञान केवळ व्यावहारिक असे, व त्यांचीं शहाणपणाचीं भाषणें म्हणजे उपदेशपर सूत्ररूप वाक्यें होत. 'आपल्या स्वतःला ओळख,' 'आलेली संधी दवडूं नकोस,' 'विश्वस्तपणा हा नाशाचा पूर्वगामी आहे;' इत्यादिक सुप्रसिद्ध सूत्रवाक्यांवरून या शहाण्या पुरुषांचें शहाणपण कशा प्रकारचें असे, हें लक्षांत येईल. मनुष्याला नित्य व्यवहारांत ज्या विचारांची आवश्यकता असते ते विचार अल्प शब्दांत ग्रथित करण्यांतच त्यांचें काय तें कसब, व मनुष्याला त्याच्या व्यवहारांत निपुण करणें हाच त्यांचा हेतु. ते स्वतः लोकव्यवहारांतील जबाबदारीचीं कामें पहाणारेच होते. सोलोन हा स्पार्टाचा

राजा होता; व क्लिओब्यूलस आणि पेरिअँडर हेही आपआपल्या शहरांतील सत्ताधारी होते. त्यांपैकीं थेल्स हाच अधिक महत्वाचा व तत्त्वज्ञ या संज्ञेला पात्र होय.

एशिया मायनरच्या पश्चिमेकडे ज्या कित्येक ग्रीक वसाहती होत्या त्या सर्वांस आयोनिया म्हणत, व त्यांमध्येंच मायलीटस या नांवाचें एक शहर आहे; तें क्रीटच्या लोकांनीं वसविलें होतें. याच शहरीं थेल्सचा जन्म खि. पू. ६४० वर्षीं झाला व तो खि. पू. ५४८–४५ च्या सुमारास मरण पावला.

थेल्सविषयीं आपणांस फार थोडी माहिती मिळते. त्याचा कोणताही लिखित ग्रंथ नसल्यामुळें त्याजबद्दल इतरांनीं जे उल्लेख केले आहेत त्यांजवर आपणास अवलंबून रहावें लागतें. त्याजविषयीं कित्येक दंतकथा उपलब्ध आहेत, त्यांवरून आपणांस त्याची विद्वत्ता व चातुर्य यांचें अनुमान करतां येतें. त्यावेळच्या भौतिकशास्त्रवेत्त्यांमध्यें थेल्सचा फार वर नंबर लागत असून तो मोठा शोधक होता; व हा त्याचा शोधकपणाच त्याला तत्त्वज्ञ करण्यास कारण झाला असला पाहिजे. इसापनीतींतील ताऱ्यांचें निरीक्षण करण्याच्या नादांत विहिरींत पडणाऱ्या पंडिताची गोष्ट याच थेल्सविषयीं आहे असें म्हणतात; व त्यावरून त्याची व्यवहारज्ञानविमुखता दाखविण्यांत येते. उलटपक्षीं आपल्या उच्च ज्ञानाचा तो व्यवहारांत कसा फायदा करून घेत असे याबद्दलही अशी गोष्ट प्रसिद्ध आहे कीं, पुढें हिंगणबेटांचा दुष्काळ पडेल हें त्याला आधींच कळलें असल्यामुळें त्यानें अगोदरच खूप हिंगणबेटें साठवून ठेविलीं; व त्यामुळें त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही तेलाचा व्यापार करतां आला नाहीं. अर्थात् त्याला पुष्कळ पैसा मिळाला व या रीतीनें त्यानें आपणास श्रीमंत होण्याची विद्या अवगत आहे हें एकवार जगाच्या निदर्शनास आणून दिलें.

याशिवाय इतर कांहीं दंतकथांवरून त्याची विद्वत्ता दिसून येते. हिरोडोटसनें आपल्या इतिहासांत अशी हकीगत दिली आहे कीं, खि. पू. ५८५ वर्षीं मे महिन्याच्या २८ तारखेस जें सूर्यग्रहण झालें, तें थेल्सनें अगोदरच वर्तवून ठेविलें होतें. याच ग्रहणप्रसंगीं लिडिआ व मिडिया येथील सैन्यें परस्परांशी लढाई करण्यासाठीं सिद्ध झालीं असतां, आकाशामध्यें एकदम सूर्य काळा ठिक्कर पडलेला पाहून, हा आपल्या अघोर कृत्याच्या कोपामुळें ईश्वरानें घडवून आणलेला उत्पात आहे, असें वाटून तीं भयचकित झालीं, व तशींच परत फिरलीं असें म्हणतात. या गोष्टीवरून थेल्सचें खगोलविज्ञान चांगलें दिसून येतें. पृथ्वीच्या वर्तुळाकृतीचे वगैरे शोध त्याला लागले नव्हते, हें त्याच्या मतांवरून उघडच आहे. परंतु ईजिप्त व बाबिलोन येथील पद्धतीप्रमाणें त्याला ग्रहणें वगैरे वर्तवितां येत असावीं असें वाटतें. त्यावेळीं ईजिप्त व बाबिलोन यांचा ग्रीक वसाहतींशीं पुष्कळच संबंध असल्यामुळें हें सर्वथा शक्यच आहे. कदाचित् बाबिलोनला न जातां लिडियामधील विद्वानांकडूनही त्यानें ही विद्या प्राप्त करून घेतली असेल; परंतु त्याच्या इतकें यश त्यावेळेपर्यंत कोणाला आलें नव्हतें असें दिसतें. भौतिकशास्त्राभिज्ञतेबद्दल थेल्सची येवढी ख्याति होती कीं, खुद्द लिडियाचा राजा क्रोसस याच्या दरबारांत त्याची नेमणूक झाली होती, व त्या राजाच्या विनाशाला कारण झालेल्या कॅपॅडोशियाच्या मोहिमेंत तो हजर होता; व त्यानेंच त्या राजाकरितां हॅलिस नदीचा प्रवाह फिरविला, असें हिरोडोटसनें लिहिलें आहे. पारसीकांच्या जुलमांतून आयोनियाची मुक्तता व्हावी, या हेतूनें टिऑसच्या नेतृत्वाखालीं सर्व शहरांचा संघ घडवून आणण्याविषयीं त्यानें पुष्कळ खटपट केली, परंतु ती व्यर्थ गेली.

याशिवाय थेल्सची गणितज्ञ या नात्यानेंही प्रसिद्धी आहे. ॲरिस्टॉटलचा शिष्य युडीमस ( Eudemos ) यानें जो गणिताचा इतिहास लिहिला आहे, त्यामध्यें असा उल्लेख आहे कीं, थेल्सनें प्रथम भूमिति-

—विज्ञान ग्रीस देशांत आणलें. इजिप्त देशांमध्यें असतांना त्यानें तेथील लोकांची भू-मापनपद्धति पाहिली असेल; परंतु थेल्सला ही विद्या इजिप्त मधून मिळाली असें गृहीत धरलें तरी त्यानें त्या शास्त्रांत घडवून आणलेली प्रगति आश्चर्यकारक व स्तुतीस पात्र आहे. इजिप्त देशांमध्यें पिरामिड नांवाचे जे त्रिकोणाकार मनोरे आहेत त्यांची सावली मोजून त्यांची उंची कशी काढावी, व समुद्रावर दिसणाऱ्या दूरवरच्या जहाजांचें अंतर कसें काढावें, हें त्यानेंच इजिप्तमधील लोकांस शिकविलें. एका त्रिकोणाच्या बाजू जर ३:४:५ या प्रमाणांत असतील तर त्यांत एक काटकोन असतो, येवढेंच त्रिकोणमितीचें ज्ञान इजिप्त, बाबिलोन व इतर प्राच्य राष्ट्रें यांना होतें. थेल्सनें याच मूलभूत ज्ञानावर इतर सिद्धांत बांधले व त्याला शास्त्रीय स्वरूप दिलें. निदान पायथॅगोरॅसच्या काळीं गणितशास्त्राची जी स्थापना झाली, तिचा पाया थेल्सनें स्थापित केला असें म्हटलें पाहिजे.

तत्त्वज्ञानामधील थेल्सची कामगिरी या सर्वांहून अधिक महत्त्वाची आहे. मनुष्य विचार करण्यास पात्र झाल्याबरोबर त्याचा प्रथम विचार ह्या स्थूलसृष्टीविषयी असतो. स्थूलसृष्टी मनुष्याच्या बहिरिंद्रियांना सहज-गत्या गोचर होत असल्यामुळें सूक्ष्म आंतरसृष्टीच्या व सूक्ष्मतम मनः-सृष्टीच्या विवेचनाचे आधीं स्थूल सृष्टीविषयींच मनुष्य विचार करूं लागतो. प्राणाचा संचारक, मनाचा प्रेरक, बुद्धिचा नियामक, यांजविषयीं जिज्ञासा होण्याची देखील मनुष्याची तयारी नसते. त्याच्या आधीं बाह्य-चक्षूंना दिसणारे पर्वत, नद्या, मेघ, वृक्ष, जीव, इत्यादि विषयांतच त्याची मति गुंग होऊन जाते. मेघांचा गडगडाट व विजांचा कडकडाट, मुसळधार पर्जन्य व अप्रतिहत संचारी नद्या, अनाकलनीय दावाग्नी व प्रचंड-ताप सविता, इत्यादिकांविषयींच त्याच्या मनांत प्रथम विचार उत्पन्न होतो. त्यांचें अक्राळविक्राळ स्वरूप पाहून मनुष्य भांबाऊन जातो, त्यांवर आपल्या अनुभवाप्रमाणें निरनिराळे तर्क करतो; व त्या त्या ठिकाणीं विशिष्ट देवतांची स्थापना करतो. आपल्याकडील ऋग्वेदान्तर्गत ऋचा

किंवा दिसिऑड होमर यांचीं काव्यें, यामध्यें वर्णिलेल्या देवता अशा प्रसंगीं निर्माण होतात, व आपल्या भोंवतीं होणाऱ्या आक्रांतापासून आपणास अपाय होऊं नये, झाल्यास फायदाच व्हावा म्हणून या देवतांचें स्तुतिस्तोत्र व यज्ञयाग प्रचारांत येतात. मनुष्याच्या मनाला कांहीं काळपर्यंत या उपपत्तीनें समाधान वाटतें; परंतु लवकरच त्याला आधीं ही सृष्टि झाली तरी कशी, याचेंच आश्चर्य वाटूं लागतें; व सृष्टीच्या विविध भागांवरील अधिष्ठित देवतांचा अगर त्या त्या भागांचा विचार बाजूस पडून सृष्टीच्या कारणाची मीमांसा सुरू होते. इतकी विविध वस्तूंनीं भरलेली सृष्टि कोणी व कशी निर्माण केली; हा प्रश्न सोडविण्याचा मनुष्य प्रत्यत्न करूं लागतो; व त्याची येथवर प्रगती झाली म्हणजे मनुष्यानें खऱ्या तत्त्वज्ञानांत प्रवेश केला असें म्हटलें पाहिजे.

थेल्सच्या वेळेस पाश्चात्यराष्ट्रांतील बुद्धिवान् पुरुषांचा असा प्रयत्न चालू होता, परंतु या प्रश्नाला प्रथम उत्तर सुचविण्याचा मान थेल्सनेंच पटकावला. थेल्सच्या मतें या विविधसृष्टीच्या मुळाशीं जल हें द्रव्य आहे. असें मत ठरविण्यास त्याच्या दृष्टीनें कोणतीं कारणें असावींत हें नक्की सांगतां येत नाहीं; पण थेल्सचा पट्टशिष्य ॲनॅक्झिमीनस याच्या विवेचनावरून आपणास थेल्सच्या विचारक्रमाविषयीं चांगलीच अटकळ बांधता येते. या सृष्टीमध्यें कांहीं पदार्थ द्रवरूप आहेत व कांहीं घनरूप आहेत; परंतु हीं रूपें पाण्याचींच असलीं पाहिजेत. कारण एकच जल शैत्यातिरेकानें पाषाणासारखें कठीण, व साधारणतः द्रवरूप असें असतें. या सृष्टींतील जेवढे म्हणून घन पदार्थ आहेत, तेवढे सर्व गोठलेल्या पाण्याचींच कमजास्त दृढतेमुळें झालेलीं रूपें आहेत. वृक्षलतादिकांत तर सर्व पाण्याचेंच स्वरूप भरलें आहे. कारण पाणी घातलें तर झाडें व वेली वाढतात, व तें अजीबात दूर केल्यास वाळून जळून जातात. यावरून वृक्षलतादिक जलरूप होत हें उघड दिसत आहे. द्रवरूप पदार्थही पाण्यावांचून होत नसल्यामुळें तेही जलरूपच आहेत असें म्हणतां

येईल. ज्याप्रमाणें पाणी अधिकाधिक गोठल्यामुळें याचे कठिण घनरूप पदार्थ झाले, त्याचप्रमाणें त्याची विरळता वाढतां वाढतां त्याचें हवेंत पर्यवसान झालें असलें पाहिजे. थेल्सच्या काळीं व त्यानंतरही कित्येक दिवसपर्यंत हवा म्हणजे बाष्परूप जळच आहे, हा समज प्रचलित होता. धुकें म्हणजे पाणीच नाहीं काय? तेंच धुकें निवळलें म्हणजे हवा होते; मग हवा म्हणजे पाणीच नव्हे काय? हीच हवा आणखी विरळ झाली म्हणजे तिचें निळ्या आकाशांत रूपांतर होतें, व आकाश हें असंख्य तारकादिकांनां प्रकाश देतें, त्याअर्थीं तें अग्निस्वरूप असलें पाहिजे, पण आकाश मुळांत जलकारणक आहे त्याअर्थीं अग्नीचेंही मूळ कारण जलच असलें पाहिजे.

अशा रीतीनें जगतांतील विविधता व घडामोड एका जलतत्त्वावर चाललेली आहे असें दिसतें. या सिद्धांताच्या अनुरोधानेंच थेल्सचें असें मत होतें कीं, पृथ्वि ही एखाद्या सपाट ताटासारखी असून समुद्रावर तरंगत आहे. ग्रीक लोक जलपर्यटनाचे विशेष शोकी असल्यामुळें, सर्व पृथ्वि म्हणजे एक बेट आहे, ही कल्पना त्यांना पसंत पडली असावी.

थेल्सच्या जलकारणवादाशी आपल्याकडील कांहीं वर्णनें जुळतात. ऋग्वेदांतील दहाव्या मंडळाच्या ८२ सूक्तांत या सर्व विश्वाचा जनक व पालक कोण व आपांचा म्हणजे जलाचा पहिला गर्भ कोणता, असा प्रश्न करून विश्वकर्मा हा पाण्याचा गर्भ आहे असें सांगितलें आहे. जल हीच पहिली सृष्टि होती व त्यांतील अंडांतून ब्रह्मदेव निर्माण झाला, असें मनुस्मृतींत वर्णन आहे. तथापि सर्व सृष्टि ही थेल्सच्या मतानें जितकी जलकारणिक दिसते, तितकी आपल्याकडील ग्रंथांमध्यें दिसत नाहीं. उपनिषदांमध्येंही पंचमहाभूतांची एकापासून दुसऱ्याची अशी अनुक्रमशः उत्पत्ति झालेली सांगितली आहे; व त्याप्रमाणें पार्थिव सृष्टीचें जल हें कारण आहे. 'अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्योऽन्नम्। अन्नात्पुरुषः' या तैत्तीरीयोपनिषद्वाक्यांत पुरुषाला

कारण जलच दाखविलें आहे. छांदोग्योपनिषदांतील ६ व्या प्रपाठकाच्या ५ व्या खंडांत रक्त व प्राण हें जलाचेच अनुक्रमानें मध्यम व अणिष्ठ म्हणजे सूक्ष्मतम भाग आहेत असें सांगून **'अन्नमयं हि सोम्य मनः आपोमयः प्राणः तेजोमयी वाक्'** असा सिद्धांत काढला आहे. येथेंच अन्न हेंही जल कारणक आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे मनुष्याचा प्राण व मन, रक्त व मांस, हीं सर्व जलापासूनच उत्पन्न झालीं असें होतें. या मतांतील विचारसरणी थेल्सच्या मतांतील विचारांशी जुळते. निदान त्यांचा मथितार्थ एकच आहे. परंतु थेल्सच्या मतें हवा ही जलाचेंच विरळ स्वरूप, व तेज किंवा निळें आकाश हें विरळतम स्वरूप, व म्हणून हवा व तेज हीं जलकारणक असें आहे. हें आपल्या आद्यतम ग्रंथासही संमत नाहीं. सृष्टिविषयक विवेचनांत प्रत्येक ठिकाणीं आकाशापासून वायू, वायूपासून अग्नि, अग्निपासून जल, व जलापासून पृथ्वि, असाच क्रम आढळतो.

थेल्सचा जलकारणवाद त्याच्याच बुद्धीला प्रथमतः गोचर झाला, किंवा तो त्याला अधिक प्राचीन ज्ञानी पुरुषांकडून समजला, हा वादग्रस्त प्रश्न आहे. त्यावेळच्या राष्ट्रांपैकीं उच्च शास्त्रीय ज्ञान किंवा तत्त्वविचार यांमध्यें ज्यांची बरीच प्रगती झाली होती अशीं राष्ट्रें युरोपखंडांत तर मुळींच नव्हतीं; व प्राच्य राष्ट्रांपैकीं इजिप्त व बाबिलोन यांमध्यें जरी अशा गोष्टींचा पुष्कळ विचार केलेला आढळतो, तरी तो थेल्सच्या शास्त्रज्ञानाला अगर तत्त्वविचाराला कारण झाला असें म्हणतां येत नाहीं. थेल्सचे भूमिति, त्रिकोणमिति, इत्यादिकांतील सिद्धांत त्यापेक्षां अधिक परिणत असल्यामुळें ईजिप्त व बाबिलोन यांमधील शास्त्रज्ञांचा व थेल्सचा समागम झाला असल्यास त्यापासून थेल्सला केवळ उपयुक्त सूचना मात्र मिळाली असेल असें अनुमान होतें. प्राच्य राष्ट्रांमध्यें ग्रीसच्या बरोबरीची किंवा त्याहूनही वरचढ, व तितकीच किंवा त्याहूनही पुरातन, अशी संस्कृति किंवा शास्त्रज्ञान म्हणजे हिंदुस्थानचेंच होय. आतां

हिंदुस्थानचा आणि ग्रीसचा कोठें कोठें संबंध असला पाहिजे हें अगदीं निःसंशय रीतीनें सांगतां येत नाहीं; तथापि अगदीं प्राचीन ग्रंथ विभागांतूनही ज्या अर्थी पंचभूतात्मक सृष्टीची रचना आढळते, त्याअर्थी थेल्सची उपपत्ती व आर्यतत्त्वज्ञान यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नसावा असें वाटतें.

थेल्सची उपपत्ती तत्वज्ञानदृष्ट्या आक्षेपरहित किंवा परिणत स्वरूपाची नाहीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. थेल्सच्या विचारांचें मुख्य महत्त्व म्हणजे त्यानें तत्त्वज्ञानाला सुरवात केली हें आहे. सृष्टीचें कोडें उलगडावयाचें असल्यास पौराणिक कथांवरून तें साधणार नाहीं; तर त्याला पायाशुद्ध अशी शास्त्ररचनाच पाहिजे. देवांचे पौराणिक मातापितर आणि थेटिस व ओशिआनस यांचें पौराणिक स्वरूप झुगारून देऊन त्यांचें जलमय शुद्ध स्वरूप पुढें मांडण्याचें धारिष्ट थेल्सनें केलें, हाच त्याचा मोठेपणा होय. या जगताचें आदिकारण काय, हा प्रश्न विचारण्यांतच त्याच्या तत्त्वज्ञानाची स्फूर्ति दिसून आली, व ह्याच प्रश्नाचें उत्तर हुडकून काढणें हा तत्त्वज्ञानाचा हेतू असल्यामुळें, थेल्सला युरोपमधील आद्यतम तत्त्वज्ञ हें नांव मिळालें.

जगताचें आदिकारण जर एक, तर वस्तूंमध्यें वास्तविक भेद नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. बरें, भेद नाहीं म्हणावा तर जल हें आदिकारण कशाचें? जल हें जलाचेंच तर कारण नाहीं? याप्रमाणें या एकत्त्वाची व भिन्नत्वाची सांगड घालणें, मोठें कठीण पडतें. यापैकीं हिरॅक्लिटसनें भेदपक्ष स्विकारला व पारमिनाइडसनें ऐक्यपक्ष स्विकारला. त्यांच्या मतांचें विवेचन पुढें करावयाचेंच आहे. सध्यां थेल्सच्या शिष्यवर्गासंबंधीं असलेली कांहीं माहिती नमूद करून हें प्रकरण आटपूं.

---

*

# ॲनॅक्झिमँडर.

ॲनॅक्झिमँडर हा थेल्सच्या शिष्यांतील सर्वांत प्रमुख होय. याच्या मतांविषयीं आपणास अधिक विश्वसनीय माहिती मिळते. कारण यानें स्वतः एक ग्रंथ लिहिलेला होता व तो पुष्कळ जुन्या लेखकांचा परिचित असल्याचें आढळून येतें; व त्यांनीं दिलेल्या उताऱ्यांवरून मूळ-ग्रंथाची बरीच चांगली कल्पना होते. या ग्रंथाविषयीं आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती अशी कीं, ग्रीकभाषेमधील हाच पहिला गद्यग्रंथ होय. ॲनॅक्झिमँडरचा जन्म खुद्द मायलीटस येथेंच ख्रि. पू. ६११–६१० च्या सुमारास झाला. त्याच्या बापाचें नांव प्रॅक्झीॲडिस असें होतें. याचीं कित्येक मतें थेल्सहून भिन्न होतीं, परंतु त्याला थेल्सच्या शिष्य-वर्गांतच घालतात. याचें कारण तो थेल्सचा मित्र असून त्याचें शिष्यत्व कबूल करी हें होय.

ॲनॅक्झिमँडरची प्रसिद्धी होण्यास त्याच्या मतांपेक्षां त्याचे शास्त्रीय शोध अधिक कारण झालें असावें. एक वर्तुलाकार ताटली घेऊन त्याच्या मध्यभागीं उभ्या केलेल्या लहानशा काठीच्या सावलीवरून वेळ समजण्याचें ( Sun-dial ) छाया-यंत्र नांवाचें घड्याळ यानेंच शोधून काढलें म्हणून म्हणतात. याशिवाय एक घनगोल तयार करून सूर्याच्या कक्षेचा तिरपेपणा यानेंच सिद्ध केला अशी प्रसिद्धी आहे. हे दोन शोध खरोखरच ॲनॅक्झिमँडरचें आहेत किंवा नाहींत याबद्दल संशय आहे; परंतु त्याजविषयींच्या खालील प्रसिद्धीस मात्र सर्वमान्यता आहे. अगदी पहिला भूगोलविषयक स्फुट ग्रंथ यानेंच रचिला. त्यावेळच्या ॲनॅक्झिमँड-रला माहित असलेल्या भूभागांविषयीं यांत माहिती दिली होती. ॲनॅ-क्झिमँडरनें केवळ भूगोलच रचला नाहीं, तर त्याच्या माहितीच्या आधा-रावर त्यानें एक नकाशा तयार केला, व युरोपखंडांतील तोच पहिला नकाशा आहे. हा नकाशा प्रथमतः पितळी पत्र्यावर खोदलेला असावा

व त्यानें अज्ञ व असंस्कृत जनांना तर चकित करून सोडलेंच असेल; परंतु विद्वानांच्या मनांतही मोठें कौतुक उत्पन्न करून त्यांच्या जिज्ञासु मनांत ज्ञानाची मोठीच भर टाकली असेल यांत कांहीं संशय नाहीं. ग्रीक लोकांच्या भूगोलशास्त्रप्रणेत्याचा मान याप्रमाणें ॲनॅक्झिमँडर याजकडेच येतो; आणि ही एक गोष्ट देखील कांहीं कमी महत्त्वाची नाहीं.

विश्वाच्या उत्पत्तीविषयीं ॲनॅक्झिमँडर याचें असें मत होतें कीं, त्याला मूळ कारण पाणी, अग्नी, किंवा हवा हें एकच द्रव्य आहे असें मानण्याची कांहीं जरूर नाहीं. जेथून जग निर्माण झालें व जेथें तें अखेर जाऊन मिळतें तें कांहीं-तरी 'अनंत' ' अव्यक्त ' अशाच शब्दांनीं दर्शविलें पाहिजे. असें म्हण-ण्याचें कारणही स्पष्टच आहे. ॲनॅक्झिमँडर म्हणतो कीं, या जगांत आपणास शीत व उष्ण, क्लिन्न व शुष्क, मृदु व कठोर, अशा पर-स्परविरोधी व द्वंद्वात्मक वस्तू आढळतात. या वरून त्याची मूळची अवस्था म्हणजे या द्वंद्वांविरहित व त्या द्वंद्वांपैकीं कोणत्याही एकानें अनिर्दिष्ट अशीच असली पाहिजे, आणि जगतांतील सर्वच वस्तू व त्यांचीं नांवें द्वंद्वात्मक असल्यामुळें या वस्तूला अव्यक्त किंवा अनिर्वाच्य असेंच म्हटलें पाहिजे. या ठिकाणीं आपणांस सांख्यमताची अगर वेदांतमताची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. अव्यक्त, अनिर्वाच्य, अनंत, हे शब्द वापरतां वापरतांच तीं मतें मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभीं राहतात. परंतु ॲनॅक्झिमँडरच्या मतांत त्यांचा स्पष्टपणा व त्यांचें उच्चत्व हीं अद्याप आलेलीं नाहींत. इतक्या पुरातनकाळीं स्पष्ट वा अस्पष्ट पण त्याला एवढी मोठी गोष्ट प्रतीत झाली हें कमी आश्चर्य आहे काय ? त्यावेळेस हें मत परिणत होऊन त्याला वेदांत–मताची तोड आली नाहीं ही निराळी गोष्ट आहे. ॲनॅक्झिमँडरच्या मतें थेल्सची अशी चूक झाली कीं, विश्वाच्या उभारणीची जलोपपत्ती देतांना त्यानें एका क्लिन्नत्वपक्षाची अधिक तरफदारी केली, व हा शुष्कपक्षाचा अन्याय झाला.

विश्वाचें मूळकारण शुष्क नाहीं व क्लिन्न नाहीं, मृदु नाहीं व कठोर नाहीं, शीत नाहीं व उष्णही नाहीं; तर मग तें अभावात्मकच असेल अशी कोणी कल्पना केल्यास ती चुकीची होईल. त्या अव्यक्तांतून ही सृष्टी उत्पन्न झाली व ही विश्वोत्पादनशक्तीच अव्यक्त हें वस्त्वभावाहून निराळें आहे असें दाखवितें.

सृष्टीची उत्पत्ति म्हणजे या अव्यक्तांतील द्वंद्वांचा आविर्भाव असें म्हणतां येईल. ॲनॅक्झिमँडरच्या मतें निरनिराळ्या वस्तू आपापलें घोडें पुढें ढकलून प्रथमतः अन्याय करतात, व मग त्याची नुकसान-भरपाई करून देतात; व अशा रीतीनें पुनरपि आपल्या मूळ अवस्थेला जातात. याचें एक उदाहरण असें घेतां येईल कीं, अग्नी पाण्याच्या शीतलत्वावर चढाई करतो, पण असें करण्यांत त्याची उष्णता कमी होते; व याच क्रिया सारख्या चालू राहिल्या तर थोड्या वेळानें पाणी व अग्नी दोन्हीही नाहिशीं होतात, व सभोंवार पसरलेल्या अव्यक्त अमृतांत मिळून जातात. ( Immortal and indestructible surrounds all and directs all. To that, they return when they are destroyed of necessity, for, they suffer punishment and give satisfaction to one another for injustice.–( Anaximandr quoted by Aristotle. ) ॲनॅक्झिमँडरच्या मतें आपल्या भोंवतीं ज्या तत्वांचा गराडा आहे, त्या गराड्यामुळें अशा अनंत सृष्टी प्रतिक्षणीं निर्माण होतात व प्रतिक्षणीं विलय पावतात; व म्हणून हें विश्व अनंत सृष्टिरूपी वेगवेगळ्या बुडबुड्यांनीं भरलें आहे, असें तो म्हणे; व याच बुडबुड्यांनां तो 'देव' ही संज्ञा लावी.

भूगोलाच्या रचनेविषयीं, व खगोलांतील चमत्कारांबद्दल, ॲनॅक्झिमँडरचीं मतें मोठीं मजेदार आहेत, व त्यांमध्यें शास्त्रीय बुद्धि व अपरिणत उपपत्ति यांची मोठी चमत्कारिक मेसळ झाली आहे. त्याच्यामतें पृथ्वीला

आधार कोणाचा नसून ती पोकळीत झोंकें खात आहे. कारण अमुक एका बाजूलाच भिरकले जाण्यास तिला कांहीं कारणच नाहीं. थेल्सच्या मतें पृथ्वी ही एखाद्या ताटाच्या आकाराची होती. ॲनॅक्झिमँडरच्या मतें ती एखाद्या वरवंट्याच्या अगर मृदंगाच्या आकाराची आहे. आपण तिच्या वरच्या भागावर राहतो, पण आपल्या खालीं राहणारे दुसरेही लोक आहेत असें त्याचें मत होतें. यांनाच Antipodals किंवा परस्पराभिमुखपादलोक अशी संज्ञा लावतात.

खगोलविज्ञानविषयक मतांत तर याहीपेक्षां अधिक चमत्कारिकपणा आढळतो. थेल्सच्या मतें पृथ्वी स्थिर असे इतकेंच, परंतु ग्रहणें, चंद्राची गति, क्रांतिवृत्त, इत्यादिकांविषयींच्या त्याच्या कल्पना साधारण आजच्या कल्पनांशी मिळत्याच येणाऱ्या आहेत; परंतु ॲनक्झिमँडरचीं एतद्विषयक मतें म्हणजे विशृंखळ कल्पनाशक्तीचे अचाट खेळ आहेत. त्याच्या मतें पृथ्वीभोंवतीं असलेल्या वातावरणाच्या सभोंवार अग्नी पसरलेला आहे. वातावरणांत जेथें जेथें भोकें पडलीं आहेत, तेथें तेथें त्यापलीकडील जाळ आपणास दिसतो; व आपण त्यांना तारे, सूर्य, चंद्र, इत्यादिक नांवें ठेवतों. या छिद्रांची रचना अळगुजाच्या अगर मुरलीच्या छिद्रांसारखी किंवा भात्याच्या तोंडासारखी असते, व त्यांतून आपणास पलीकडील उजेड दिसतो. ज्या वेळेस हीं छिद्रें बंद केलीं जातात त्या वेळेला ग्रहणें लागतात. सूर्याची कक्षा चंद्राच्या सत्तावीस पट मोठी आहे. सर्वांत उंच सूर्याची कक्षा, त्याचे खालीं चंद्राची, त्याच्या खालीं ताऱ्यांची, अशी व्यवस्था आहे. चंद्राचा आकार पृथ्वीच्या एकोणीसपट मोठा आहे. त्याचा आकार व रचना एखाद्या पोकळ चाकासारखी असून तो गरगर फिरत आहे, व त्याच्या मध्यभागीं जाळ आहे; परंतु या जाळाला बाहेर जाण्यास एकच द्वार आहे; व हें द्वार बंद झालें ह्मणजे चंद्रग्रहण होतें. चंद्राचें चक्र आपणास ज्या छिद्रांतून दिसतें, त्यांतील

कांहीं छिद्रें बंद झालीं म्हणजे चंद्राचें अर्धवतुळ किंवा कोर होते. यावरून चंद्राचा प्रकाश उसना नाहीं हें दिसून येतें.

सूर्याच्या उन्हामुळें पाण्याची वाफ होते, व या वाफेच्या विरळ थरांत गती उत्पन्न होऊन वारा होतो. या वाफेमुळेंच पृथ्वीवर ओलावा येतो, व या वाफेंतून होणारा वाराच एखाद्या मेघावर आदळला म्हणजे वीज निघते. फार काय, मनुष्येतर प्राण्यांची उत्पत्ती देखील या वाफेंतूनच झाली.

मनुष्याची उत्पत्ति मात्र दुसऱ्या प्राण्यापासून झाली आणि हा प्राणी मासाच असावा, असा ॲनॅक्झिमँडरचा तर्क होता. स्पेन्सरच्या उत्क्रांतिवादांतील मूळ पायरी आपणास येथें आठवल्यावाचून रहात नाहीं. असा तर्क बसविण्यास ॲनॅक्झिमँडरनें जें कारण दिलें आहे तेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तो म्हणतो कीं, इतर प्राण्यांमध्यें पिलांची येवढी काळजी घ्यावी लागत नाहीं; परंतु मनुष्य प्राण्यांत मात्र मुलांची जोपासना फार दिवस करावी लागते. सृष्टीच्या मुळापासून ही जोपासना अवश्य असती तर मनुष्यप्राणी इतके दिवस जगलाच नसता; व ज्याअर्थी तो जगला, त्याअर्थीं येवढी अवाढव्य जोपासना जेथें अनवश्यक होती अशा ठिकाणींच त्याचें मूळ असलें पाहिजे; व हें मूळ सुटल्यावर हें शिशुसंगोपनाचें घोंगडें मनुष्याच्या गळ्यांत पडलें असावें.

एकंदरींत पहातां ॲनॅक्झिमँडरचीं मतें आज कितीही चमत्कारिक वाटलीं तरी तो मोठा शोधक, कल्पक व हुशार असून थेल्सचा शिष्यप्रणी शोभण्यासारखा होता, यांत कांहीं संशय नाहीं. थेल्सचा जलकारणवाद सोडून त्यानें अव्यक्त-कारण-वाद पुढें आणला खरा; पण त्याचाच एक शिष्य ॲनॅक्झिमीनस यानें जलकारणवादच पुनः जोरानें प्रतिपादन केला.

# ॲनॅक्झिमीनस.

ॲनाक्झिमीनसचा जन्म खि. पू. ५२८–५२४ या सुमारास झाला असावा असें अपोलेडोरसच्या म्हणण्यावरून दिसतें. तो ॲनॅक्झिमँडरच मित्र आणि शिष्य होता; व अयोनियावर पारसीकांचा अंमल सुरू होण्याच्या सुमारास तो वयांत आलेला असावा. त्यानेंही कांहीं गद्यग्रंथ लिहिले असावे असें अनुमान काढण्यास जागा आहे. कारण त्याच्या नांवावर चालत आलेला एक ग्रंथापशेष गद्यरूपच आहे. ॲनॅक्झिमीनसची बुद्धी ॲनॅक्झिमँडरच्या बुद्धीइतकी तीव्र किंवा कल्पक दिसत नाहीं; तथापि त्याच्या उपपत्तीला जें महत्त्व आलें आहे, तें एका तत्त्वाच्या सुचनेमुळें होय. हें तत्त्व म्हटलें म्हणजे आकुंचन व प्रसरण होय. या तत्त्वांवरच मायलीटच्या तत्त्वज्ञांच्या मताची संगती लावतां आली. आपण श्वासोच्छ्वास करतांनां जी हवा आंत घेतो ती, व धुकें, दव, किंवा पाणी, या रूपानें दिसणारी हवाच जगताचें मूळकारण आहे, असें तो प्रतिपादन करी; व हें प्रतिपादन थेल्सच्या मतांशीं अधिक जुळतें येतें. कारण पाणी हाच पदार्थ विरळ झाला म्हणजे हवा होते व आंकुचन पावला म्हणजे पृथ्वी होते, हा जो थेल्सच्या मतांतील इत्यर्थ तो ॲनॅक्झिमीनसनें या स्वरूपांत जोरानें पुढें मांडला. उलटपक्षी, हवा ही निर्मर्याद असून त्यामध्यें अनंत सृष्टी आहेत, असें त्याचें मत ॲनॅक्झिमँडरच्या मताशीं अधिक मिळतें. याशिवाय ॲनॅक्झिमीनसच्या मतांतील विशेष गुण म्हटला म्हणजे त्यानें प्रथमतः ‘ पिंडब्रह्मांड ’ या नांवानें आपल्या शास्त्रांत प्रसिद्ध असलेला न्याय सुचविला, हा आहे. तो म्हणतो कीं, ज्याप्रमाणें आपला वायुरूप आत्मा—त्याच्या मतें आत्मा वायुरूप होता—आपलें शरीर धारण करतो, त्याप्रमाणेंच सर्व सृष्टीचें शरीर धारण करण्याचें काम, त्याच्या आत्मस्थानीं असणारा वायूच करीत असला पाहिजे. आपण ज्याप्रमाणें आपल्या भोंवतालची हवा श्वासद्वारें

आंत घेतों, त्याप्रमाणें सृष्टीही आपल्या भोंवतीं पसरलेल्या निर्मर्याद वायूं-तून श्वासोच्छ्वासानें वायू ओढून घेते असा त्याचा तर्क होता. यावरून 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' हा न्याय तर निष्पन्न होतोच; पण ॲनॉक्झिमीनसची जीवात्मस्वरूपाची ओळख श्वासोच्छ्वासापर्यंत येऊन पोंचली होती ही देखील कांहीं लहानसहान गोष्ट नाहीं. मनुष्याची बुद्धि अधिकाधिक व्यापक सिद्धांताचा अभ्यास करतां करतांच सूक्ष्म सूक्ष्म सिद्धांतांकडेही कशी आपोआप वळत होती, हें यावरून आपणास दिसतें.

ॲनॉक्झिमीनसची सृष्टीच्या रचनेविषयीची कल्पना मात्र किंचित् प्रति-गामी दिसते. त्याच्या मताप्रमाणें पृथ्वी सपाट असून ती एखाद्या झाडाच्या पानाप्रमाणें हवेवर तरंगत आहे. खगोलस्थ ग्रह व तारे हेही हवेंत तरंगत असून त्यांच्या कक्षा सरळ आहेत; परंतु स्वतः पृथ्वी एकाबाजूला वर उचलून दिलेली असल्यामुळें तिच्या उंच भागामागें गेलेले ग्रह किंवा तारे दिसत नाहींत. याठिकाणीं ॲनॅक्झिमीनसनें सृष्टीच्या वक्रास्थिती-विषयीं जें अनुमान केलें आहे, त्यालाच जर तिच्या घनवर्तुलाकृति ज्ञानाची जोड दिली तर पृथ्वीच्या ध्रुवदंडाच्या वक्रास्थितीचेंच अनुमान निष्पन्न झालें असतें; परंतु पृथ्वीच्या आकाराचें वास्तविक अनुमान अयोनिया-मध्यें अखेरपर्यंत कोणालाच झालें नाहीं. त्या शोधाचें यश अन्य ठिकाणींच जावयाचें होतें.

## आयोनियामधील धर्मपंथ.

येथवर थेल्स व त्याच्या पंथांतील दोन प्रसिद्ध तत्त्वज्ञ यांजविषयीं उपलब्ध तेवढी माहिती दिली. खि. पू. ४९४ च्या वर्षीं पारसिक लोकांनीं मायलीटस शहराचा विध्वंस केला व त्याबरोबरच अयोनिया-तील संस्कृति व तत्वज्ञान याचाही अंत झाला. युरोपांतील तत्त्वज्ञा-नाच्या इतिहासांतील पहिला दुवा येथें सुटला; परंतु पाश्चात्य तत्वज्ञानां-तील प्राचीनतम मताची हकीगत पुरी करून त्याच्या पुढील मतांच्या वित्ररणाला सुरवात करण्यापूर्वीं अयोनियामध्यें याच काळीं विशेष प्रसि-

द्विस आलेल्या एका धर्मपंथाविषयीं हकीकत दिली पाहिजे. हा धर्मग्रंथ फार जुना असून त्याचा प्रस्थापक कोण हें माहित नाहीं. त्यांतील विशिष्ट आचार व मतें हीं ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत, कारण पुढें येणाऱ्या कित्येक तत्त्वज्ञांच्या रहस्यमय ? गूढ (Mystic) मतांचें मूळ या धर्मपंथांत आहे असें कित्येक इतिहासज्ञांचें मत आहे; व इतक्या प्राचीन काळीं कांहीं व्यक्तींची बुद्धि इतकी प्रगमनशील झालीं होती ती कशी, याची त्रोटक हकीगतही या ठिकाणीं मोठी मनोरंजक होईल यांत कांहीं नवल नाहीं.

अयोनियन संस्कृतीचें व्यापकदृष्ट्या निरीक्षण केल्यास आपणास असें आढळून येतें कीं, एकंदरींत तिचें स्वरूप ऐहिकविषयक ( Secular ) आहे. या ऐहिकविषयकत्वामुळें भौतिकशास्त्र संस्थापनेला विशेष उत्तेजन मिळालें, ही गोष्ट खरी; परंतु त्याबरोबरच पारलौकिक विचार व देवविषयक कल्पना, यांना मागें पाडून त्याबद्दलचे विचार अपरिपक्व दशेंतच राहिले. ज्या ठिकाणीं धर्माची वाढ होऊं लागली आहे, त्या ठिकाणीं देव म्हणजे एक पूजनीय, इच्छितफलद, अशी विभूती आहे ही भावना दृढ असते. परंतु होमरच्या ' ईलियड ' मधील देव या कसास उतरत नाहींत. होमरची त्यांजविषयीं लिहिण्याची तऱ्हा नेहमीं गंभीरपणाची आढळून येत नाहीं. त्याचे देव म्हणजे मनुष्याहून अधिक बळकट व अमर येवढेंच. त्यांजमध्यें इतर महनीय गुण कांहींही नाहींत. येवढेंच नव्हे, तर त्यांजपैकीं फार थोड्यांच्याच नांवानें प्रत्यक्ष अवदानें देण्यांत येत. अकिलीसला ज्यावेळीं खरोखर मनापासून प्रार्थना करावयाची असेल, तेव्हां तो इडा किंवा ऑलिंपस येथील देवाची प्रार्थना न करतां डोडोनाच्या झूजकडे वळतो, याचें कारण तरी हेंच आहे. देवांविषयींची कल्पना अशी संकुचित असल्यामुळेंच ॲनॅक्झिमँडरनें आपल्या नानाविध सृष्टींना देव ही संज्ञा दिली. त्यावरून आयोनियन तत्त्वज्ञानाचें मूळ धर्मांत आहे असें सिद्ध न होतां, ते धर्मनिरपेक्ष होतें असेंच म्हटलें

पाहिजे. होमरच्या काव्यावरून झालेली देवांविषयींची संकुचित कल्पनाच या संज्ञेच्या मुळाशीं आहे. त्याचे देव म्हणजे नीतीचे संरक्षक समजले जात, पण त्यांची स्वतःची नीति म्हणजे जेमतेमच. त्यांचें अमानुषत्व म्हणजे त्यांचें अचाट सामर्थ्य व अमरत्व. व या दोन गुणांची कल्पना करून मनुष्यांचा कमीपणा व दुर्बलता लक्षांत आणून देण्याची प्रवृत्तीच अधिक. मनुष्यांच्या पिढ्यांच्या पिढ्या वाळून कोळ झालेल्या पानांच्या ढिगांप्रमाणें मृत्युरूपी वायूच्या झपाट्याबरोबर वाहून जातात व पाठीमागें त्यांचा मागमूसही उरत नाहीं; मेलेल्या मनुष्यांबद्दल जिवंत माणसांनां स्वप्नें पडतात, किंवा त्यांनां कोठें पाहिल्यासारखा भास होतो येवढेंच; बाकी मृत मनुष्याचें कांहींही शिल्लक रहात नाहीं. असें आहे तर मनुष्यानें मर्त्य गोष्टींचाच विचार करून आपल्यापुरतें पहावें. आपणास सुखदुःख देणारी देवता ही फार मत्सरी आहे, आणि आपलें डोकें अधिक वर काढणारा मनुष्य तिला आवडत नाहीं, याकरितां मनुष्यानें खावें, प्यावें, चैन करावी. एकच खबरदारी बाळगण्याची त्याला जरूरी आहे, आणि ती कशाचाही अतिरेक न करण्याबद्दल होय; कारण अतिरिक्त विषयसेवनानें वीट उत्पन्न होतो, अतिरिक्त संपत्तीनें गर्व चढतो, व गर्वानें मनुष्य आंधळा होऊन देवतेच्या कोपाचीं फळें भोगतो.

वरील प्रकारचीं मतें साधारण सुखवस्तू माणसांनां ठीक वाटतात, व ती अनोयियामधील कांहीं लोकांनां बरीं वाटलीं. परंतु साधारण जनसमाजाचें अशानें कसें समाधान होणार? त्याच्या धार्मिक प्रवृत्तीला कांहींतरी शाश्वत समाधानाची सवड पाहिजे आणि अशी सवड होमरच्या देवतांच्या कल्पनांत नव्हती. अशा प्रसंगीं मनुष्याच्या मनाला समाधान व उत्साह देणारा एक धर्मपंथ डेलॉस येथें उदयाला आला. या पंथाचे लोक सूर्योपासक होते व ग्रीक भाषेंतील सूर्यदेवतेचें एक स्वरूप जें Orphens यावरून या पंथाला Orphic Religion असें म्हणतात. या पंथामध्यें देवतासंचार अगर देवतासाक्षात्कार हा

एक विशेष होता; व पवित्र शास्त्रग्रंथांतून असलेलीं वचनें याच साक्षात्कारांत प्राप्त होण्याऱ्या अनुभवाविषयीं प्रतिपादक आहेत असें या धर्माचें मत होतें. याशिवाय या धर्मांतील दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे यामध्यें कोणालाही मज्जाव नव्हता. त्या पंथाची दीक्षा पत्करून व उमेदवारीचे नियम पाळून त्या धर्माचा स्वीकार करील त्याला तो धर्म खुला होता, व त्याला स्वतः साक्षात्कारपात्र होतां येईल असें त्या धर्माचें अभिवचन होतें. या धर्मानें प्रथमतः देव व मनुष्य यांतील अनुल्लंघनीय वाटणारी मर्यादा काढून टाकली. ऑर्फिक लोकांच्या मताप्रमाणें मनुष्य म्हणजे अधःपतन पावलेला देवच असल्यामुळें, अनेक व्रतांच्या साह्यानें आपली काया पवित्र करून त्याला आपलें अमरत्व परत मिळवितां येणें शक्य होतें व साधु पुरुषांचे आत्मे अमरच असतात, असा या लोकांचा दृढ विश्वास होता. आत्मा हा जन्मापूर्वीं होता व मरणानंतरही असतो. वास्तविक आपण ज्याला जीवित म्हणतो तेंच त्याचें मरण आहे. कारण मनुष्याच्या, पशूच्या किंवा लतापत्रादिकांच्या आवरणांत तो गुरफटलेला असतो आणि अत्युत्कृष्ट पावित्र्यानें तो जन्मचक्रांतून सुटतो तेव्हांच तो खरा सुखी होतो.

या सर्व कल्पना आयोनियाला नवीनच होत्या. आयोनियाचा अंतकाळ फार त्वरीत आल्यामुळें या कल्पनांना डेलॉस—मध्येंच राहावें लागलें; नाहींतर या मताचा कदाचित् लवकर फैलावा झाला असता. या मताचा मूळ उत्पादक कोण हें माहित नाहीं. या मताविषयींची माहिती इटली व क्रीट येथें सांपडलेल्या सुवर्णपटावरून मिळाली आहे. हिंदूंच्या तत्त्वज्ञानाशीं व धर्ममतांशीं इतकें जुळतें येणारें व ग्रीक लोकांच्या त्यावेळच्या विचारपरंपरेशी अगर राहणीशी अगदीं विसदृश असलेलें हें मत हिंदुस्थानांतूनच तिकडे गेलें नसेल ना? खि. पू. पांचशें सहाशें वर्षांपेक्षांही अधिक जुन्या असलेल्या या मताला पूर्वीचा दुसरा आधार कोणचा असावा हें सांगता येत नाहीं.

---

# प्रकरण २ रें.

## पायथॅगोरॅस.

आजपर्यंत जगांत जे अत्यंत श्रेष्ठ पुरुष होऊन गेले त्यामध्येंच पायथॅगोरॅसचीही गणना केली पाहिजे; परंतु थेल्सप्रमाणेंच पायथॅगोरॅसनेंही कांहीं ग्रंथरचना केली नसल्यामुळें त्याच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या मतांपैकीं प्रत्यक्ष त्याचींच अशीं कोणतीं व त्याच्या शिष्यांनीं विशेष स्वरूपाला चढविलेलीं कोणतीं, याचा निर्णय करणें कठिण आहे. पायथॅगोरॅसविषयीं लिहितांना अरिस्टॉटलनें जी सावधगिरी बाळगली आहे ती कदाचित् या कारणा करितांच असावी असा कित्येकांचा तर्क आहे. पायथॅगोरॅसच्या मतांचा उल्लेख करतांनां तो नेहमीं ' पायथॅगोरियन म्हणून प्रसिद्ध असलेल्या पुरुषांचीं मतें ' किंवा ' पायथॅगोरियन पैकीं कित्येकांचीं मतें ' अशी भाषा वापरतो. विशिष्ट ग्रंथांच्या अभावामुळें थेल्स व पायथॅगोरॅस यांजबद्दल आढळणारी ही अनिश्चितता सॉक्रेटिसबद्दलही आढळून येते. परंतु प्लेटोच्या संवादांनीं हा कमीपणा पुष्कळच भरून काढला असल्यामुळें आपणांस सॉक्रेटिसबद्दल पुष्कळ माहिती मिळते, परंतु पायथॅगोरॅसबद्दल आपणांस तितकी तपशीलवार माहिती मिळत नाहीं.

पायथॅगोरॅसनें ग्रंथरचना केली नसल्यामुळें त्याच्या मतांविषयीं थोडीशी अनिश्चितता असली तरी आपणास असें सामान्यतः म्हणतां येईल कीं, पायथॅगोरॅसच्या अनुयायांनीं झालें तरी मूळ त्याच्या असलेल्या मताचाच संग्रह केला असला पाहिजे. साधारणतः एखाद्या मताचा उच्चपणा मूल प्रवर्तकावरच बहुधा अवलंबून असतो. बेकननें म्हटल्याप्रमाणें प्राणी हे आपल्या मूलस्थानाच्या

उंचीपेक्षां अधिक उंच चढत नाहींत. या सामान्य नियमाप्रमाणें पाहूं गेल्यास पायथॅगोरॅसच्या पंथांतील मतेंही बहुतांशीं पायथॅगोरॅसचींच होतीं असें म्हणण्यास विशेष प्रत्यवाय नाहीं. कांहीं विशेष मतें मागून अस्तित्वांत आलीं, असा बळकट पुरावाच असेल तेथें गोष्ट निराळी.

पायथॅगोरॅसच्या चरित्रक्रमाविषयींही हीच अनिश्चितता आहे. त्याजविषयीं फार प्राचीनकाळापासून पुष्कळ दंतकथा प्रसिद्ध आहेत आणि खुद्द अरिस्टॉटलच्या वेळीं या दंतकथांचा विलक्षण सुळसुळाट असल्यामुळेंच अरिस्टाटलला पायथॅगोरॅसच्या पंथाविषयीं निश्चयात्मक लिहिण्याचें धाडस झालें नाहीं. अशा प्रसंगीं पायथॅगोरॅसचे अनुयायी अगर त्याच्या पुनरुज्जीवन प्रसंगीचे त्याचे भक्त, यांच्या हकीगतींतील अतिशयोक्तीचा भाग वर्ज करून सारभूत तेवढीच हकीगत, विवेचक बुद्धीनें संकलित करून पायथॅगोरॅसच्या चरित्राची व त्याच्या मतांची रूपरेषा आपणास दाखवितां येईल; व ती बहुतांशी वस्तुस्थिति निदर्शकच होईल.

पायथॅगोरॅसचा जन्म सॅमॉस येथें खि. पू. ५८० वर्षें या सालीं झाला. त्याच्या बापाचें नांव नेसार्कस असें होतें, व तो एक श्रीमान व्यापारी होता. कित्येकांच्या मतें पायथॅगोरॅस हा प्रत्यक्ष अपोलोपासून झाला होता. पायथॅगोरॅसच्या बालपणाची व साधारणतः तरुणपणाची हकीगत देखील आपणास विशेष ठाऊक नाहीं. तो वयांत आल्याबरोबर जो सॅमॉस सोडून निघाला तो आपल्या वयाच्या चाळिसाव्या वर्षाचे सुमारास परत आला. या सर्व काळांतील त्याच्या आयुष्याचा व्यय अनियंत्रितपणें प्रवास करून ज्ञानसंपादन करण्यांत व आपले स्वतःचे सिद्धांत बसविण्यांत झाला. पायथॅगोरॅसनें पुष्कळच प्रवास केला होता यांत मुळींच संशय नाहीं. अरबस्थान, सिरिया, फेनिशिया, खाल्डिया, हिंदुस्थान, इत्यादिक देशांतील लोकांशीं त्यानें बराच परिचय करून घेतला होता. ईजिप्तमध्यें तर त्यानें पुष्कळच दिवस घालविले. तो ईजिप्त किंवा मिसर देशांत खि. पू. ५६०-५४० च्या दरम्यान प्रवास करीत होता, आणि या

काळीं मिसरदेश स्वतंत्र असून त्याच्या स्वतंत्र राजांपैकीं शेवटचा राजा अॅमॅसिस (Amasis) राज्य करीत होता. ग्रीक लोकांच्या ढवळाढवळींचे अजून तेथील आचारविचारांवर संस्कार झाले नव्हते. व्यापाराच्या उद्देशानें आलेले धाडसी ग्रीक अगर भाडोत्री सैन्यांत दाखल झालेले ग्रीक शिपाई या शिवाय मिसरदेशांत विदेशीय असें कांहींच दिसूं लागलें नव्हतें. अशा प्रसंगीं पायथॅगोरॅसला ईजिप्तमधील धर्माचे, आचारविचारांचे, व रीतिरिवाजांचे शुद्ध स्वरूप पहावयास मिळालें; व त्याचा त्यानें उत्तम उपयोग करून घेतला. त्यानें कित्येक धर्माचार्यांच्या स्वतः मुलाखती घेतल्या व सामान्य जनांना अज्ञात असलेल्या पौराणिक कथा किंवा व्रतें वैकल्यें अगर रहस्यरूप सिद्धांत, हीं सर्व त्यानें अवगत करून घेतलीं. एकंदरींत ईजिप्त देशांतील धर्मविचारांचा पायथॅगोरॅसच्या मनावर पुष्कळच परिणाम झाला, व त्याच्या मतांतील कित्येक गोष्टींचें मूळ मिसर देशांतील विचारपरंपरेंत सांपडतें.

ज्या पुरुषानें ज्ञान प्राप्तीसाठीं परदेशांतही प्रवास करून मोठ्या आस्थेनें ज्ञानसंपादन केलें, तो आपल्या जवळच्या लोकांच्या मतांची माहिती करून घेण्याविषयीं कसा उदासीन राहील? त्यांत सॅमॉस व मायलीटस यांचासंबंध तर फारच नजीकचा असल्यामुळें थेल्स व त्याचे शिष्य यांच्या मताची पायथॅगोरॅसला पूर्ण माहिती होती. पायथॅगोरॅसने अॅनॅक्झिमॅंडरचें शिष्यत्व देखील पत्करलें होतें, असा कित्येकांनीं तर्क बांधला आहे, व तो खरा असण्याचा बराच संभव आहे. अॅनॅक्झिमॅंडरची खगोलस्थ ज्योतींविषयींची कल्पनाच पायथॅगोरॅसच्या मतांत परिणत झाली असें म्हटल्यास फारसें चुकणार नाहीं. याशिवाय सृष्टिविषयक उपपत्तीमध्यें आढळणारें अमर्यादिततेचें महत्त्व व या अमर्यादिततेची हवेशी सांगड, यांजवरून अॅनॅक्झिमीनसचीं हीं मतें किंचित्सूचित होत असल्यामुळें, पायथॅगोरॅसच्या मायलीशियन मताशीं झालेला संबंध बराच दृढ असावा असें वाटतें. त्याचप्रमाणें

पायथॅगोरॅसचीं भूमितिविषयक मतें व विशेषतः त्याच्याच नांवावर प्रसिद्ध असलेला सिद्धांत, यांचा उगम थेल्सच्या मतांतच आहे यांत कांहीं संशय नाहीं. याच दृष्टीनें पायथॅगोरॅसला थेल्सच्या मतांपुढें स्थान देणें आम्हांस बरें वाटलें.

याखेरीज पायथॅगोरॅसला डेलॉस येथें प्रस्थापित झालेल्या ऑर्फिक धर्ममताची चांगलीच माहिती असली पाहिजे. कारण त्याच्या मताला त्या धर्मग्रंथांतील मतें चांगलींच जुळतीं येतात. हा सादृश्यविषयींचा उहापोह आपणास अग्रभागीं करावयाचाच आहे, सबब सध्या एवढी सूचनाच पुरे आहे.

आपल्या वयाच्या चाळिसाव्या वर्षांपर्यंतचा काळ ज्ञानसंपादनांत घालवून पायथॅगोरॅस परत आपल्या जन्मभूमीस आला; परंतु तेथें आल्यावर पुढें त्याची हकीगत काय झाली हें सांगण्यापूर्वी पायथॅगोरॅसच्या मतांचें संकलित स्वरूप काय होतें तें आपण पाहूं. कारण यानंतर पायथॅगोरॅसच्या मताचा ठिकठिकाणीं कितपत प्रसार झाला व कसा झाला आणि त्याचा शेवट कशांत झाला, हेंच आपणांस पहावयाचें आहे. पायथॅगोरॅसच्या मतांची संघटना याच ठिकाणीं परिणत झाली असल्यामुळें येथेंच तिचें स्वरूप वाचकांपुढें मांडणें अधिक चांगलें होईल.

पायथॅगोरॅसच्या मतांत अनेक विषयांची गर्दी झालेली आहे येवढेंच नव्हे, तर त्या त्या विषयांतील अनुभवावरून त्यानें काढलेल्या सिद्धांताची गुंतागुंत झाली आहे व त्यामुळें एका विषयांतील त्याचे शोध देत असतांना दुसरा विषय टाळणें अशक्य आहे. परंतु इतर विषयांचा उल्लेख शक्य तितका कमी करून विषयवार त्याच्या मतांचा विचार करूं.

पायथॅगोरॅसच्या वेळीं ग्रीक लोकांमध्यें "लायर" या नांवाचें वीणेसारखें एक तंतुवाद्य प्रचारांत होतें. याला सात तारा जोडलेल्या असत व त्या खुंट्यांच्या साहाय्यानें उंचस्वर किंवा निचस्वर करितां येत. स्वराचा

उच्चनीच भाव केवळ कर्णप्रत्ययावरूनच ठरविण्यांत येई. या वाद्यांतील तारांचे स्वर लावण्याची अशी रीति असे कीं, पहिल्याप्रथम कडेच्या म्हणजे नं. १ व नं. ७ या तारा संवादी करण्यांत येत. येथें संवादी याचा अर्थ एकदम वाजविल्या असतां कर्णमधुर लागणाऱ्या असा नसून एकामागून एक वाजविल्या असतांना कर्णमधुर लागणाऱ्या असा आहे. या दोन तारा जुळल्या म्हणजे मधली नं. ४ ची तार व त्याच्यावरची नं. ३ ची तारही त्याचप्रमाणें लावण्यांत येई. बाकी राहिलेल्या तीन तारांचे स्वर कमी जास्त करण्यांत येत व ते ज्या मानानें कमीजास्त केलेले असतील त्यामानानें त्या त्या स्वरसंयोगांना निरनिराळी संज्ञा येत असे. एकाच तारेचा स्वर जो कमी अधिक येतो, तो तिच्या तरंगसंख्येच्या कमज्यास्त प्रमाणावर ( number of vibrations ) अवलंबून असतो, ही गोष्ट पायथॅगोरॅसला माहीत होती. ही तरंगसंख्या कमी अधिक कशी होते हें दाखविण्यास अलीकडे जीं साधनें उपलब्ध आहेत तीं त्यावेळेस नव्हतीं. त्यामुळें तारेची लांबी एकच ठेऊन ह्या तरंगसंख्येचें प्रमाण कमी जास्त झालेलें पायथॅगोरॅसला दाखवितां आलें नाहीं; परंतु त्यानें या प्रश्नाचा दुसऱ्या बाजूनें विचार केला. तारेची तरंगसंख्या तिच्या लांबीच्या व्यस्तप्रमाणांत असते हें त्याला ठाऊक झालें होतें, व म्हणून निरनिराळ्या स्वरांचें परस्पर प्रमाण दाखविण्यासाठीं त्यानें एक फिरता पडदा लावलेली एकतारी वापरली. या फिरत्या पडद्याच्या साहाय्यानें त्याला सहज दाखवितां आलें कीं, सप्तकांतील सर्व संवादी स्वरांचें परस्पर प्रमाण २:१; ३:२; आणि ४:३; असें होतें. या सर्वांस एकाच छेदाचें रूप दिल्यास तें प्रमाण ६, ८, ९, १२ असें होईल, आणि यांना अनुक्रमें आपल्या सप्तकांतील नांवें दिल्यास तीं सा, म, प, सा, अशीं होतील. हा शोध पायथॅगोरॅसनें आपल्या एकतारीवर फिरत्या पडद्याच्या साहाय्यानें कसा काढला हें थोडक्यांत दाखवूं.

( १ ) दुसऱ्या सप्तकांतील षड्ज किंवा सा २ हा स्वर यावयाला तारेची जी लांबी धरली होती ती लांबी दुप्पट केली, तेव्हां पहिल्या सप्तकांतील षड्ज किंवा सा हा स्वर आला. याचाच अर्थ दुसऱ्या सप्तकांतील सा हा पहिल्याच्या दुप्पट असतो किंवा त्यांचें परस्पर प्रमाण २:१ असें आहे. म्हणजे त्यांच्या तारांची लांबी २:१ व तरंगसंख्या १:२ अशी आहे.

[ २ ] दुसऱ्या सप्तकांतील षड्जाच्या अगर सा २ च्या तारेच्या दीडपट लांबीची तार घेतली तर प्रथम सप्तकांतील मध्यम स्वर आला. याचाच अर्थ त्यांचें प्रमाण ३:२ असा झाला. म्हणजे सा २ च्या तारेची लांबी २ तर म ची लांबी ३, व म चो तरंग संख्या २ तर सा. २ ची संख्या ३

[ ३ ] सा २ च्या लांबीपेक्षा $\frac{3}{4}$ पट लांबीची तार घेतली तर पंचम होतो.

याप्रमाणें आपणास मिळालेले ६, ८, ९, १२ हे आंकडे सूक्ष्म रीतीनें पाहूं लागल्यास आपणांस असें आढळून येतें कीं, ८ व ९ ही संख्या ६ व १२ या संख्येची मध्यगामी ( Mean ) आहे. त्यापैकीं ९ ही संख्या सहापेक्षां जितकी मोठी तितकीच बारापेक्षां कमी [ कारण ९=६+३=१२−३ ] व हिला त्या दोन संख्यांचा गणितमध्य ( Arithmetical mean ) म्हणतात. ८ ही संख्या पहिल्याच्या जितक्या अंशांनीं मोठी आहे तितकीच दुसरीच्या अंशानीं कमी आहे. ( कारण ८=६+$\frac{६}{३}$=१२−$\frac{१२}{३}$ ) व यालाच संगीत—मध्य ( Harmonic mean ) म्हणतात.

हा सर्व विस्तार करण्याचा उद्देश येवढाच कीं, ह्या संगीतांतील शोधावरून पायथॅगोरॅसनें सृष्टिविषयक उपपत्तीबद्दल कांहीं तर्क काढले. मासलीटसचा तत्वज्ञानी ॲनॅक्झिमॅंडरच्या मतांचें विवेचन करतांना सांगण्यांत आलेंच आहे कीं, त्याच्या मतें या जगांत द्वंद्वें म्हणजे शीत, उष्ण, कठोर

मृदु, इ. आहेत; व त्यांची उपपत्ती लावतांना आपणांस तद्व्यतिरिक्त कांहींतरी अव्यक्त असें कारण गृहीत धरलें पाहिजे. या जगांत ह्या द्वंद्वांतील प्रत्येक मत दुसऱ्यावर स्वारी करतें, व अखेर दोन्हीही अव्यक्तांत मिळतात. ॲनॅक्झिमँडरच्या या उपपत्तीवर पायथॅगोरॅसचें असें म्हणणें होतें कीं, या द्वंद्वांपैकीं प्रत्येकजण दुसऱ्यावर जुल्म करीत आहे. हें म्हटल्याबरोबर आपणास असें कबूल केलें पाहिजे कीं, जेथें त्या दोघांचाही अंतर्भाव होईल अशी कोणती तरी एक स्थिती असली पाहिजे. उच्च षड्ज व नीच षड्ज यांचा संगीतामध्यें अमूकच एका ठिकाणीं येतो, असें आपणास गणितानें नक्की काढतां येतें. या संगीत मध्यांत उच्चनीच षड्जांचा बेमालुम मिलाफ झाला आहे. मग शीत, उष्ण, कठोर, मृदु या द्वंद्वाचाही असा एक मध्यबिंदू असला पाहिजे कीं, ज्या ठिकाणीं त्या उभय कोटीनांही योग्य वाटा मिळून कोणालाच अन्याय भोगावा लागत नाहीं; आणि जो सिद्धांत आपणास स्वरासारख्या सूक्ष्मगोष्टींतही प्रमाणबद्ध मांडता आला, तो त्यापेक्षां स्थूलविषयांत कां येऊं नये ? पायथॅगोरॅसच्या मताप्रमाणें हा सिद्धांत मान्य केला म्हणजे त्यावरून सृष्टीची नवी उपपत्ती कशी होऊं लागते ती पहा. थेल्सच्या मतें जल हें एकच सृष्टीच्या मुळाशीं आहे; पण त्याचा शिष्य ॲनॅक्झिमँडर याच्या मतें कांहीं एक अव्यक्त--पण एकरूपच--सृष्टीच्या मुळाशीं आहे; पण पायथॅगोरॅसचें मत असें दिसतें कीं, सृष्टीचें कारण एकच असण्याची जरूर काय ? भिन्नभिन्न स्वर जर एक सुस्वर निर्माण करूं शकतात, तर भिन्न भिन्न तत्त्वें परस्परांच्या समेटानें सुसंगत सृष्टीची सुव्यवस्थित रचना कां करूं शकणार नाहीत ? याच मुद्याची विशेष प्रचीती पहाण्यास योग्य शास्त्र म्हणजे वैद्यक होय.

## वैद्यक.

या विषयांतही आपणास परस्पर विरोधी गोष्टींचा संयोग करावा लागतो. शीतोष्णादिकांचा समधातपणा अगर संवाद अगर योग्य

मिश्रण उत्पन्न करून शरीरस्वास्थ्य संपादणें हेंच वैद्यकविद्येचें ध्येय आहे. प्लेटोच्या फिडो या नांवाच्या संवादांत सिमियसनें याच मतांचें थोडेंसें दिग्दर्शन केलें आहे. ज्याप्रमाणें एखाद्या तंतुवाद्यामध्यें निरनिराळ्या उंच नीच स्वरांच्या तारा असतात, आणि त्या उंच नीच स्वरांचा योग्य मिलाफ अथवा संवाद झाला म्हणजे कर्णमधुर संगीत उत्पन्न होतें, परंतु त्याच तारा बेसुर लागल्या म्हणजे कर्णकटु स्वर उत्पन्न होतात; त्याचप्रमाणें आपलें शरीर हें शीत, उष्ण; शुष्क, क्लिन्न; या तत्त्वांचें झालेलें आहे. हीं तत्त्वें जोंपर्यंत संवादी असतील तोंपर्यंत शरीर निरोगी असतें व त्यांच्यांत बेसुरेलपणा उत्पन्न झाला म्हणजे शरीराला रोग झाला असें म्हणतात. बेसुर झालेल्या तंतुवाद्याच्या तारा कमीजास्त चढवून ज्याप्रमाणें पुनः संवाद उत्पन्न करतां येतो, त्याप्रमाणेंच औषध सेवनानें शरीरांतील तत्त्वांचा संवाद साधतां येतो.

एकंदरींत पायथॅगोरॅसनें आपलें संगीतज्ञान जिकडे तिकडे लागू केलें होतें. ॲनॅक्झिमँडरच्या मतें ग्रह व तारे हे गोल छिद्रें किंवा कड्यां-प्रमाणें होते म्हणून सांगितलेंच आहे. पायथॅगोरॅसनें त्यांच्या गतीविषयीं अशी कल्पना काढली कीं, त्यांची गती ही या संवादतत्त्वावरच चालली आहे. यासच इंग्रेजीमध्यें Harmony of the spheres किंवा विश्वांचें संवादितत्व असें म्हणतात; व या कल्पनेचा उल्लेख ठिक-ठिकाणीं आलेला असतो.

## गणित.

पायथॅगोरॅस हा मोठा गणिती म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचें असें म्हणणें होतें कीं, सर्व पदार्थ म्हणजे निरनिराळ्या संख्याच होत. पाय-थॅगोरॅस संख्या या शब्दाचा अर्थ काय, करीत असे, हें ध्यानांत घेतल्या-शिवाय आपणास त्याचा अर्थ काय, हें ध्यानांत येणार नाहीं; व तो अर्थ लक्षांत ठेऊन सुद्धां पायथॅगोरॅसच्या मतांत कांहीं अंश गूढ राहातोच. असो. प्राचीनकाळीं संख्या मांडावयाची म्हणजे ठिप-

क्यांनीं मांडीत असत व खेळावयाच्या फाशांवरील आंकडे अद्यापही तसेच मांडलेले असतात. या पद्धतीप्रमाणें आंकडे विशिष्ट तऱ्हेनें मांडले तर निर-निराळ्या आकृति सिद्ध होतात; व त्यावरून आपणास गणितांतील सिद्धांत काढतां येतात. आणि या आकृतिविशेषांचें पायथॅगोरॅसच्या पंथांत इतकें महत्त्व होतें कीं, टेट्राक्टिस म्हणून प्रसिद्ध असलेल्या आकृती-वर हात ठेऊन शपथ घेण्याची त्यांजमध्यें वहिवाट होती. या आकृतीमध्यें १० या अंकाचें महत्व दाखविलें आहे. कारण तो पहिल्या चार अनु-क्रमांक मिळून झाला आहे. ( १+२+३+४=१० ) म्हणजे खालील



आकृती पुढें याच धोरणानें वाढविली तर १५, २१ इत्यादि बेरजा येतील. याप्रमाणें ३, ५, १०, १५, २१, इत्यादि बेरजांचे अवयव अशा विशिष्ट आकारांत मांडता येत असल्यामुळें पायथॅगोरॅसनें या संख्यांनां त्रिकोणाकृती संख्या ( Triangular numbers ) असें नांव दिलें आहे. याचप्रमाणें कांहीं संख्यांना चौरस संख्या व कांहींना लंबचतुष्णकोण संख्या अशीं नांवें मिळालीं होतीं.



वरील आकृतींकडे पाहिलें तर आपणांस असें दिसून येईल कीं, १ पासून विषय संख्यांची बेरीज केली तर सर्व चौरस

संख्या येतात. यानांच वर्गसंख्या म्हणतां येईल; व समसंख्या मिळवीत चाललें तर दीर्घ चतुष्कोणसंख्या येतात. याशिवाय गणितशास्त्रासंबंधीं त्याचे दुसरेही शोध आहेत. ज्याच्या दोन बाजू ३, ४, ५ या प्रमाणांत आहेत, अशा त्रिकोणांत नेहमीं काटकोन असतो व त्यावरून सामान्यतः काटकोन त्रिकोणासंबंधी कांहीं तर्क थेल्सनें बांधले होते म्हणून पहिल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. काटकोण त्रिकोणाच्या काटकोनभुजांवरील चौरसांचीं बेरीज कर्णचौरसाबरोबर असते हें त्यावेळीं कांहीं उदाहरणांवरून माहित होतें, परंतु काटकोण त्रिकोणाचे निरनिराळे मासले पाहतां पाहतां पायथॅगोरॅसच्या दृष्टीनें सर्वांगसुंदर असा समद्विभुज काटकोन त्रिकोण घेतला तर त्याचे भुज व कर्ण यांच्या लांबीचें निश्चित प्रमाण सांगता येत नाहीं. कारण गणितानें तो येणारा आंकडा अप्रमेय or अमित ( incommensurable ) आहे. याचप्रमाणें पायथॅगोरॅसला दुसरा महत्वाचा प्रश्न म्हणजे घनवर्तुलाजवळ जवळ येणारा द्वादशपत्र घनपंचकोण ( dodeca hedron ) तयार करण्याबद्दल होय. आधीं शुद्ध पंचकोण काढावयाचा म्हणजे एका दिलेल्या वर्तुळाची त्रिज्या (Medial section) नांवाच्या बिंदूंत छेदून तितकी लांबी घ्यावी लागते. व नंतर घनपंचकोण बनविण्याचा विचार. ही मेडिकल सेक्शन ( Medial section ) ची लांबी अशीच अमेय आहे. हा धनपंचकोण तयार करण्यास पायथॅगोरॅसचे अनुयायी खालील आकृतीचा उपयोग करीत.



परंतु तो उपयोग कसा करीत हें आज आपणांस ठाऊक नाहीं. व प्रत्यक्ष पायथॅगोरॅसच्याही वेळीं तें मोठें गूढच असलें पाहिजे. पायथॅगोरॅसचे अनुयायी या आकृतीचा साधारण मुद्रेसारखाच उपयोग करीत, व तिच्या गूढार्थकत्वावरून पुढे ही आकृती जादूटोण्याच्या कामांत विशेष उपयुक्त समजली जात असे. उंबऱ्यावर ही आकृती काढलेली असेल तर भूतें पिशाच्चें त्या घरांत शिरत नाहींत, व नजरचुकीनें शिरलींच तर तीं अटकून पडतात, त्यांनां या पंचकोणाचें उल्लंघन करून जाण्यास घरधन्याची परवानगी मिळवावी लागते, व ही परवानगी मिळविण्यासाठी तीं त्याची मनधरणी करतात, त्याला नानाप्रकारच्या अद्भुतशक्ति व अद्भुतज्ञान देतात, असा लोकांचा समज होता; व तो समज प्रसिद्ध जर्मन कवि व तत्त्ववेत्ता गअठ याच्या वेळींही रूढ होता. त्यानें आपल्या फॉस्ट नामक रूपकांत त्याचा उपयोग केला आहे.

पायथॅगोरॅसची संगीत, वैद्यक, गणीत, वगैरे विषयांतील मतें कांहींशीं गूढपणामुळें, कांहींशीं दुर्गमत्वामुळें व कांहींशी अपरिचितत्त्वामुळें मनोरंजक होत नाहींत. त्यासंबंधीं विवेचन करण्याचा उद्देश इतकाच कीं, वाचकांस त्याच्या बुद्धिमत्तेच्या अष्टपैलूपणाची कल्पना यावी. असो; आतां आपण पायथॅगोरॅसच्या इतर मतांकडे वळूं.

पायथॅगोरॅचा आचारनियमनावर अतीशय तीव्र कटाक्ष होता. त्याच्या पंथामध्यें अखंड ब्रह्मचर्य, तपश्चरण, श्रद्धायुक्त ध्यानधारणा, सामाजिकधर्मबुद्धि इत्यादिक गोष्टी तर अवश्य होत्याच, पण याशिवाय सामान्य आचरणाचेही सूक्ष्म निर्बंध घातलेले असत. त्यांपैकीं कांहीं खालीं दाखविले आहेत.

पातळ पदार्थ मोजण्याच्या मापावर बसूं नये. उजेडामध्यें काळीज खाऊं नये, लोखंडाच्या सळ्यांनीं अग्नी हालवूं नये. उजेडामध्यें आरसा ठेवला असेल तर त्यामध्यें आपले तोंड पाहू नये, सकाळीं उठल्याबरो-

वर हांतरूण नीट गुंडाळून ठेवावें व आपल्या शारीरस्पर्शाच्या खुणा त्याजवर राहूं देऊं नयेत. पशुयज्ञ करूं नये, ऊर्णावस्त्र घेऊं नये, व वाटाणे खाऊं नयेत. मनुष्यानें आपला आहार फार नियमित ठेवावा. एकंदरींत मांसाहार वर्ज्य करावा.

पायथॅगोरॅस आपले हे सर्व नियम प्रत्येक शिष्याला सारखेच लागू करीत असेल असें दिसत नाहीं. कारण तो क्रोटन येथें गेल्यावर एका मिलो नामक मल्लविद्याविशारदानें त्याचें शिष्यत्व पत्करलें होतें. व त्याला मांसाहार सर्वस्वी टाकून देणें अगदीं अशक्य होतें. परंतु असें कांहीं अपवाद सोडले तर पायथॅगोरॅसचे आहार विहाराबद्दल फार कडक निर्बंध असत असें दिसतें.

पायथॅगोरॅसचा पुनर्जन्मावर पूर्ण भरंवसा होता. मनुष्याचा आत्मा अमर असून मरणप्रसंगीं एका शरिरांतून तो दुसऱ्या शरिरांत जात असल्यामुळें तोच पुढें जिवंत आहे असें म्हटलें पाहिजे. येवढेंच नव्हे तर या पुढील जन्मामध्येंही त्याचेच कित्येक स्थूळ गुण देखील दृष्टोस पडतात अशी पायथॅगोरॅसची समजूत असावी. एके दिवशीं पायथॅगोरॅस रस्त्यानें जात असतां कोणी एकानें एका कुत्र्यास मारलें व तो कुत्रा मोठ्यानें किंचाळला. त्याबरोबर पायथॅगोरॅस त्या मनुष्याला म्हणाला, " थांब, त्या कुत्र्याला मारूं नकोस. कारण त्याच्या आवाजावरून हा माझा पूर्वजन्मांतील एक स्नेही असावा असें वाटतें. "

ब्रह्मचर्य, नियमितआहार, इत्यादिकांविषयीं नियम, पुनर्जन्मावरील दृढविश्वास, यांजविषयींची मूळकल्पना पायथॅगोरॅसला कोठून मिळाली असावी असा या ठिकाणीं साहजिकच प्रश्न उभा राहातो; आणि हा प्रश्न उत्पन्न होतो. यावरून त्याकाळीं खुद्द ग्रीस देशामध्यें अगर त्या देशाच्या वसाहतींमध्यें हें ज्ञान प्रचलित नसावें असें वाटतें. मनुष्याच्या शरीराव्यतिरिक्त कांहीं आत्मतत्त्व आहे ही कल्पनाच आधीं फार थोड्या जणांना ठाऊक होती. मायलीटस शाखेंतील ॲनॅक्झिमीनसला याबद्दल

कांहीं अस्पष्ट कल्पना असावी असें पहिल्या प्रकरणांत दाखविलेंच आहे परंतु त्या कल्पनेचें स्वरूप पाहतां त्याचीच ही कालक्रमानें परिणति झाली असें म्हणतां येत नाहीं. डेलॉस येथें प्रस्थापित झालेला ऑर्फिक धर्मच या कल्पनांच्या मुळाशीं आहे असें कित्येकांचें मत आहे. परंतु ऑर्फिक धर्माचा उदयच एका अर्थी ग्रीक वसाहतींत अकस्मात् उद्भूत झाला असल्यामुळें त्याचें स्वतःचेंच मूळ परदेशीय असणें संभवनीय आहे. व म्हणून ऑर्फिक धर्म व पायथॅगोरिक मत या दोघांचेंही एकच मूळ असून तें प्राच्य राष्ट्रांच्या संस्कृतीमध्यें असलें पाहिजे. ईजिप्त व ग्रीस या देशांचा परस्पर संबंध विशेष असल्यामुळें ईजिप्तमधून हीं मतें पायथॅगोरॅसनें नेलीं असावीत असें कोणास वाटेल, परंतु या मतांचा खुद्द ईजिप्तमध्येंच परिपोष झालेला नसल्यामुळें तें संभवनीय नाहीं. उलटपक्षीं हिंदुस्थानांतील प्राचीन ऋषींचें मतच याच्या मुळाशीं असणें अधिक संभवनीय आहे. पायथॅगोरॅसच्या नांवावर प्रसिद्ध असलेली बहुतेक सर्व मतें ख्रि. पू. ६०० वर्षांच्याही पूर्वीं हिंदुस्थानांत प्रचलित होतीं; व या अत्यंत साम्यामुळें त्यांचा संबंध असलाच पाहिजे असें वाटतें, व पायथॅगोरॅसचें पुनर्जन्मविषयक मत परकीय होतें, अशी त्याच्या समकालीन लोकांचीच समजूत होती. या ऐतिहासिक पुराव्यामुळें हीच समजूत दृढ होते. कित्येक लेखकांनां हिंदुस्थानच्या प्राचीनतम तत्वज्ञानाशी पायथॅगोरसचा जोडलेला हा संबंध न आवडून ते आर्फिक धर्मावरच अधिक जोर देतात; परंतु त्यांचा हा प्रयत्न व्यर्थ आहे. कारण आर्फिक धर्माचें मूळही अखेर हिंदुस्थानांतच शोधावें लागेल. डायाक्डोनेल यांनीं आपल्या संकृत-वाङ्मयाच्या इतिहासांत पायथॅगोरॅसचा व हिंदुशास्त्रज्ञांचा संबंध असल्याची गोष्ट नमूद केली आहे, व हा संबंध जोडण्यास पायथॅगोरॅसलाच हिंदुस्थानांत लांबवर यावयास नको होतें. कारण त्याचे काळीं पारसिकांच्या राज्यांत पुष्कळ हिंदु पंडीत आढळत व त्यांजबरोबर पायथॅगोरॅससारख्या दीर्घ-

प्रवास करणाराची मुलाखत होणें अगदीं साहजिक आहे असें सुचविलें आहे. [१] हिंदुस्थानांतील आहारविहारांच्या नियमांच्या कडकपणाकडे नुसती नजर फिरविली व त्या नियमांची दीर्घपरंपरा लक्षांत घेतली, म्हणजे आपणांस असा संबंध असलाच पाहिजे असें वाटतें. हिंदूधर्मामध्यें आहारशुद्धि हा धर्मव्रतांचा व आध्यात्मिक उन्नतीचा पाया आहे. " आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः स्मृतिलंभे सर्वग्रंथीनां विप्रमोक्षः" ही परंपरा छांदोग्योपनिषदालाही मान्य आहे. ( छां. ७. २६. २. ). पायथॅगोरॅसनें हे सर्व नियम पाळण्यास सांगण्याचें कारणही त्याच्या मतें मनुष्याची या नियमांनीं शुद्धता सिद्ध होते असेंच होतें.

1 " xxx xxx the dependence of Pythagoras on Indian philosophy and science certainly seems to have a high degree of probability. Almost all the doctrines ascribed to him, eligious philosophical, mathematical, were known in India in the sixth century B. C. The coincidences are so numerous that their cumulative force becomes considerable. The Transmigration theory, the Assumption of five elements, the Pythagorean theorm in Geometry, the Prohibition as to eating beans, the Religio-philosophical character of the Pythagorean fraternity, and the Mystical speculations of the Pythagorean school, all have their close parallels in ancient India. The doctrine of metempsychosis in the case of Pythagoras appears without any connection or explanatory background, and was regarded by the Greeks as of foreign origin. He could not have derived it from Egypt, as it was not known to the ancient Egyptians. In spite, however, of the later tradition, it seems impossible that Pythagoras should have made his way to India at so early a date, but he

could quite well have met Indians in Persia."

( A. A. Macdonell: Sanskrit Literature. )

पुनर्जन्माच्या प्रश्नाविषयींही इतक्या प्राचीनकाळीं हिंदुस्थानाव्यतिरिक्त उहापोह झालेला आढळत नाहीं. व म्हणून त्या बाबतींतही पायथॅगोरॅसची माहिती हिंदूपंडितांकडूनच मिळविलेली असावी असें दिसतें. पायथॅगोरॅसनें आपण पुनर्जन्म कां मानतो, याचें खुलासेवार विवरण कोठेंही दिलेलें नाहीं; नाहींतर त्यानें योजिलेल्या विचारसरणीची पाहाणी करून ती उपनिषदांतील विचारसरणीशी किती जुळते हें पहाण्यास सांपडलें असतें.

हिंदुस्थान हें अशा कल्पनांचें मूळस्थान मानलें तरी त्या कल्पनांचें बी युरोपखंडामध्यें रुजविण्यास पायथॅगोरॅस सारख्या तत्त्वज्ञाचीच जरुरी होती; व विशेषतः त्याकाळीं प्रसार पावणाऱ्या निःशृंखल चैनबाजीला आळा घालण्यास पायथॅगोरॅसनेंच सुरवात केली हा त्याचा श्रेष्ठपणा होय यांत संशय नाहीं. असो.

आपल्या वयाच्या ४० व्या वर्षापर्यंत ठिकठिकाणीं प्रवास करून व वर निर्दिष्ट केलेलीं मतें ठरवून पायथॅगोरॅस हा अखेर आपली जन्मभूमि सॅमॉस येथें परत आला. प्रवासाचे जिवापाड श्रम करून मिळविलेलें हें विद्याबीज आपल्या जन्मभूमींत अंकुर धारण करून फोफावेल व आपल्या भव्य शाखाविस्तारांनीं व शीतळ गर्द छायेनें सर्व जगताला आश्चर्यचकित व विगतश्रम करील, आपल्या जन्मभूमीचें महत्त्व वाढवील व आपणास यशोवैभव प्राप्त करून देईल, अशी पायथॅगोरॅसची मोठी उमेद होती; पण सॅमॉसला परत आल्यावर त्या आशेचा अगदीं विरस झाला. आपल्या तारुण्यांतील स्वातंत्र्यशाली सॅमॉस विलयाला जाऊन त्या ठिकाणीं पॉलीक्रेटिसच्या जुलमी राजसत्तेखालीं वांकून गेल्यामुळें स्वतंत्रबाण्याच्या श्रेष्ठ व्यक्तींना अवकाशरहित झालेलें सॅमॉस शहर पाहून पायथॅगोरॅसचा किती आशाभंग झाला असेल

हें त्याचें त्याला माहीत. प्रसिद्ध इंग्रजी कवि गोल्डस्मिथ याच्या Deserted Village (डिझर्टेड व्हिलेज) नांवाच्या काव्यांतील उद्गारांप्रमाणेंच उद्गार त्याच्या तोंडून निघाले असतील यांत काय आश्चर्य.

आपला मूळ बेत फसला म्हणून पायथॅगोरॅस स्वस्थ बसला नाहीं. कार्लाइलनें सॉर्टररिसार्टस्मध्यें म्हटलें आहे कीं, मिळविलेला पैसा खर्च करीपर्यंत खिसा जाळीत असतो, व मिळविलेलें ज्ञान दुसऱ्यास देईपर्यंत मनाला जाळीत असतें. आपल्या ज्ञानबीजाचा प्रचंड वृक्ष आपल्या जन्मभूमींत झाला नाहीं तर त्याचें दुसरीकडे आरोपण करावें, पण तें ज्ञानबीज फुकट जाऊं देऊं नये, अशा हेतूनें त्यानें देशत्याग करण्याचा निश्चय केला. त्यावेळीं अयोनिया व इटली येथील ग्रीक वसाहतींचा व्यापारनिमित्तानें पुष्कळच संबंध येत असे व ज्याचें आयोनियांत जुळणार नाहीं तो इटलीकडे जाई. आपणास अशा प्रकारचीं आणखीही कांहीं उदाहरणें सांपडतील. असो. त्यावेळच्या इटलीमध्यें क्रोटन आणि सायबॅरिस हीं सर्वांत प्राचीन व संपन्न शहरें होतीं, व त्यांपैकीं क्रोटन या शहरीं जाण्याचा पायथॅगोरॅसनें बेत ठरविला. क्रोटन शहरच पायथॅगोरॅसच्या विशेष पसंतीस कां उतरलें हें सहज समजण्यासारखें आहे. क्रोटन येथील राजकीय परिस्थिति पायथॅगोरॅसच्या बेताला फार अनुकूल होती. क्रोटन वसलें गेलें त्यावेळच्या जमीनदारांच्या वारसांतून निवडून काढलेल्या हजार सदस्यांच्या समितीकडे सर्व राज्यसत्ता होती; व ही पद्धत पुष्कळशी प्रजाकीय लोकसत्तेकडे झुकत असल्यामुळें, मतस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य यांना तेथें अधिक वाव होती. या खेरीज दुसऱ्या अनुकूल गोष्टी म्हणजे तेथील नागरिकांची सुदृढ शरीररचना व त्यावरून दिसून येणारें त्यांचें नियमित वर्तन व त्या ठिकाणच्या वैद्यकविद्येचा उत्कर्ष या होत; आणि या गोष्टी परस्परसंबद्धच आहेत. वर दर्शविण्यांत आलेंच आहे कीं, शरीरांतील तत्त्वांचा समतोलपणा राखणें हेंच आरोग्याचें साधन आहे. तें मिळविण्यास आहारादिकांचा नियमितपणा हाच उपाय आहे असें

पायथॅगोरॅंचें मत होतें, व क्रोटन येथील प्रख्यात भिषग्वरांचें या बाबतींत त्याच्याशीं एकमत होतें. पूर्वी निर्दिष्ट केलेला क्रोटन पहिलवान मिलो याचा जावई डिमॉकिडीस हा पायथॅगोरॅस क्रोटनमध्यें आल्यावर औषधिक्रियेमध्यें व शस्त्रक्रियेमध्यें प्रवीण झाला व क्रोटन येथील दुसरा प्रसिद्ध वैद्य अल्केमेऑन यानें तर आपले कित्येक ग्रंथ पायथॅगोरॅसच्या पंथांतील प्रसिद्ध व्यक्तींना समर्पण केले होते.[1] यावरून पायथॅगोरॅस व क्रोटन येथील वैद्य यांची परस्परोपयोगिता व सहानुभूती चांगलीच व्यक्त होते.

आपलीं वैद्यकसंबंधीं मतें अमलांत आणलीं असतां त्याचा उत्तम परिणाम क्रोटन येथील मल्ल करतील अशी त्याला आशा होती व या मल्लांच्या प्रख्यातीमुळेंही पायथॅगोरॅसची क्रोटनला जाण्याची प्रवृत्ती झाली असावी. ऑलिंपियन खेळांत क्रोटन येथील जवान नेहमी बक्षिसें मिळवून जात. यावरून क्रोटन हें पायथॅगोरॅसला आपणास उत्तम कार्यक्षेत्र आहे असें वाटणें अगदीं साहजिक होतें.

पायथॅगोरॅस क्रोटन येथें आल्याबरोबर त्याच्या वर्तनानें व शिक्षणानें क्रोटन येथें अद्भुत क्रांती घडवून आणिली, व खाजगी व सार्वजनिक जीवनांत मोठीच सुधारणा केली. त्याच्या उपदेशानें राजकीय असंतोष दबला, विषयलंपटता नाहीशी झाली, चैनबाजी हालावली,

1. Now the medical school of Kroton, which is represented for us by Alkmaion, based its theory on a very similar doctrine. According to him, health depended on the "isonomy" of the opposites in the body and disease was just the undue predominance of one or the other. We need not be surprised, then, to find that Alkmaion was intimately associated with the Pythagoreans, and that he dedicated his medical treatise to some of the leading members of the society.

( Burnet: Greek Philosophy part I )

व सुंदर तरुणी देखील आपले सुवर्णालंकार टाकून देऊन साधा पोषाख करूं लागल्या. त्याच्या उपदेशाची तरुण पुरुषांच्या मनावर अशी छाप पडे कीं, त्याचें हें सामर्थ्य पाहून अधिकारिसमितीनें आपण होऊन त्याला पाचारण केलें, व स्त्रियांच्या सर्व प्रकारच्या मिरवणुकींमध्यें त्याची पत्नी व कन्या यांना अग्रस्थान देण्यांत आलें. पायथॅगोरॅसच्या चरित्रकारांनीं दिलेल्या वरील हकीगती कांहींशा अतिशयोक्तिरूप आहेत असें समजलें तरी देखील एकंदरींत पायथॅगोरॅसला क्रोटन येथें पुष्कळच मानमान्यता मिळाली यांत संशय नाहीं. आणि ही मानमान्यता केवळ एकट्या क्रोटन शहरच्याच नागरिकांकडून नव्हे, तर आसपासच्या इतर मोठमोठ्या शहरांतूनही मिळाली होती. पायथॅगोरॅसचें माहात्म्य क्रोटनमध्यें प्रतिदिवशीं वाढत चाललें होतें हें खरें; पण या शीघ्रप्रगतींतच त्या त्या पंथाच्या विनाशकालाची पूर्व छटा दिसत होती असें म्हटलें तरी चालणार आहे. क्रोटनमधील सुमारें तीनशें धनिक गृहस्थ पायथॅगोरॅसचे शिष्य झाले व त्यांचे एक मंडळ जमलें. पायथॅगोरॅसचे आहारविहाराचे व कांहीं धर्मकर्माचे वगैरे नियम असल्यामुळें या मंडळांतील मनुष्य अर्थातच इतरांपासून अगदीं सहजगत्याच निवडून पडे व तितकें त्याचें मंडळाशी निकटत्व अधिकाधिक दृढतर होई. या गोष्टीचा नैसर्गिक परिणाम असा झाला कीं, पायथॅगोरॅस पंथ हा मंडलांतर्वर्ति जनांशी अत्यंत स्नेहयुक्त परंतु इतर जनसमाजापासून तुटक झाला. येवढेंच नव्हें तर त्यांचा हा तुटकपणा त्यांच्या प्रेमळपणाइतकाच स्पष्ट व चिरस्थायी झाला. पायथॅगोरेसच्या पंथांत शिरलेल्या मनुष्याला साहजीकच असें वाटे कीं, मी माझ्या इतर देशबांधवांपेक्षां श्रेष्ठ आहे. आहारविहारांच्या नियमांनीं मी माझें शरीर पवित्र करून घेतलें आहे व माझें मन सृष्टींचें गूढ समजण्याइतकें प्रगल्भ झालें आहे. या आत्मप्रतीतीचा अनुषंगिक परिणाम असा होई कीं, प्रत्येक पायथॅगोरियनला आपण जनसमाजाचे नेतृत्व पत्करावें, नव्हें तें नेतृत्व आपणाकडेच असणें सर्वथा योग्य. एवढेंच

काय, पण तें यदृच्छेनें प्राप्त होत नसेल तर येनकेनप्रकारेण प्राप्त करून घेणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे असें मनापासून वाटे. क्रोटन येथें राज-कारणांत हात घालावयाचा तर त्याला मार्ग म्हणजे हजार सदस्यांच्या समितींत प्रवेश करून घेणें, अगर त्या सदस्यांवर वजन पाडणें, हाच होता, हें खरें; पण याच मार्गानेंही पायथॅगोरियन पंथाचें महत्व पुष्कळच वाढणें शक्य होतें. पायथॅगोरॅसच्या अनुयांयामध्यें पुष्कळ धनिक होते म्हणून वर सांगितलेंच आहे. या धनिक गृहस्थांमध्यें सदस्य होण्यास कायद्यानें पात्र समजले जाणारे इसम असत, आणि त्यांच्या-द्वारानें हें राजकारणाचें सूत्र हालविलें जाई. याच मार्गाचा सतत अवलंब होतां होतां पायथॅगोरियन मंडळाला अगदीं राजकीय संस्थेचेंच स्वरूप आलें; व बाहेरून मोठी धर्मनिष्ठ, संयमशील, गूढतत्त्वान्वेषी दिस-णारी; पण वस्तुतः राजसत्ताभिलाषी, परविद्वेषक, महत्वाकांक्षी मंडळी जनसमाजाच्या डोळ्यांत खुपूं लागली. पायथॅगोरॅसचा क्रोटन येथें जाण्याचा उद्देशच आपली सत्ता स्थापण्याचा होता, असें जे कित्येक लेखक विधान करतात तें निखालस खोटें आहे. पहिल्या प्रथम क्रोटन येथें येण्याचा पायथॅगोरॅसचा हेतु अगदीं शुद्ध होता; व त्याचें वैयक्तिक वर्तन शेवटपर्यंत शुद्धच होतें. त्याच्या शिष्यवर्गाच्या दूरवर्तनाचें फळ त्याला भोगावें लागले येवढें मात्र खरें. तें पुढें साक्रेटिसच्या चरित्रांत दिसून येईलच. त्या महात्म्याचा एखादा नियमबद्ध विशिष्ट पंथ नसतांही केवळ अलकिबायडिससारख्या महत्वाकांक्षी पुरुषाचा व त्याचा स्नेहसंबंध होता एवढ्यावरून देखील त्याजवर लोक वृथारोप करण्यास चुकले नाहींत; मग साक्रेटिस हाच खुद एखाद्या राजकारस्थानीं मंडळाचा नेता असून अलकिबायडिस हा त्या मंडळाचा घटक असता, तर केवढा गहजब आधींच गुदरला असता हें कोणालाही सांगतां येईल. तसा अर्थाअर्थी संबंध न ठेवतां देखील साक्रेटिसला मृत्यूची शिक्षा भोगावी लागली ती लागलीच. पायथॅगोरॅसचा तर या क्रोटनमधील राजकारस्थानीं

पुरुषांशी निकटतम संबंध व तितकाच इतरांशी अलगपणा होता; मग त्याविरूद्ध लोकांचीं मनें कलुषित झालीं यांत काय आश्चर्य ? तशांतही आगींत तेल ओतण्यांस सैतानाचे दूत अगदी हजर होते. किलन ( Kylon ) आणि निनन ( Ninon ) या व्यक्तींकडे हा अधिकार आला होता. किलननें पायथॅगोरियन पंथांत प्रवेश करून घेण्याबद्दल बरीच खटपट केली; पण ती त्याच्या नीतिबाह्य वर्तनामुळें यशस्वी झाली नाहीं; व त्यामुळें तो पायथॅगोरॅस व त्याचा पंथ यांवर दांतओठ खात होता. आजपर्यंत मुख्य समितीचें व पायथॅगोरियन पंथाचें बरेंच सूत होतें, परंतु या दुकलीच्या खटपटीनें तेंही नष्ट झालें; व तेथेंही द्वेषाग्नी भडकला. क्रोटन येथील सत्ता तेथील मूळच्या जमीन-दारांच्या वंशजांकडे असे; कारण त्यांच्यामधूनच हजार सदस्यांची निवड होत असे; परंतु लोकसत्तेच्या वाढत्या लाटेपुढें अशा पद्धतीचा टिकाव लागणें अशक्य होतें; व म्हणून ही पद्धति मोडून टाकून सर्व लोकांमधून हे सदस्य निवडून काढावे व त्यांच्या समितीला म्हणजे वर्षभर नेमलेल्या कार्यकारी अधिकाऱ्यांना, वर्षअखेर त्यांच्या अधिकाराची मुदत संपल्यावर त्यांच्या कामाबद्दल जाब विचारतां यावा, व त्यांचें वर्तन दूषणीय वाटल्यास त्यांना जबर शिक्षाही देतां यावी, असा एक ठराव समितिमध्यें आला होता. हा ठराव पास झाला तर पायथॅगोरियन पंथाचें राजकारणदृष्ट्या महत्त्व कमी होईल या भितीनें सर्व पायथॅगो-रियन त्या ठरावाच्या विरुद्ध झाले. ही संधी साधून किलन आणि निनन यांनीं पायथॅगोरियन लोकांवर मोठा भडिमार उडविला व त्यांजवर शिव्यांचा व आरोपांचा असा कांहीं वर्षाव केला कीं, लोकांचीं अधि-कारोत्सुक झालेलीं मनें सैरवैर बिथरलीं. आणि अपोलो देवाच्या देवळांत—(कांहीं लेखकांच्या मतें मायलोच्या वाड्यांत)—पायथॅगोरियन लोक आपल्या सभेसाठीं जमले असतां लोकांनीं त्या देवळाला आग लाऊन दिली. त्या आगीच्या डोंबामध्यें बहुतेक पायथॅगोरियन जळून खाक

झाले. कांहीं प्रसंगावधानीं जवान लोक मात्र सुटले, परंतु त्यांना लगेच परागंदा व्हावें लागलें. याचप्रसंगीं टॅरॅटम्, मेटॅपोटम् वगैरे इतर शहरांतही असाच हाहाःकार उडाला, व अशा रीतीनें पायथॅगोरॅसच्या मूळच्या पंथाची इतिश्री झाली. खुद्द पायथॅगोरॅसविषयीं निरनिराळे लोकापवाद आहेत. कोणी म्हणतात तो त्याच आगींत आपल्या शिष्यांबरोबर जळून गेला; कोणाच्या मतें त्याचा आधींच अंत झाला होता; आणखी तिसऱ्या हकीगती-प्रमाणें तो वानप्रस्थ अथवा वनवासी होऊन चाळीस दिवसांच्या स्वीकृत उपोषणानें गतप्राण झाला. सिसेरोच्या काळीं त्याची समाधीही मेटॅपोटम्-मध्यें दाखविण्यांत येत असे. तात्पर्यार्थ येवढाच कीं, याप्रसंगानें पायथॅगो-रियन पंथ जवळ जवळ अस्तंगत झाला. पुष्कळ वर्षें लोटल्यावर पायथॅगो-रॅसच्या अनुयायांचा पुनः मॅग्नाग्रीशियाच्या त्याच भागांत प्रवेश झाला, व कांहीं ठिकाणीं त्यांना खरोखरी राजसत्तेंत हात घालण्यास सांपडला, ही गोष्ट खरी; तथापि पायथॅगोरियन पंथ या दृष्टीनें त्यांचें डोकें पुनः कधींही वर आलें नाहीं. वारा येईल तशी पाठ फिरवून तग धरून रहा-वयाचें व आपल्या भोंवतालीं प्रचलित असलेल्या मतांशीं आपलीं मतें अत्यंत जुळतात असें दाखविण्याचा प्रयत्न करावयाचा, हें यापुढें पाय-थॅगोरॅसच्या अनुयायांचें एक धोरणच पडून गेलें.

पायथॅगोरॅसच्या या अनुयायांमध्यें पहिला गृहस्थ म्हणजे थॉब्सचा फिलोलॉस हा होय. त्याचा काळ ख्रि. पू. च्या शतकाचा शेवट असा दिला असतां चालेल. दक्षिण इटलीमध्यें येणें विशेष धोक्याचें नाहीं असें पाहिल्यावर हा इटलीमध्यें गेला होता. याच्या काळीं एंपिडोक्लसचें मत प्रचलित असून तें आत्मसात् करण्याची पायथॅगोरियन् पंथाची धडपड चालली होती. तथापि एंपिडोक्लसचीं मूळद्रव्यें म्हणजे खरोखर मूळद्रव्यें नव्हत, असें त्यांचें आग्रहाचें म्हणणें होतें. प्लेटोनें आपल्या ग्रंथामध्यें हें मत मोठ्या खुबीनें सुचविलें आहे. हीं द्रव्यें

अक्षरेंच काय, पण शब्दाच्या अवयवयांसारखींहीं नाहींत असें पायथॅगोरियन् पंथाचें म्हणणें असल्याबद्दल त्यानें उल्लेख केला आहे. ( Timaeus. )

हीं मूलद्रवें संख्यारूप नसून संख्यासदृश आहेत, असें एक मत सांगण्यांत येत असे, पण याचा खरा अर्थ काय, हें एक मोठें गूढच आहे. नंतरच्या पायथॅगोरियनांनांही या मताचा इत्यर्थ नीट कळत नसावा असें दिसतें. फिलोलॉसचा एक विद्यार्थी युरीटॉस (Eurytos) या नांवाचा होता. त्यानें मनुष्याची संख्या २५० आहे हें दाखविण्यासाठीं तितके निरनिराळ्या रंगाचे गारगोटीचे खडे घेऊन भिंतीवर मनुष्याची आकृति तयार करून दाखविल्याचें ॲरिस्टॉटलनें सांगितलें आहे. त्यावरून मूळच्या संदिग्ध मताची कशी ओढाताण होते हें चांगलेंच प्रत्ययाला येतें.

याशिवाय पायथॅगोरियन् पंथांतील एक महत्त्वाचा शोध म्हणजे पृथ्वी ही एक ग्रह आहे हा होय; परंतु त्याबरोबरच सूर्यमालेविषयींचें त्यांचे एकंदर मत पाहून मोठा चमत्कार वाटतो. त्यांच्या मतें या मालेच्या मध्यभागीं एक मोठा थोरला अग्नि आहे. हा अग्नि आपणास दिसणें शक्य नाहीं, कारण जसा चंद्र आपणाकडे एकच बाजू ठेऊन आपणाभोंवतीं फिरतो म्हणून आपणास त्याची दुसरी बाजू मुळींच दिसत नाहीं; त्याप्रमाणेंच आपली व या मध्यवर्ती अग्नीची स्थिति आहे. त्याप्रमाणेंच चंद्रग्रहण होण्यास पृथ्वीची सावली पुरेशी न वाटून कीं काय, एका पडपृथ्वीची योजना करण्यांत आली होती. सूर्याचा प्रकाशही त्या मध्यवर्ती अग्नीपासून येतो, असें त्यांचें मत होतें. आपल्या नुसत्या उघड्या डोळ्यांनीं चंद्राविषयीं स्पष्ट दिसणाऱ्या गोष्टींच सर्वत्र लागू करण्याच्या अट्टाहासाचें हें फळ दिसतें.

कांहीं कांहीं प्रसंगीं मूळ गुरूचें मत किती दूर राहून भलतेंच मत पुढें येतें, याचाही एक मासला या पंथाच्या इतिहासामध्यें सांपडतो.

आत्मा हा देहाव्यतिरिक्त व देह नाश पावला तरी नाश न पावणारा व अमर आहे, असें पायथॅगोरॅसचें स्पष्ट मत होतें; परंतु त्याच्या पुढील अनुयायांनीं आत्मा हा शरीराचा सहधर्मी किंवा साधर्म्यगामी(attumement) आहे अशी कल्पना केली, व हें मत पुढें मांडण्यांत फिलोलॉसचा एक शिष्य सिमिअस यानेंच पुढाकार घेतला, ही आश्चर्याची गोष्ट आहे. आपल्या गुरूच्या मूळ शिकवणीकडे पूर्ण लक्ष न देतां, परिस्थितीच्या ओघाबरोबर वाहून जाण्याचाच हा परिणाम असेल, व या पंथामध्यें असे अनेक परिवर्त दृग्गोचर झाल्यामुळेंच त्याजविषयीं लिहितांना विख्यात ग्रंथकारांनींही संदिग्ध भाषा वापरली असेल हें बरेंच संभवनीय दिसतें.



# प्रकरण ३ रें

## हिरॅक्लीटस.

पहिल्या प्रकरणामध्यें थेल्सच्या मतांचें दिग्दर्शन करीत असतां सांगण्यांत आलेंच आहे कीं, जगताच्या आदिकारणाचा शोध करीत असतांच भेदपक्ष व अभेदपक्ष असे दोन पक्ष पडतात. जगतांतील पदार्थांविषयीं विचार करीत असतां त्यांच्यांत प्रतिक्षणी विकार होत आहे, असें दाखवून आपले सिद्धांत बांधणारा भेदपक्ष होय. या पक्षाला जगताचें आदिकारण असें कांहीं मान्य नसतें असें नाहीं, तर अमुक एका प्रसंगीं नानाविधसृष्टीविरहित अशी अवस्था होती, व त्यांतून नानाविधसृष्टी उत्पन्न झाली, असें त्यांचें मत नसून ही सृष्टीची नानावि-धता स्वभावसिद्ध आहे असें त्यांचें म्हणणें असतें; व या पक्षाला या कारणाकरितां भेदपक्ष किंवा **वैकृतिकपक्ष** असें नांव देतां येईल. उल-टपक्षीं सृष्टीची एकविधताच प्रामुख्यानें पुढें आणणारा पक्ष हा प्राकृतिक किंवा अभेद–पक्ष होय. या दोन पक्षांपैकीं पहिल्या पक्षाचा पुरस्कर्ता हिरॅक्लीटस होय.

हिरॅक्लीटस्‌चा काळ झेनोफेनस व पारमीनाइडस् यांच्यामधील आहे. हिरॅक्लीटसच्या त्रोटक लेखांत पायथॅगोरॅस व झेनोफेनस यांचा स्पष्ट उल्लेख आला आहे, व पारमिनाइडस्‌च्या ग्रंथांत हिरॅक्लीटसचा उल्लेख आलेला आहे. या कालानुक्रमानेंच चालावयाचें तर आधीं झेनोफेन-सची व त्याच्या मतांची माहिती दिली पाहिजे; परंतु झेनोफेनस व त्याच्या पंथांतील दुसरे तत्त्ववेत्ते यांची संगतवार हकीगत एकाच प्रकरणांत दिलेली अधिक चांगली, असें वाटल्यावरून ती पुढील प्रकरणांत दिली आहे.

झनोफेनसप्रमाणें हिरॅक्लीटसच्या मताची साक्षात्परंपरा पुढें जात नसल्या-मुळें त्याची माहिती स्वतंत्रपणें देण्यास हरकत नाहीं.

वर दर्शविलेल्या कारणांमुळें हिरॅक्लीटसचा काळ साधारणपणें ख्रि. पू. ५३६-४७० असा देण्यांत येतो. तो एफीसस येथील राहाणारा असून श्रीमंत घराण्यांतील होता. त्याच्या घराण्यांत एफीसस येथील एक धार्मिक उच्च पदवी वंशपरंपरा चालत असून हिरॅक्लीटसनें उदारबुद्धीनें ती आपल्या भावाकडे सोंपली असें सांगतात. हिरॅक्लीटसला त्याच्या संस्थानांतील लोकांकडून फारसें उत्तेजन मिळालें नसावें. कारण तो आपल्या संस्थान बांधवांवर फार रुष्ट झाला असावा असें त्याच्या कांहीं वाक्यांवरून दिसतें. हर्मोडोरस या नांवाचा त्याचा एक मित्र होता, व त्याला एफीससमधून हद्दपारीची शिक्षा मिळाल्यामुळें या रुष्टतेला अधिक जोर मिळाला असावा असें वाटतें. एफीससच्या लोकांना आपल्यामध्यें कोणी उत्कर्षास चढलेला खपत नसे. ज्याला उत्कर्षाची आवड असेल त्यास एफीसस सोडून इतरत्र जावें लागे. एफीससमध्यें एखाद्या मनुष्याला श्रेष्ठ पदवीस जाऊं देण्यापेक्षां, तो श्रेष्ठता संपादन करण्याजोग्या वयांत येण्यापूर्वींच प्रत्येक मनुष्याला फांशी देऊन सर्व संस्थानाचा कारभार अप्रौढ व अननुभवी बालकांकडे सोपविणें देखील एफीशियन लोक पसंत करतील असा त्याचा अभिप्राय होता. एफीससमध्यें दिवसेंदिवस प्रबळ होणाऱ्या लोकपक्षाच्या तो पहिल्यापासून विरुद्ध होता.

हिरॅक्लीटसच्या मनाचा आपल्या देशबांधवांविषयींचा हा कडवटपणाच इतरत्रही आढळून येतो. त्याच्यापूर्वीं होऊन गेलेल्या तत्त्ववेत्त्यांविषयी अगर कवीविषयीं तो कधींही विशेष आदरभाव किंवा प्रेम दाखवीत नसे. याला अपवाद म्हणजे इलीयड काव्याचा कर्ता एक होमरच होता. बाकीच्या-बद्दल येथून तेथून अनादरच. एका ठिकाणीं तो हिसिऑड, झेनोफेनस, पायथॅगोरॅस इत्यादिकांचीं उदाहरणें देऊन लिहितो कीं, पुष्कळ विद्वत्ता

असली म्हणून कांहीं मनुष्य विचारी होत नाहीं. पायथॅगोरॅसनें पुष्कळ धडपड केली, पण त्याचें पर्यवसान म्हणजे भाराभर विद्या व दोषयुक्त कला ह्यांच्या प्रसारांतच झालें !

हिरॅक्लीटसच्या चरित्राची निश्चित माहिती म्हणजे एवढीच. परंतु त्याच्या विचारांविषयीची आपली माहिती, त्याचे त्रोटक लेख ( Fragments ) अद्याप पहावयास मिळत असल्यामुळें, बरीच साधार व सांग आहे. आपल्या भोंवतालच्या लोकांशीं हिरॅक्लीटसचें कधींच न पटल्यामुळें त्याच्या विचारांत जी एक निराशेची व दुःखाची छटा दृष्टोत्पत्तीस येई, त्यांवरून त्याला 'रडका तत्त्वज्ञ' असें टोंपण नांव देण्यांत येतें. या उदासपणापेक्षां त्याच्या लेखावशेषांचा विशेष गुण म्हटला म्हणजे त्यांचा संदिग्धपणा होय; व या विशेषावरूनच त्याला गूढ (अव्यक्त) किंवा कृष्ण ( तिमिर ) अशीहीं उपपदें लावण्यांत येत. त्याच्या शब्दरूपी सागरांतील सुविचारमौक्तिकें वेंचून आणावयाचीं म्हटलीं तर डेल्फासच्या समुद्रांतील पाणबुड्याच पाहिजे असें सॉक्रेटिस म्हणत असें. आपली लेखनपद्धति गूढ व रहस्यमय आहे हें त्याचें त्याला कळत असे, पण सायबेल किंवा डेल्फीचा देव यांच्या आचरणावरून तो आपलें समर्थन करी. आपल्या ११ व्या लेखावशेषांत तो म्हणतो कीं, डेल्फीचा देव हा बोलूनही दाखवीत नाहीं व लपवूनही ठेवीत नाहीं; तर

---

Fragments

16. Much learning does not teach one to have understanding; else it would have taught Hesiod and Pythagoras and again Xenophanes and Heka, taios. 17. Pythagoras son of Muesarchos prosecuted investigations more than any other man, and ( selecting these treatises ) he made a wisdom to his own-much learning and bad art.
(The quotations are from Firbanks ).

केवळ चिन्हानेंच दर्शवितो.[1] आणि त्याच्याच पुढच्या म्हणजे १२ व्या या अवशेषांत तो म्हणतो कीं, अंगांत देवाचा संचार झाल्यामुळें सायबेलही आपल्या गंभीर, अनलंकृत, व नीरस शब्दानींच हजारोंवर्षांचें भाकित सांगते.[2] हिरॅक्लीटसच्या मतानें नानाविधवस्तूंचें ज्ञान हें सत्यज्ञान नव्हें. सत्यज्ञान म्हणजे केवळ 'एक शब्द' आहे. हिरॅक्लीटस कसा गूढवादी आहे हें या एका उदाहरणावरून देखील दिसून येईल. हा 'एक शब्द' म्हणजे कोणता ? या प्रश्नाचें आपण कांहीं तऱ्हेनें उत्तर देऊं शकूं; परंतु तें उत्तर हुडकून काढल्यावर हिरॅक्लीटसचा मतलब असाच व एवढाच असा आपणांस आग्रह धरतां यावयाचा नाहीं. यावरूनच बर्नेटनें हिरॅक्लीटसविषयीं लिहितांनां म्हटलें आहे कीं, तो कोणत्याही साच्यांत न मावण्याइतका मोठा आहे.[3]

हिरॅक्लीटसच्या एकंदर विचारसरणीवरून आपण अनुमान बांधलें, तर; हा 'एक शब्द' म्हणजे सृष्टीची अनियतता किंवा त्या अनियततेच्या मुळाशीं असलेलें अग्निद्रव्य असावा असें वाटतें. हिरॅक्लीटसच्या मतें या जगांत शाश्वत असें कांहींच नाहीं. त्यामध्यें नेहमी भरती ओहोटी ( Flux and reflux ) हें चालू आहे. मागें पहिल्या प्रकरणांत ॲनॅक्झिमीनसच्या मताचें विवरण करतांना या जगतांतील विविधता घनीभवन व विरलभवन (Condensation and rarefaction) यानें होतें असें त्याचें मत होतें म्हणून सांगितलें. त्या मतांत व हिरॅक्लीटसच्या

1. The Lord ( whose is the oracle ) at Delphi neither speaks nor conceals but gives a sign.

2. And the sibyl with raving mouth, uttering words solemn, unadorned, and unsweetened, reaches with her voice a thousand years because of the God in her.

3. He is much too big for our formulas.
( Burnett Greek Philosophy. )

मतांत फरक आहे. घनीभवनामध्यें पदार्थाची मर्यादा कायम ठेवून त्याचे घटकावयव मात्र अधिक करावयाचे असतात. परंतु भरतीमध्यें त्या पदार्थाचें दिक्परिमाण व घटकावयव परिमाण हीं बरोबरच वाढतात. या जगतांमध्यें निश्चल एकरूप असें कांहीं नाहीं. मनुष्याला एकाच नदींत दोनदां पाऊल घालतां येणार नाहीं; कारण त्याचें दुसरें पाऊल पडण्यापूर्वींच कितीतरी जुनें पाणी वाहून जाऊन नवें आलेलें असतें; व हाच क्रम अव्याहतपणें चाललेला असतो.[१] आपलें शरीर देखील कोठें सारखें आहे ? बालावस्थेमध्यें अतिशय अल्पाकार असलेला देह प्रथम वाढतो, व तारुण्याचा बहर संपला म्हणजे पुनः सुकून जात जात अखेर नामशेष होतो. ही भरती ओहोटी प्रतिक्षणी अव्याहतपणें चाललेली असल्यामुळें, क्षणापूर्वींचें आपलें शरीरच आतां आहे असें कसें म्हणता येईल ? हिरॅक्लीटसच्या मतें आत्मा हा देखील याला अपवादभूत नाहीं. त्याचें स्वरूप देखील तरंगमयच आहे. मग क्षणापूर्वींचाच आत्मा आतां कोठें राहिला ? आपल्या इकडील नलोपाख्यानांत अशी एक गोष्ट आहे कीं, दमयंतीच्या द्वितीयस्वयंवराची वार्ता मिळाल्यामुळें एका रात्रींत अयोध्येहून वैदर्भनगरीला जाण्यासाठीं बाहुक वेषधारी नलानें निवडलेल्या घोड्यांच्या रथांत बसून ऋतुपर्णराजा जात होता. जातां जातां त्याचें उत्तरीय रथाखालीं पडलें, परंतु बाहुकाला रथ थांबविण्यास सांगतो तों तें कित्येक शेकडों योजनें मागें राहिल्याचें त्यानें सांगितलें. सृष्टीचें गमन इतक्याच वेगानें होत आहे. प्रतिक्षणीं तिचा मार्ग भिन्न आहे. वरील उदाहरणांत रथ तरी एकरूप म्हणून धरला, पण वास्तविक पहातां तो देखील कायम कुठें होता ? जगांत एकरूप कांहीं नाहीं, हें हिरॅक्लीटसचें तत्त्व त्याचे काळी लोकांस मोठें चमत्कारिकच वाटलें. आपण प्रत्यक्ष त्या त्या वस्तू एकरूप असलेल्या पाहात असूनही त्या एकरूप नाहींत असें म्हणणारा हा तत्त्ववेत्ता

---

१ Frag. 41–42.

नसून कोणी वेडापीर आहे, अशीच त्यांची समजूत झाली. हिरॅक्लीटसची या मताबद्दल थट्टा करण्यासाठीं त्याचा एक समकालीन एपिकारमॉस (Epicharmos) यानें हाच युक्तिवाद सावकाराचें कर्ज न देण्यासाठीं एक कर्जदार पुढें आणतो असें दाखविलें आहे. ज्यानें कर्ज घेतलें तो आतां कोठें आहे, व ज्याचें कर्ज घेतले तो तरी कायम नाहींच. सावकार क्षणिक, कर्जदार क्षणिक, कर्जही क्षणिक, मग कर्ज घेतलें कोणी व तें द्यावें कोणी ?

अशा रीतीनें हिरॅक्लीटसचें मत प्रथमदर्शनीं मोठें चमत्कारिक वाटतें खरें; पण आधुनिक शास्त्रांचा त्याला पूर्ण पाठिंबा आहे, हें पाहून आपणांस मोठें आश्चर्य वाटतें. आपल्या बुद्धीच्या अलौकिकतेनें जी गोष्ट हिरॅक्लीटसला इतक्या प्राचीन काळीं अवगत झाली, तीच गोष्ट आज भौतिकशास्त्रानींही सिद्ध होत आहे. आपल्या स्थूलदृष्टीला एकरूप व निश्चय दिसणारा एखादा धोंडा देखील वास्तविक तसा नाहीं. प्रथमतः पृथ्वीवरील सर्व पदार्थांबरोबर तो पृथ्वीच्या दैनिक व सांवत्सरिक गतीमुळें अंतराळांत सारखा फिरत आहे, व या शिवाय त्याच्या घटकावयवांमध्यें केवढी हालचाल चाललेली असते याची आपणास कोठें कल्पना असते ? आपल्या दृष्टीला एकरूप दिसणाऱ्या त्या पाषाणाचे घटक सारखे हालत असतात; व तो पाषाण म्हणजे अनेक प्रकारच्या शक्तीचें तुमुल युद्ध सुरू असलेलें रणक्षेत्रच असतें. आपलें शरीर आपणास स्थिर वाटतें, पण तें तसें नाहीं. एका शास्त्रज्ञानें गणित करून असें ठरविलें आहे कीं, सात वर्षांच्या अवधींत आपल्या शरीरांतील प्रत्येक परमाणू बदलून त्याच्या जागीं दुसरा परमाणू आलेला असतो. सारांश हिरॅक्लीटसचें मत सकृद्दर्शनीं कितीही चमत्कारिक वाटलें, तरी तें आधुनिक शास्त्रांना मान्य झालें आहे, व तत्त्वज्ञानविषयक चर्चेचे प्रसंगीं त्याचा कऱ्हांना केव्हां उल्लेख होणें अगदीं अपरिहार्य होऊन बसलें आहे.

जगामध्यें स्थिर व एकरूप असें जर कांहींच नाहीं, तर आपणास त्या त्या वस्तू एकरूप कशा दिसतात ? काल जो देवदत्त मला भेटला तो मला आज भेटल्यावर मी त्याला कसा ओळखतों ? वास्तविक कालचा देवदत्त आज नाहीं, व कालचा मीही आज नाहीं. मग ही ओळख पटते कशी ? एका दिवसांत फारसा फरक पडत नसेल म्हणून हें संभवनीय आहे असें कोणी म्हणेल, परंतु कित्येक वर्षांनंतरही आपला बाळमित्र देवदत्त आपणास पुन्हा भेटला तरी आपण त्याला 'सोऽयं देवदत्तः' तोच हा आमचा देवदत्त असें ओळखीत नाहीं काय ? मग ही ओळख स्वरूपैक्यामुळें पडत नाहीं म्हणावयाची तर तिला साधक असें दुसरें काय आहे ?

या प्रश्नाचें हिरॅक्लिटसनें असें उत्तर दिलें आहे कीं, वास्तविक पहातां पदार्थ एकरूप नसतांहीं ते एकरुपच आहेत असा आपणास भास होतो; आणि या ऐक्याभासाच्या मुळाशीं नियमनैक्यता आहे. उदाहरण एखाद्या दिव्याची ज्योत आपणास एकसारखी आहे असें वाटतें, परंतु खरें पाहिलें तर त्या ज्योतीचें स्वरूप प्रतिक्षणीं निरनिराळें आहे. प्रतिक्षणीं तेलाचा व वातीचा नवा नवा अंश अग्नीशीं संलग्न होऊन पूर्वीप्रमाणेंच पेट घेत असतो; परंतु ही त्याची पेटण्याची क्रिया हुबेहुब पूर्वीप्रमाणेंच होत असल्यामुळें, आपणास तीच क्रिया सारखी चालू आहे असें वाटतें. जितका द्रव्यांश तैलवर्तिरूपानें ती ज्वाला ग्रहण करतें तितकाच कज्जलरूपानें बाहेर टाकते; व यामुळें जणूं काय एक परिवर्त पुरा होऊन आपणास ती क्रिया एकात्मक असल्याचा भास होतो. वास्तविक एकत्व पदार्थांचें नसून त्याच्या स्वरूप नियमनाचें आहे. हिरॅक्लीटसची ही कल्पनाही आधुनिक शास्त्रज्ञांनां मान्य झालेली आहे. हिरॅक्लीटसच्या बुद्धीची अलौकिकता आपणांस या मतांवरूनच स्पष्टपणें दिसते. त्याच्या समकालीन लोकांनां मात्र त्याची कांहीं कल्पना झाली नाहीं, व अज्ञजनांनांही आपलीं मतें समजतील अशा सोप्या भाषेंत तीं प्रतिपादन करण्याचा हिरॅक्लीटसनें कधीं प्रयत्नही पण केला नाहीं.

हिरॅक्लीटसनें दीपज्योतीचें उदाहरण घेतलें आहे, तें केवळ दूरच्या सादृश्यावरूनच नव्हे, तर तें अगदी तंतोतंत सृष्टिव्यापाराला लागू आहे असें त्याचें मत होतें म्हणून. त्याच्या मतें सृष्टीच्या सर्व उलाढालींच्या मुळाशीं अग्नि आहे. ज्याप्रमाणें अलंकार व सुवर्ण यांचे नेहमीं एकमेकांत रूपांतर होत असतें, त्याप्रमाणेंच अग्नि व सृष्टपदार्थ यांचें एकमेकांत रूपांतर होत आहे ( Frag. *22* ) व म्हणून हिरॅक्लीटसचा 'एक शब्द' म्हणून जो वर सांगितला तो अग्नि हा शब्दही असणें संभवनीय आहे. हिरॅक्लीटसचें म्हणणें लक्षणात्मक किंवा आलंकारिक नसून ज्याप्रमाणें थेल्सला आपणास डोळ्यांनीं दिसणारें पाणीच विविधसृष्टीच्या मुळाशीं आहे असें वाटत होतें, त्याप्रमाणेंच हिरॅक्लीटसला सृष्टीच्या मुळाशीं अग्नि आहे असें वाटत असे. मनुष्याच्या आयुष्यांतील जागृती, स्वप्न व मृत्यु, या तीन अवस्था घेतल्या तर त्या अग्नी, जल व पृथ्वी, यांजप्रमाणें आहेत. मनुष्य जागा असेल तोंपर्यंत तो खराखरा जिवंत आहे म्हणून म्हणतां येईल. कारण झोंप ही जिवंतपणा व मृत्यु यांच्या दरम्यानची स्थिति आहे. मनुष्याच्या शरीरामध्यें जलतत्त्व अधिक झालें म्हणजे तो मृत्यु पावतो. याला अल्प-प्रमाण पहावयाचें असल्यास एखाद्या दारूबाजाची स्थिति घ्या पुष्कळशी द्रवरूप दारू पोटांत गेल्यामुळें तो झिंगून पडतो व ही अवस्था साधारणतः निद्रेसारखी आहे; व निद्रा म्हणजे जीवन व मृत्यु यांच्या दरम्यानची अवस्था आहे. थोड्याशा द्रवरूप पदार्थानें जर मनुष्याची अवस्था मृत्यूच्या बाजूला कलते, तर तोच द्रवपदार्थ प्रमाणा-धिक झाला म्हणजे त्याचा मृत्यूच येणार. मनुष्याच्या जीवनक्रमांत ज्याप्रमाणें आपणास जागृती व स्वप्न हीं एकामागून एक येतांना आढळतात, त्याचप्रमाणें व्यापक सृष्टींतही दिवस व रात्र, उष्णकाळ व शीतकाल, यांचें सारखें परिवर्तन सुरू आहे.

हिरॅक्लीटसच्या या एकंदर विचारसरणीवरून अग्नि हें एकच द्रव्य सृष्टीच्या मुळाशीं कसें, हा प्रश्न सुटत नाहीं. या विवेचनांत तर आपणास सृष्टीचमत्कारांची उपपत्ती लावण्यासाठीं अग्नि, जल व पृथ्वी, हीं तीनही यथानुक्रमें जात येत आहेत असें दिसतें. हिरॅक्लीटसची आणखी अशीही कल्पना आहे कीं, अग्नीपासून पाण्याचें बाष्प होतें व बाष्पापासून अग्नि होतो व हा त्यांचा अन्योन्योपकार सारखा चालू आहे. मग अग्नि हाच सर्वांच्या मुळाशीं आहे हें म्हणण्याचा अर्थ काय असावा? हिरॅक्लीटसचें मत असें असावें कीं, सृष्ट स्थितीचा विचार करतांना आपणास अग्नीसच महत्व दिलें पाहिजे; कारण ज्या प्रमाणें मनुष्याची जागृती हीच अवस्था सर्वांत अधिक महत्वाची असून अग्निस्वरूप आहे, त्याप्रमाणें सृष्टीचें अस्तित्व हेंच महत्वाचें आहे व तें अग्निप्रधान आहे. सृष्टीच्या अभावाची वेळ कल्पावयाचीच असल्यास ती कदाचित् जलमय असेलही, पण अशी अवस्था संभवतच नाहीं. कारण सृष्टीची घडामोड प्रतिक्षणीच चाललेली असल्यामुळें असा एक काळच शक्य कोटींत मानतां येत नाहीं कीं, त्या काळीं सृष्टीची मोडच अस्तित्वांत असेल; व ज्याअर्थीं अधिक जीवमानाचें पदार्थ कमी जीवमानाचें कारण धरणें अधिक सयुक्तिक आहे, व अग्नि हा पाणी अगर पृथ्वी या पेक्षां अधिक चैतन्यमय असतो, त्याअर्थीं तोच मूळभूत असावा. जीवात्मा हाही अग्निस्वरूपच आहे, व या जगताची सुरळीत व्यवस्था लावणारी अज्ञेय शक्ती ही जीवनमय व म्हणून ती अग्निस्वरूपच असली पाहिजे. सृष्टिस्थितींत मात्र या तीन पदार्थांचें परिवर्तन सारखें चालू आहे. अग्नीचें पाणी व पाण्याची पृथ्वी होणें हें जर नीचप्रवर्तन म्हटलें तर त्याच्या उलट उच्चप्रवर्तन होय, व हें उच्चनीच प्रवर्तन नेहमीं सारखें व एकरूपानेंच चालू असतें, नव्हे एकरूपच असतें. ( Frag. 69 ) प्रत्येक पदार्थाचे जणू काय दोन समसमान अंश असतात; व एक अंश उच्च प्रवर्तनाकडे तर दुसरा नीच प्रवर्तनाकडे जात

असतो; व ही क्रिया प्रतिक्षणी सारखी चालत असल्यामुळें आपणास तो पदार्थ स्थिर आहे असा भास होतो. दीपज्योति स्थिर दिसण्याचें कारण हेंच कीं, प्रतिक्षणीं जितक्या तेलवातीचा जाळ होतो तितकाच जाळ धूर किंवा काजळाच्या रूपांत जाऊन विझला जातो. म्हणजे दीपज्योतीचा प्रतिक्षणीचा अर्धा भाग म्हणजे धूम्ररूपानें जलस्वरूप प्रवण होणारा अग्नि; व अर्धा भाग म्हणजे द्रवस्वरूपांतून अग्नीरूप झालेला अग्नि; व ही बेरीजवजाबाकी नेहमीं सारखी असल्यामुळें दीपज्योति एकरूप भासते. सृष्टी म्हणजे एक चिरकालिक अग्नीच आहे (Frag 20) व त्याच्या अंशांचेहीं असेंच उच्चनीच प्रवर्तन चालू आहे. हिरॅक्लीटसच्या एकंदर लिहिण्याच्या पद्धतींवरून आपल्या शास्त्रांतील त्रिवृत्करण किंवा पंचीकरण याप्रमाणेंच त्याची सृष्टीची उपपत्ती असावी, व आपल्या तत्त्वज्ञानामध्यें जसें तेज हें जल व पृथ्वी यांचें मूल कारण असूनही त्यांच्याशीं त्रिवृत्करणानें मिश्र झालें आहे म्हणून वर्णन केलें आहे, त्याप्रमाणेंच हिरॅक्लीटसच्या अग्नीचा व जलपृथ्वीचा संयोग झाला आहे. त्रिवृत्करण-पद्धतीत ज्याप्रमाणें वायू व आकाश या महाभूतांचा विचार करीत नाहींत त्याप्रमाणेंच हिरॅक्लीटसही त्यांजविषयीं विशेष विचार करीत नाहीं. छांदोग्योपनिषदामध्यें ९ व्या अध्यायांत यासंबंधांचें विवेचन आलें आहे. जें जें रूप रोहित म्हणजे रक्तवर्ण असेल तें तें तेजाचें, जें शुक्ल किंवा पांढरें तें तें जलाचें व जें कृष्णवर्ण तें पृथ्वीचें, अशी व्यवस्था सांगून अग्नि, सूर्य, चंद्रमा, विद्युत्, इत्यादिकांमध्यें हींच रूपें दिसतात, व म्हणून त्यांना स्वतंत्र अस्तित्व नसून तीन रूपें हेंच काय तें सत्य असें प्रतिपादन केलें आहे. हिरॅक्लीटसचे लिहिण्यांत स्पष्टपणा नाहीं, व त्याचे लेख त्रुटित असल्यामुळें त्यांची योग्य संगती लावणेंही फार कठीण आहे; परंतु त्याचे मनांत त्रिवृत्करणासारखीच कांहीं कल्पना असावी असें वाटतें. उदाहरणार्थ एकविसाव्या अवशेषांत तो म्हणतो कीं, अग्नीचा पहिला विकार म्हणजे

समुद्र होय. कारण या समुद्रामध्यें अर्धा भाग जमिनीचा व अर्धा भाग विद्युत्‌रूप अग्नीचाच आहे. परंतु हिरॅक्लीटसनें तेजस्तत्वालाच विशेष महत्त्व दिल्यानें त्याची अग्निकारणवादी म्हणून ख्याती झाली. पृथ्वी व आप यांनाही मूळकारण अग्नीच असल्यामुळें, पुढें त्रिवृत्करण साधण्यासही अग्नीच मूळ आहे, व तीन द्रव्यांचें बेमालूम एकीकरण करण्यासही अग्नीचाच उपयोग झाला असला पाहिजे. तीन प्रकारचे धातू जर एक करावयाचे असतील तर त्याला साधन अग्नीशिवाय काय आहे ? या दृष्टीनेंच अग्नि किंवा तेज याला अपरिमित महत्व असल्यामुळें त्याच तत्त्वाचा उपन्यास हिरॅक्लीटसनें वारंवार केला आहे.

अग्नीचें सर्वांत शुद्धरूप म्हणजे सूर्य होय; व हा अग्नि प्रतिदिवशीं सकाळीं पेटविला जातो व संध्याकाळीं विझविला जातो; परंतु तो प्रतिदिवशीं नवीनच असतो (Frag. 32). जर सूर्य नसता तर कायमचीच रात्र झाली असती ( Frag. 31. ) हिरॅक्लीटसला सूर्याच्या स्थिरत्वाचीही कल्पना नव्हती व पृथ्वीच्या वर्तुळाकृतीबद्दलही नव्हती. खगोलस्थ ज्योतींविषयीं त्याची अशी समजूत होती कीं, पृथ्वीवरील उष्णबाष्प जाऊन जाऊन, व तें परातीसारख्या अगर कढई सारख्या कांहीं पात्रांत साचून त्यांचा तो अग्नी झाला आहे व तीं पात्रें लहान-मोठीं असल्यामुळें त्यांचा आकार निरनिराळा आहे. चंद्राचा आकार कमीज्यास्ती होण्याचें कारण त्यांतील अग्नी, पात्र कलंडल्यामुळें कमी होतो हें असावें. ( Burnet: Greek Philosophy Part I.)

हिरॅक्लीटसच्या पूर्वी ॲनॅक्झीमँडर यानें निरनिराळीं तत्त्वें एकमेकांच्या प्रदेशावर चालून जात आहेत व त्यांचा सारखा झगडा चालू आहे असें सांगितलें होतें. हिरॅक्लीटस म्हणतो कीं, सर्व सृष्टपदार्थांची उत्पत्ति याच झगड्यामुळें झाली आहे. पृथ्वीला मारून अग्नी जन्माला येतो, अग्नी मेला म्हणजे वायू उत्पन्न होतो, वायूचा नाश तेंच पाण्याचें उत्पत्तिस्थान, आणि त्याचा नाश म्हणजेच पृथ्वीचा जन्म. सारांश अग्नी-

पासून पुनः अग्नीपर्यंत हें विकारचक्र सारखें चाललें आहे. (Frag 25) होमर कवि अशी प्रार्थना करतो कीं, मनुष्य व देव यांजमधील परस्परांचा झगडा दूर व्हावा, पण हें मागणें चुकीचें आहे. कारण तें मान्य झालें तर सर्व सृष्टीच कोणीकडच्या कोणीकडे निघून जाईल ( Frag 43 ). झगडा हाच सर्व वस्तूंचें मूळ व सत्ताधारक आहे; आणि त्यानेंच कांहींना देव तर कांहींना मनुष्यें, कांहींना स्वतंत्र तर कांहींनां गुलाम केलें आहे ( Frag. 44 ). परस्परविरोधी गोष्टींचा संयोगच सुखकर असतो. स्वरांच्या ओढाताणीनेंच मोहक संगीत उत्पन्न होतें (Frag. 46) व विरोधी संवेदनांनींच अनुकूल संवेदना सुखकर होतात. रोगाशिवाय आरोग्याची, क्षुधेशिवाय अन्नतृप्तीची, व परिश्रमाशिवाय विसाव्याची गोडी नाहीं. ( Frag. 104 ) 'निर्वाणाय तरुच्छाया तप्तस्यहि विशेषतः' हे कालिदासाचें वाक्य सर्वस्वी अनुभवसिद्धच आहे.

या जगतांत स्थिर किंवा निश्चल असें कांहींच नाहीं; व तें तसें नाहीं हेंच सर्वस्त्री हितकारक आहे. परंतु वस्तू स्थिर व एकरूप नसतांनां त्या तशा भासतात याचें कारण त्यांच्या घटनेच्या मुळाशीं आलेल्या नियमाची एकरूपता व शाश्वतता ही होय. हा नियम मात्र कोणालाही उल्लंघिता येत नाहीं. आपल्या वेदांतील वरुणाचें ऋत ज्याप्रमाणें अनुल्लंघनीय आहे, त्याचप्रमाणें हा हिरॅक्लीटसनें वर्णन केलेला नियमही त्रिकालाबाधित आहे. हा कायदा देवांनींही केला नाहीं व तो मनुष्यांच्याही स्वाधीन नाहीं. तो पूर्वी होता, आज आहे, व नेहमींच राहील ( Frag. 20. ). प्रत्यक्ष सूर्यालाही आपली मर्यादा सोडून जातां येत नाहीं. कारण तो तसें करील तर न्यायाचे साथीदार इरिन्नीस त्याला हुडकून काढतीलच. ( Frag. 29. ). वरूणाचे हेर पृथ्वीवरील व इतर ठिकाणच्याही वस्तुजातांचें असेंच अवलोकन करीत असतात.

जीवात्म्याच्या स्वरूपाविषयीं हिरॅक्लीटसच्या लिहिण्यामध्यें थोडीशी असंगति दिसून येते. जागृति, स्वप्न व मरण, ह्या तीन अवस्थांची अग्नि, जल व पृथ्वी, यांच्याशी केलेली तुलना पाहिली तर जीवात्मा हा अग्निमय असावा असें वाटतें, व याच विचाराला पोषक अशी दुसरी वाक्यें सांपडतात. उदाहरणार्थ अवशेष ६८ यामध्यें आत्म्याचा मृत्यू म्हणजे पाणी असें म्हटलें आहे. परंतु त्याच अवशेषाच्या शेवटीं जीवात्मा हा पाण्यापासून होतो असें म्हटलें आहे. जीव जर पाण्यापासून झाला तर पाणी त्याचें मरण कसें ? जीव जलमय आहे हीच उपपत्ती धरली तर त्याला पोषक वाक्य म्हणजे अवशेष ७२. त्यांत हिरॅक्लीटस लिहितो कीं, जीवाला आर्द्रता फार आवडते. पण पुनः ७४ व्यांत तो म्हणतो कीं, सर्वांत उत्तम आत्मा म्हणजे कोरडा किंवा शुष्क आत्मा होय. हिरॅक्लीटसला अस्पष्टता व गूढपणा याबद्दल जीं टोपण नांवें मिळालीं आहेत तीं अगदीं सार्थ आहेत. येवढें मात्र खरें कीं, आत्म्याच्या अपरिमितत्त्वाबद्दल त्याला मुळींच संशय नव्हता, कारण त्याच्या मतें तुम्ही कोणत्याही मार्गानें गेलांत तरी आत्म्याच्या अंतिम मर्यादा सांपडणें अशक्य होतें ( Frag 71 ). आत्मस्वरूपाच्या चर्चेमध्यें आरंभीं आरंभी असा संदिग्धपणा असणें कांहींसें अपरिहार्यच आहे. ॲनॅक्झिमीनसनें तो वायुरूप ठरविला; पण त्या स्वरूपांत तरी ओळखला, हें जसें त्याला भूषणावह झालें, त्याप्रमाणेंच हिरॅक्लीटसनें त्याचें अनंतत्त्व ओळखलें येवढीच गोष्ट पुरे आहे. याशिवाय आत्मस्वरूपाविषयीं हिरॅक्लीटसच्या दुसरा सिद्धान्त म्हणजे मरणोत्तर आस्तिक्याविषयींचा होय. हिरॅक्लीटसच्या मतें मरणोत्तर आत्मा नाहींसा होत नाहीं. मनुष्यानें ज्याची कधींही अपेक्षा केली नाहीं असें कांहीं अकल्पित त्याच्यापुढें उभें राहातें (Frag 122) आणि मग देवाला त्याला उठवावें लागतें व मग तो जीवमान व मृत यांचा संरक्षक होतो (Frag 123).

परमेश्वराच्या स्वरूपाविषयींची हिरॅक्लीटसची कल्पना फार उदात्त आहे. जगताचें नियमन करणारी शक्ती अग्नीप्रमाणें प्रकाशमय असावी हें खरें, परंतु त्या बरोबर ती शक्ती अत्यंत व्यापक व अपरिज्ञेय असल्या-मुळें त्या शक्तीचें आपणास होणारें ज्ञान औपाधिकच असलें पाहिजे. परमेश्वर म्हणजे दिवस व रात्र, शीतकाल व उष्णकाळ, संधि व विग्रह, तृप्ति व क्षुधा, या दोन्हींमध्यें सारखीच आहे. तो निरनिराळीं रूपें धारण करतो व त्या त्या रूपावरून त्याला लोक नांवें ठेवतात. वास्तविक अग्नि एकच; परंतु तो निरनिराळ्या सुगंधि द्रव्यांशीं संलग्न झाला म्हणजे लोक आपणास रुचेल तें नांव त्याला देतात (Frag. 36). परमेश्वराला सर्वच गोष्टी शुभ व सुंदर आहेत. मनुष्यें मात्र एकाला शुभ व एकाला अशुभ मानतात ( Frag. 61 ). परमेश्वरापुढे मनुष्य म्हणजे एखादें अर्भक आहे ( Frag. 97 ) जें कधींच अस्तंगत होत नाहीं त्याच्या दृष्टीच्या टप्पामधून कोण कसा निसटेल ? ( Frag. 27 ).

हिरॅक्लीटसच्या लेखावशेषांपैकीं कांहीं अवशेष नीतिपर आहेत. मनु-ष्याच्या मनाचा उत्सृंखळपणा हा एखाद्या वणव्यापेक्षां अधिक अनर्थ-कारक असल्यामुळें तो आधीं नाहींसा केला पाहिजे ( Frag. 103 ), कारण मनोविकार जिंकणें हें मोठें कठीण काम आहे. आत्म्याचा नाश झाला तरी तो पत्करून ते आपले हेतू पूर्ण करूं पहातात ( Frag. 105 ). आपला मूर्खपणा झाकून ठेवणें फार चांगलें; पण शिथिलतेच्या अगर गुंगीच्या प्रसंगीं तें फार कठीण जातें ( Frag. 108 ) म्हणून मनुष्यानें आपलें मन शिथिल होऊं देऊं नये, व व्यसनांत पडूं नये; कारण आपलें अज्ञान चवाठ्यावर आणण्यापेक्षां तें छपविलेलेंच बरें (Frag. 109). आपल्याकडील भर्तृहरीनें म्हटलेंच आहे कीं, 'विशेषतः सर्वविदां समाजे, विभूषणं मौनमपंडितानां '.

शील ही मनुष्याची संरक्षक देवता आहे. ( Frag. 121 ). मानाई पुरुष नेहमीं सावधान असतात. आतां इतकें असूनही कित्येक लबाडी करतात, पण अखेर ते व त्यांचे साथीदार पकडले गेल्यावांचून रहात नाहींत ( Frag. 118 ).

हिरॅक्लीटसच्या वेळेस, पहिल्या प्रकरणांत सांगितलेल्या ऑर्फिक धर्माचें बरेंच बंड माजलेलें असावें. या धर्मांत मूळचा पुष्कळसा चांगला भाग असला तरी त्यावर दांभिक व अवास्तव आचारांचें आवरण पडल्यामुळें तो लुप्त झाला होता. ह्या प्रकारांना उद्देशून हिरॅक्लीटस लिहितो कीं, वास्तविक पहातां धर्मकृत्यें म्हणजें आत्मशुद्धीचीं साधनें होत ( Frag. 129 ) परंतु लोकामध्यें धर्मकृत्याच्या नांवावर विकल्या जाणाऱ्या गूढ क्रिया अत्यंत अपवित्रपणें आचरिल्या जातात ( Frag. 125 ) आणि त्या आचरणांनां देवाचें नांव नसतें तर तीं कृत्यें अत्यंत लाजिरवाणीं झालीं असतीं. देव काय किंवा नरक काय, उन्मत्त मनुष्यांनां सारखींच ( Frag 127 ). पावित्र्य संपादन करावें म्हणून ते आपणास रक्तानें विटाळवून घेतात. जणूं काय चिखलानें चिखल धुतला जाईल, अशी त्यांची अपेक्षा असते. असें आचरण जर कोणी व्यवहारांत केलें तर आपण त्यास मूर्ख म्हणूं. हे लोक देव किंवा विभूति याच्या स्वरूपाचें खरें ज्ञान नसतांनां उगाच मूर्तींची पूजा करतात, पण हें मनुष्याऐवजी त्याच्या घराशीं बोलण्या इतकेंच वेडेपणाचें आहे (Frag 130).

यश संपादण्याचा जवळचा मार्ग म्हणजे चांगुलपणा (Frag 137); व ज्याची निष्कारण ख्याती झाली असेल त्यानें आपलें तोंड लपविलेलेंच चांगलें ( Frag 133 ). प्रगतीची भ्रामक समजूत ही प्रगतीला प्रतिबंधक आहे (Frag 134 ). शिक्षण म्हणजे मनुष्याचा अपरसूर्य आहे. ( Frag 135 )

तत्त्वज्ञानांतील दुसऱ्या एका महत्त्वाच्या मुद्याचीं प्रथमचिन्हें हिरॅक्ली-टसच्या मतांत प्रथम आढळतात. केवळ अज्ञ जनांच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे इंद्रियद्वारा आपणास ज्या वस्तु जशा दिसतात तशाच त्या खरोखर असतात. परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें त्या तशाच असतात असें नाहीं. यावरून सत्यज्ञान व आभासज्ञान यांचा भेद दाखविला पाहिजे. सर्व वस्तू एकरूप आहेत हें तत्त्व सत्य आहे म्हणून अंगिकारलें जावें. ( Frag 1 ) या सत्याच्या अनुरोधानेंच सर्व चाललें आहे, परंतु मनुष्यांनां तें कळत नाहीं, व कोणी सांगितलेलें खपत नाहीं. जे लोक समजल्याशिवायच ऐकतात, ते बहिरेच म्हणावयाचे; ते हजर असून गैरहजर ( Frag 3 ). सत्यज्ञान हें अनायासानें प्राप्त होणारें नाहीं. सोनें शोधावयाचें म्हणजे पुष्कळ माती खणावी लागते तेव्हां कोठें थोडेसें सोनें हातीं लागते ( Frag. 8 ). कान व डोळे वास्तविक पहातां सत्यज्ञानाची साधनें नाहींत; ( Frag. 4 ) पण त्यांतल्यात्यांत कानांपेक्षां डोळे अधिक सत्यवादी आहेत. ( Frag. 15 ) आपली ' चक्षुर्वै सत्यं ' म्हण प्रसिद्धच आहे.

जर सर्व जगत् धूम्रमय असतें, तर मात्र घ्राणेंद्रियच ज्ञान साधन झालें असतें ( Frag. 37 ).

मूर्ख लोकांना सत्यज्ञानाची किंमत कळत नाहीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. गाढवाला सोन्याच्या राशीपेक्षां उकिरडाच अधिक आवडतो. ( Frag. 51 ) डुकराला चिखलच चांगला ( Frag. 53 ). मनुष्य अनोळखी असला म्हणजे झाले. कुत्रा त्याजवर भुंकलाच. ( Frag. 115 ). पण, माझ्या मतानें जर एक मनुष्य खरा उत्तम असेल तर तो हजारांच्या तोडीचा आहे ( Frag. 113 ). मनुष्याच्या गैरविश्वासामुळेंच दिव्य गोष्टींचें ज्ञान होत नाहीं ( Frag. 116 ).

वरील सर्व उताऱ्यांमध्यें सत्यज्ञानाची अवश्यकता व मनुष्यामनुष्यांच्या ज्ञानांतील फरक हा सुचविला गेला आहे हें खरें; पण इंद्रियजन्यज्ञान व विचारजन्यज्ञान हा भेद अद्याप हिरॅक्लीटसला सुचलेला नाहीं. त्याच्या मतें ज्ञान म्हणजे बाहेरील व आंतील अग्नीचें संवादित्व. परंतु हें संवादित्व होण्याला मार्ग म्हणजें इंद्रियेंच असल्यामुळें एकाचें असत्यज्ञान दुसऱ्याच्या सत्यज्ञानाहून भिन्न कसें, हें दाखविण्यास त्याला मार्ग नाहीं. मनोव्यापार ( thought ) व इंद्रियव्यापार ( perception ) यांचा भेद अद्याप प्रकट झाला नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

हिरॅक्लीटसनें केलेली तत्त्वज्ञानाची सेवा मोठी महत्वाची आहे यांत कांहींच शंका नाही; व त्याच्या मतांचा जों जों अधिक विचार करावा तों तों त्याचें महत्त्व अधिकाधिक वाटूं लागतें. परंतु त्याच्या मतांतील अत्यंत मोठा दोष म्हणजे त्याचा क्षणिकवाद अगर अस्थिरवाद होय. या जगतांत शाश्वत असें कांहींच नाहीं ही कल्पनाच किती चमत्कारिक वाटते! या जगतांत आपण तरी स्थिर आहोंत काय? जर नसलों तर आपणास ज्ञान तरी कसें होतें? इत्यादि विचार एकदम उद्भूत होतात. या जगतांत शाश्वत असें कांहींच नाहीं हें पाहून आपली स्थिति एखाद्या फुटलेल्या गलबतावरील खलाशांसारखी होते.

हिरॅक्लीटसच्या मतानें नानाविधवस्तूंचें नियमन करणारा कायदा एकरूप आहे खरा, पण हें नियमन म्हणजे तरी काय आहे? तो एक सृष्ट पदार्थच असेल तर मग इतर सृष्ट पदार्थांप्रमाणें त्याचें नियमन करणारा दुसरा कोणी पाहिजे. हा कायदा करणारा परमेश्वर असून तो मात्र शाश्वत आहे, असेंही हिरॅक्लीटस स्पष्टपणें म्हणत नाहीं. बरें हा कायदा एक सृष्ट पदार्थ नाहीं म्हणावें तर त्याचा व सृष्ट पदार्थांचा संबंध तरी कसा येणार? व त्यानें त्या सृष्ट पदार्थांचें नियमन तरी कसें होणार? आत्मा मरणानंतर असतो म्हणून हिरॅक्लीटस मानतो हे खरें, पण याचा

अर्थ इतकाच कीं, मरणानंतर तो पुनः अग्निस्वरूप होतो व पुनः परिभ्रमणांत सांपडतो. पण एका मनुष्याचा आत्मा त्या स्थितींत दुसऱ्यापासून निराळा असत नाहीं. येवढेंच नव्हे, तर त्या आत्म्याचें स्वरूपही कायम राहत नाहीं. हिरॅक्लीटसचें हें मत जवळजवळ क्षणिक विज्ञानवादी किंवा शून्यवादी बौद्धपंथांतील मताप्रमाणें आहे; परंतु या मतानें मनुष्याच्या मनाचें समाधान होत नाहीं. त्याला कांहींतरी शाश्वत तत्त्वाचा आश्रय पाहिजे व त्या तत्त्वाचा व आपला कांहींतरी दृढसंबंध पाहिजे.

हिरॅक्लीटसनें क्षणित्वावर जोर देऊन व वैकृतिक पक्ष स्वीकारून आपलीं मतें पुढें मांडलीं, व त्याची नैसर्गिक प्रतिक्रिया म्हणजे स्थिरत्व मताचा व प्राकृतिक पक्षाचा अतिरेक अशी झाली. या मताचे पुरस्कर्ते व त्यांचीं मतें यांजकडे आपणास आतां वळावयाचें आहे.



## प्रकरण ४ थें

## झेनोफेनस.

झेनोफेनस हा मूळचा कोलोफनचा रहिवाशी असून तो पुढें इलिया येथें रहावयास गेला व तेथेंच त्यानें आपल्या मतांचा प्रसार केला. यावरून झेनोफेनसच्या मतांना व परंपरेला ' इलिया येथील पंथ ' ( The Eleatic School ) असें नांव देण्यांत आलें आहे. झेनोफेनसचा जन्म कधीं झाला या विषयीं वादच आहे; परंतु तो साधारणतः ख्रि. पू. ५८० वर्षें झाला असावा, हें बरेंच संभवनीय दिसतें. अयोनियांतील वसाहतींचें जें व पारसीकांचें जें मोठें युद्ध झालें, त्यावेळीं झेनोफेनस फार तरुण होता असें त्याच्याच लिहिण्यावरून दिसतें. आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षीच त्याला आपल्या जन्मभूमीचा त्याग करून सिसिलीची वाट सुधरावी लागली, व तेथून पुढें इटलीमध्यें जाऊन तो इलिया येथे राहिला. ज्याप्रमाणें पायथॅगोरॅसला आपली जन्मभूमी सॅमॉस येथें राहणें बरें वाटलें नाहीं, व त्यानें देशत्याग करून दक्षिण इटलीचा मार्ग सुधरला, त्याप्रमाणेंच झेनोफेनसच्या मार्गांतही कांहीं अडचणी उपस्थित झाल्यामुळें त्यालाही देशत्याग करणें भाग पडलें असावें.

याशिवाय पायथॅगोरसपेक्षां झेनोफेनसला देशत्याग करण्यास अधिक कारण म्हणजे त्याचा पेशा. झेनोफेनस हा एक कवी किंवा शाहीर होता, व शाहिराच्या धंद्याला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं फिरत राहण्याची प्रवृत्ति होणें अगदीं साहजिक दिसतें. झेनोफेनस आपल्या वयाच्या ९२ व्या वर्षी देखील कवीता रचीत असे व आपल्या कविता तो स्वतः गाऊन दाखवीत असे असें म्हणतात. इलिया शहरच्या संस्थापन प्रसंगावर त्यानें दीर्घवृत्तात्मक २०००, कवितापंक्ती केल्या

होत्या असें डायोजीनसचें म्हणणें आहे. अशा रीतीनें नानाविध विषयांवर यथाप्रसंग प्रबंधरचना करणारा कवि आपल्या काव्यांचा लौकिक वाढविण्यासाठीं एका देशांतून दुसऱ्या देशांत जाणें अगदीं साहजिक आहे. पारसीकांच्या स्वाऱ्यांमुळें आयोनियाची जी नासाडी झाली त्यामुळें याच्या काव्यप्रवृत्तीला अधिक उत्तेजन मिळालें असावें.

झेनोफेनस हा मुख्यतः कवि असूनही तत्त्वज्ञानाच्या इतिहासामध्यें त्याचें नांव चिरस्मरणीय होण्यास त्याच्या काव्यांतील कांहीं विशिष्ट विषयांनां अनुलक्षून प्रकट केलेले विचार हे कारणीभूत झाले. एखाद्या नगरच्या संस्थापनेबद्दलच त्यानें कविता रचल्या असत्या, रणांगणावर पडलेल्या वीरांचें यश गाइलें असतें, किंवा केवळ हृदय हालवून सोडणारे करुणरसभरित प्रसंग वर्णिले असते तर त्याची ख्याती केवळ कवि या नात्यानेंच झाली असती. परंतु त्याच्या काव्यांतील विषय म्हणजे परमेश्वराचें स्वरूप, सृष्टीची रचना, सामाजिक चालीरिती, अशा प्रकारचे असल्यामुळें, त्याचा संबंध प्रतिभामय काव्यापेक्षां बुद्धिगम्य तत्त्वज्ञानाकडेच अधिक येतो. झेनोफेनसनें स्वतः ॲनॅक्झिमँडरचें शिष्यत्वही पत्करलें होतें, व पायथॅगोरॅसशी तो समकालीन असून या दोनही पुरुषांच्या मताविषयीं झेनोफेनसनें आपल्या ग्रंथावशेषांमध्यें उल्लेख केला आहे. याशिवाय झेनोफेनसचीच विचारपरंपरा पुढें पारमिनाइड्स, झेनो, मेलीसस्, इत्यादिकांनीं कमीअधिक प्रमाणावर कायम ठेऊन, तिला पूर्वीं अवगत नसलेला कोटिक्रमाचा दुजोरा दिला, व तर्कपद्धतीचें बीजारोपण केलें. यामुळेंही झेनोफेनसच्या मतांनां अधिक महत्व आलें आहे.

झेनोफेनसच्या मतांतील पहिला अत्यंत महत्वाचा विषय म्हटला म्हणजे देव किंवा देवता यांचें स्वरूप हा आहे. होमर किंवा हिसिअड यांनीं नानाप्रकारच्या देवदेवतांबद्दल विविध कथा रचल्या होत्या, व या देवांचेंच लोक भजन पूजन करीत होते, व त्यांनां खूष करण्याक-

रितां त्यांनां हविर्भाग देत होते. तत्त्वज्ञानाच्या अगदीं प्रथमावस्थेंतच अशा देवताविषयक कल्पनांचा व तत्त्वविचारांचा बेबनाव होतो असें पहिल्या प्रकरणांतच सांगण्यात आलें आहे. थेल्सची मोठी कामगिरी म्हणजे ओशिआनस व थेटिस यांचीं देवतात्मकरूपें झुगारून देऊन त्यांच्या जागीं नयनगोचर जलाची स्थापना करणें ही होय. झेनोफेनस हा या बाबीपुरता थेल्सच्या पंथाचा अनुयायी होता म्हणून म्हटलें तरी चालेल. होमर आणि हिसिअड यांनीं दिलेली देवाची कल्पना अत्यंत अपरिपूर्ण, येवढेंच नव्हे तर कांहीं कांहीं प्रसंगी कुमार्गदर्शक आहे, असें झेनोफेनसचें म्हणणें आहे. " ज्या गोष्टी मनुष्यानें केल्या असतां तो पापी व अनीतिमान् होतो, त्याच अश्लाघ्य गोष्टी देव करतात असें होमर व हिसिअड यांनीं दाखविलें आहे; आणि अशा गोष्टी म्हणजे चोरी, व्यमीचार व विश्वासघात, " ( Fragment 7 ). दुसऱ्याची वस्तु चोरली असतां देव जर गुन्हेगार ठरत नाहीं, परदारागमनासारखीं पापें करूनही देव जर पतित होत नाहीं, किंवा दुसऱ्याचा विश्वासघात करण्याचीही त्याला दिक्कत वाटत नाहीं,तर मग मनुष्याला मात्र कठीण निर्बंध कां घालावे? आणि जर ते नियम मनुष्याला लागू करावयाचे तर देवांनांही ते उल्लंघिल्याबद्दल शिक्षा कां होऊं नये? आणि ते मनुष्यापेक्षां अधिक बळकट आहेत येवढयावरच ते हे नियम मनुष्यांवर लादीत असतील, तर तें नीतिबंधन नसून अत्यंत तिरस्करणीय असा जुलूम आहे. येवढेंच नव्हे, तर देवांनां मर्त्यधर्म देणें हेंहीं अनुचित आहे. वास्तविक पहातां देव एकच आहे व तोच सर्व मनुष्यांमध्यें व देवांमध्यें श्रेष्ठ आहे. आणि तो शरीरानें किंवा मनानें मनुष्यांसारखा नाहीं ( Frag 1. ) परंतु मनुष्य आपल्या कोत्या समजुतीनें म्हणतो कीं त्यांच्या प्रमाणेंच देवही जन्माला येतो, वस्त्रप्रावरण घेतो व बोलतो चालतो (Frag 5.) अशा रीतीनें देवाला मर्त्यधर्मालंकृत करणें अगदीं वेडेपणाचें आहे. " जर कदाचित् पशूंनां हात असते व त्यांच्या मध्यें लेखनकलेचा

प्रसार होऊन त्यांनीं विविध कलाकुशलतेचीं कामें केलीं असतीं, किंवा ग्रंथ रचले असते, तर त्यांनींही आपले देव आपणासारखेच कल्पिले असते. घोड्यांचा देव घोड्यांसारखा व पशूंचा पशूसारखा झाला असता." ( Frag 6. ) पण ही कल्पना खोटी आहे असें आपणास पटतें, परंतु मनुष्य स्वतः अशीच चूक करीत नाहीं काय? आपल्या स्वतः भोंवतालची संकुचित परिस्थितीच लक्षांत ठेऊन तो देवाचें कल्पनाचित्र रंगवीत नाहीं काय? इथिओपियन लोक आपले देव काळे व नकटेच कल्पितात; तेच थ्रेस येथील लोक त्यांनां तांबडे केस व निळे डोळे आहेत अशी कल्पना करतात. (Xenophanes Sayings) यावरून मनुष्याची देवाविषयींची सर्व कल्पना भ्रामक आहे, व तो घोडा किंवा गाढव या सारखा नाही हें जितकें खरें, तितकेंच तो मनुष्यासारखा नाहीं हें खरें आहे. अशा रीतीनेंच विचारपरंपरा चालू केली तर परमेश्वराच्या स्वरूपाचें सत्यज्ञान मनुष्याला केव्हांच होणें शक्य नाहीं असें म्हणावें लागेल. परंतु झेनोफेनसच्या मतानें ही इष्टापत्तीच आहे म्हटलें तरी चालेल. "आजपर्यंत असा एकही मनुष्य झाला नाहीं कीं, ज्याला मी देवासंबंधी अगर इतर वस्तुजातासंबंधी काय म्हणतो हें बरोबर समजेल, व असा मनुष्य पुढेंही होणें शक्य नाहीं. येवढेंच नव्हे तर एखाद्या मनुष्याचें मत खरें असलें तरी तें तसेंच आहे असें त्याला खात्रीनें सांगता येणार नाहीं. प्रत्येकाला केवळ ज्ञानाभास मात्र आहे ( Frag. 14 )" "मी तरी जें सांगतों तें जवळजवळ सत्यरूप असावें अशी माझी समजूत आहे येवढ्याच करतां. ( Frag. 15 ). "प्रथमतः देवांनीं मर्त्यांनां आपल्या गोष्टी उघड करून दाखविल्या नाहींत, मनुष्यांनीं आपल्या प्रयत्नांनीं अधिक जाणिल्या" (Frag. 16).

वर निर्दिष्ट केलेलें झेनोफेनसचे विचार एखाद्या आधुनिक तत्त्वज्ञान्याला शोभतील असे आहेत. मनुष्याचें ज्ञान हें नेहमीं एकदेशी असल्यामुळें निरपेक्षतेनें सत्यज्ञानप्राप्तीची विरलता व म्हणूनच कोणत्याही

गोष्टीविषयीं मत बनवून घेण्यापूर्वी खबरदारी बाळगण्याची सूचना, ही आधुनिक काळालाही अत्यंत परिचित आहेत. या शिवाय वरील विचारांमधील दिसून येणारी निसर्गधर्मश्रद्धा (Naturalism) हीही आधुनिक काळीं परिचित आहे. झेनोफेनस हा होमर किंवा हिसिअडच्या देवांचें स्वरूप दोषमय आहे असें दाखवून एका अत्यंत श्रेष्ठ देवाविषयीं लिहितो असें म्हटलें, परंतु त्यावरून झेनोफेनस हा एकेश्वरवादी होता असें समजूं नये. "तो सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहे" या म्हणण्यावरूनच इतर देवानांही झेनोफेनसच्याच मतानें कांहीं सापेक्ष सत्यता असली पाहिजे असें दिसतें. एखादा एकेश्वरवादी म्हणेल कीं, परमेश्वर हा सर्व सृष्टीचें सार आहे, परंतु झेनोफेनसच्या म्हणण्याचा तसा भावार्थ दिसत नाहीं. विश्व आणि परमेश्वर यांजमध्यें त्याला फरकच वाटत नाहीं. हें विश्व म्हणजेच परमेश्वराचें अनंत व अखंड स्वरूप आहे, आणि होमर हिसिअड सारख्या कवींनीं निर्माण केलेले क्षुद्र देव विचाराच्या तीक्ष्ण प्रहारापुढें ढांसळून जाऊन अखेर याच सृष्टीरूपांत मिसळून जातात, हा झेनोफेनसच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे, व त्याच्यानंतर पुष्कळ शतकांनीं झालेल्या स्पिनोझाचेंही मत जवळ जवळ असेंच होतें. देवादिकांची सृष्टिव्यापाराला कांहीं जरूर नाहीं हें दाखविण्यासाठीं झेनोफेनस त्या सृष्टिव्यापारांची नैसर्गिक उपपत्ती प्रदिपादतो. होमरनें इरिस या नांवाची एक इंद्रधनुष्याची अधिष्ठात्री देवता कल्पिली आहे, पण वास्तविक पहातां इंद्र-धनुष्य म्हणजे चित्रविचित्र रंगाचा ढग आहे. ( Frag 13. ) याचप्रमाणें चंद्रसूर्यादिक खगोलस्थ ज्योती ह्या प्रकाशमान मेघच असले पाहिजेत; व ज्या प्रमाणें ठिणग्या अंधारांत चमकतात त्याचप्रमाणें हें प्रकाशमान मेघ रात्रीं चमकतात. या विश्वाची उत्पत्ति पाणी व पृथ्वी यांपासूनच झाली आहे. ( Frag. 8,9,10,11. )

वरील मतदिग्दर्शनावरून हें उघडच होतें कीं, झेनोफेनस हा थेल्सच्या मताचा अनुवाद करीत आहे, व शास्त्रीयज्ञानाच्या जोरावर तो पुराणप्रसिद्ध देवतांना पदच्युत करीत आहे. पण याचा अर्थ झेनोफेनसचा या शास्त्रीय उपपत्तीवर विश्वास होता असें नव्हे. मायलीटस येथें जें शास्त्र-ज्ञान प्रचलित होतें, त्या शास्त्रज्ञानामध्यें झेनोफेनस हा फार माग-सलेला होता असेंच म्हटलें पाहिजे. ॲनॅक्झिमँडरचें त्यानें शिष्यत्व पत्करलें असून देखील तो असें म्हणतो कीं, पृथ्वीची वरची मर्यादा म्हणजे अगदीं आपल्या पायांजवळ आहे, पण तिची अधोमर्यादा अज्ञान आहे, ती खालीं निर्मर्यादच आहे. ( Frag. 12 ) म्हणूनच सूर्याला पृथ्वी खालून पुनः पूर्वेकडे यावयास मार्गच नाहीं. व प्रत्यही आपणास दिसणारा सूर्य, हा नेहमीं नवानवाच असतो. यावरून झेनोफेनस भौतिक-शास्त्रांत त्या काळाच्या मानानेंही किती मागसलेला होता हें उघड दिसतें. त्यानें थेल्स किंवा त्याचे शिष्य यांचा अनुवाद केला, तो केवळ येनकेन प्रकारेण होमर हिसिअडचे देवदेवतासंबंधीं मत पदच्युत करण्यापुरताच. मीं दिलेलीं मतें हीं सत्यस्वरूप नसून सत्यसदश आहेत असें त्यानें सुचवून ठेविलेंच आहे. वास्तविक पहातां सत्ता ही एकरूप व अचल आहे. व ती नाना स्थळीं जावी हेंच अनुचित आहे, असें झेनोफेनसचें म्हणणें आहे ( Frag. 4 ) व याच मतावर पुढें पारमिनाइड्स व झेनो यांनीं आपलें पांडित्य लढविलें आहे. सृष्टी ही केवळ एकरूप म्हणजे सत्तारूप व अविकृत आहे. ॲनॅक्झिमँडरच्या मतें सृष्टीच्या मुळाशीं कांहीं अव्यक्त व सत्तारूप वस्तु आहे हें खरें, पण हीच वस्तू पुढें व्यक्त स्वरूप धारण करते व नाना-विध सृष्टीची रचना होते अशी त्याची उपपत्ती आहे. परंतु झेनोफेनसच्या मतें ही नानाविधता वस्तुगत नसून भ्रमात्मक आहे. जें कांहीं सत्तारूप आहे तें कधीं उत्पन्नही होणें शक्य नाहीं, व नाश पावणेंही शक्य नाहीं. मनुष्याला सृष्टी किंवा नाश झाल्याचा भास होण्याचें कारण केवळ त्यांच्या मनाचा विकार होय. म्हणून सत्यवस्तू म्हणजे अविकार्य सत्ता होय.

येथपर्यंत झेनोफेनसच्या वरिष्ठ मतांचें दिग्दर्शन झालें, परंतु त्याच्या कामगिरीचा दुसरा भाग म्हणजे आयोनियात प्रचलित झालेल्या फाजील चैन बाजीला व छानछोकीला त्यावर कडक टीका करून आळा घालणें हा होय. आयोनियांतील ग्रीक लोक, लिडिअन लोकांच्या संगतीनें त्यांचा सर्व डामडौल व ख्यालीखुशाली शिकले होते, व त्याचें उगमस्थान सार्डिस हें असून सॅमॉसच्या पॉलीक्रेट्सचा दरबार म्हणजे त्याचें अगर होतें. ही ख्यालीखुशाली विशेष रानदटपणाची नव्हती पण फार घातक होती; व तींतील मुख्य दोष म्हणजे राष्ट्राला कमजोर व निरुत्साही करण्याची प्रवृत्ती हा होता. या परिस्थितीमध्यें खि. पू. ६ व्या शतकाच्या अखेरीस एकदम परिवर्तन झालें व या परिवर्तनाचें निमित्त-कारण म्हणजे आयोनियावर मीडस लोकांची झालेली स्वारी हें होय. या स्वारीबरोबर ग्रीक लोकांचे डोळे उघडले व आपला गमावलेला साधेपणा पुनः मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न सुरू झाला. पोषाखांत व राहणींत अधिक साधेपणा पण करारीपणा यावा अशाबद्दल प्रयत्न सुरू झाले. झेनोफेनस हा याच चळवळींतील प्रमुख कवि होय. त्याच्या ग्रंथावशेषांमध्यें आपणास या चैनबाजीची निंदा केलेली आढळते. लिडिअन लोकांपासून आयोनियांतील ग्रीक लोकांनीं घातक चैनबाजी मात्र उचलली व हजारो लोक गुलाबी पोषाख घालून बाजारांत हिंडूं लागले. ते आपल्या सुगंधतैलविभूषित केशकलापांचे कौतुक करता करतांच बेजार होत ( Frag. 20 ). असे लोक काय पराक्रम करून दाखविणार व शत्रू-पासून आपल्या देशबांधवांचें संरक्षण तरी कसें करणार? अशा ख्यालीखुशा-लीच्या लोकांनां यथेच्छ जेऊन दारू पितां पितां बोलण्याचा विषय म्हणजे तुम्ही कोण, कोणाचे, तुमचें वय काय? मीड्स लोकांनीं या प्रांतावर स्वारी केली त्यावेळीं तुमचें वय काय होतें, हाच काय तो विषय (Frag. 17) त्यांनां दुसरा गहन विषय समजणार कोठून? आपल्याला दारू प्यावयाची व यथास्थित मेजवानी झोडावयाची तर पहिल्या प्रथम म्हणावें एक देवाचें

स्तोत्र, आपलें आचरण चांगलें ठेवण्याबद्दल बुद्धि दे म्हणून हवी तर प्रार्थना करावी, आणि मग यथेच्छ हात मारून घ्यावा. दारू पिऊन झिंगल्यामुळें घरीं जावयास गुलामाच्या मदतीची जरूर लागली नाहीं म्हणजे झालें ( Frag. 21 ).

या ख्याली-खुशालीप्रमाणेंच, केवळ शारीरिक सामर्थ्याचें स्तोम माजविणेंही झेनोफेनसला मुळींच पसंत नव्हतें. एखाद्या वीरानें, कुस्ती, दौड, किंवा इतर मर्दुमकीचे खेळ यामध्यें विजय मिळविला, येवढ्यावरच त्याला मोठा मान दिला जातो व जेथें तेथें त्याला अग्रस्थान देण्यांत येतें पण ही मोठी चूक आहे असें झेनोफेनला वाटे. नुसत्या शारीरिक सामर्थ्याची काळजी वाहणारा इसम खेळांच्या सामन्यांत बक्षिस जिंकून येईल; पण म्हणून त्याला एखाद्या शहराचा अगर संस्थानाचा कारभार चालवितां येईल काय? त्याला बुद्धिमान् पुरुषाचीच जरुरी आहे. अशा बुद्धिविशिष्ट पुरुषांवाचून देश समृद्ध होणार नाहीं.

तत्त्वज्ञानाच्या इतिहासाच्या दृष्टीनेंच विचार केल्यास झेनोफेनसची हीं मतें कांहीं विशेष महत्वाचीं नाहींत. झेनोफेनसच्या शिष्यपरंपरेमध्यें प्रसृत झालेलें मत म्हणजे वस्तूच्या अचळस्वरूपाबद्दलच होय, व पुढील हकीगतीमध्यें आपणास ह्या मताचें समर्थन कसें करण्यांत आलें हें पहावयाचें आहे. हिरॅक्लीटसनें सृष्टीचें चलस्वरूप प्रधानत्वानें पुढें आणून वैकृतिक पक्ष स्विकारला व झेनोफेनसनें त्याच्या उलट वस्तूचा अचल व अविकृत स्वभाव पुढें मांडला. झेनोफेनसनें हा पक्ष नुसता सुचवून दिला. त्याला कुशल कोटिक्रमानें सजविण्याचें काम त्याच्या शिष्यवर्गांनीं कसें केलें त्याचीच हकीगत आपणास आतां पहावयाची आहे.

---

# पारमिनाइड्स

पारमिनाइड्सचा जन्म खुद्द इलिया येथेंच सुमारें खि. पू. ५१५ या वर्षीं झाला. त्याच्या बापाचें नांव पिरस ( Pyres or Pyrrhes ) असें असून त्याचें कुटुंब श्रीमान होतें, परंतु पारमिनाइड्सनें आपला सर्व काळ तत्त्वविचारांतच घालविला. त्यानें इलिया शहराकरितां कायदे करून दिले असें कित्येकांचें म्हणणें आहे; परंतु या म्हणण्याला विशेषसा आधार नाही. त्यानें कांहीं कायदे तयार केले असल्यास ते इलिया संस्थानाच्या अंतर्गतव्यवस्थेसाठी होते अगर कांहीं विशिष्ट मंडळाच्या संघटनेसाठीं होते हाही प्रश्नच आहे. झेनोफेनसच्या तत्त्वविचारांची व्यवस्थित मांडणी करून त्याला रंगरूपास आणण्याबद्दलच विशेषतः पारमिनाइड्सची ख्याति आहे. पारमिनाइड्सनें फार तरुणपणींच ग्रंथरचना करण्यास सुरवात केली असें दिसतें. कारण त्याच्या ग्रंथांत त्यालाच उद्देशून ' तरुणपुरुषा, ' असें संबोधन एका देवतेनें वापरल्याचें त्यानें दाखविलें आहे. मागील प्रकरणांत सांगण्यांत आलेंच आहे कीं पारमिनाइड्स हा हिरॅक्लीटसनंतर झाला असून हिरक्लीटसची उपपत्ती खोडून काढणें हा पारमिनाइड्सचा एक हेतु होता व त्या धोरणानें त्याच्या ग्रंथामध्यें हिरक्लीटसविषयीं उल्लेख सांपडतो. पारमिनाइड्सचा तत्त्वविचार–व्यासंग अगदीं वृद्धापकाळापर्यंत चालू होता; तो आपल्या वयाच्या पासष्टाव्या वर्षी अथेन्स येथें गेला होता व त्यावेळीं तरुण सॉक्रेटिसाबरोबर त्याचा संवाद झाला असल्याविषयीं प्लेटोनें लिहिलें आहे. अथेन्स येथील लोकांच्या दृष्टीस पडलेला जुन्यातजुना तत्त्वज्ञ म्हणजे पारमिनाइड्स हाच होय.

पारमिनाइड्सचा ग्रंथावशेष दीर्घवृत्तात्मक आहे. ही दीर्घवृत्तात्मक रचना तत्त्वविचारांना मोठीशी अनुकूल नाहीं; व झेनोफेसनच्या काव्यांत दिसून येणारें कवित्वही तींत नसल्यामुळें ती अगदींच अस्थानी असल्यासारखी वाटते. अमुक एका तऱ्हेचे विचार पद्यांत गोंवले

गेले तरच ते चांगले, अशा अंधपरंपरात्मक भावनेनेंच पारमिनाइड्सनें वृत्तात्मक रचना केली असें दिसतें. त्याच्या काव्यांतील कल्पनाही फार रूढ आहे, व पारमिनाइड्सच्या वेळींहि ती फार प्रचलित असावी. कवी स्वतः स्वर्गांत अगर नरकांत जाऊन ज्ञान संपादन करून येतो, हा त्यांतील मतितार्थ आहे; व पारमिनाइड्सच्या ग्रंथानंतरचीं अशीं सर्व–प्रसिद्ध उदाहरणें म्हणजे प्लेटोचें फीड्रस व इटालियन कवी डांटे याचें प्याराडिझो हीं होत.

पारमिनाइड्स आपल्या ग्रंथामध्यें अशी कल्पना करितो कीं, तो एका रथांत बसून सर्व वस्तूंचें ज्ञान करून देणाऱ्या देवतेकडे चालला होता व सूर्यकिरणस्वरूपी कुमारिका त्याच्या मार्गदर्शक झाल्या होत्या. याच सूर्य–कुमारिकांनीं त्याचा रथ तमोमय प्रदेशांतून तेजोमय प्रदेशांत जातांना लागणाऱ्या दरवाजांजवळ आणला व त्याच्यासाठीं न्यायदेवतेची विनवणी करून तो दरवाजा उघडविला व त्याचा रथ थेट देवतेपर्यंत पोंचविला. देवतेनें मोठ्या प्रेमानें त्याचें स्वागत केलें व त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. कवी, आधींच तेजोमय व म्हणूनच सत्य अनुभवाला अनुकूल परिस्थितींत आलेला, व त्यांत अशा देवतेचा प्रत्यक्ष उपदेश, मग त्याचा फायदा किती झाला याचें काय वर्णन करावें! देवतेनें उपदेशाची अमूक एक बाब म्हणजे शिल्लक ठेविली असें नाहीं. सत्य काय व वस्तुस्वरूप काय, याची तिनें फोड केली. जगतांतील सत्य वाटणाऱ्या पण वस्तुतः आभासात्मक उत्पत्ती कोणत्या इत्यादि सर्व विषयांचा त्या देवतेनें उहापोह केला व कवीला ज्ञाता करून सोडिलें.

वरील लेखामध्यें पारमिनाइड्सनें आपणास देवतेकडून ज्ञानप्राप्ती होऊन आपलें स्थित्यंतर कसें झालें हें दर्शविलें आहे. परंतु हें स्थित्यंतर निबिड अंधःकारांतून ठेंचाळणाऱ्या मनुष्याला प्रकाशदर्शन, किंवा गहन अरण्यांत तृषाकुल होऊन वणवण फिरणाऱ्या प्रवाशाला एखाद्या अच्छोद सरोवराचें दर्शन अशाच स्वरूपाचें नसून, वास्तविक अंधःकार-

मय प्रदेशांतच असतां भ्रामक व नाशकारक अशा भूतपिशाच्यांच्या दिवट्यांनीं भुलविल्या जाणाऱ्या मनुष्याला सूर्यदर्शन व्हावें, किंवा मृगजळाच्या आभासमय जलाकडे धांव मारतां मारतां थकल्या भागलेल्या प्रवाशास अमृतमय जलाचा पाऊस भेटावा, त्याप्रमाणें असावें असें भासतें. देवतेकडून सत्यज्ञान प्राप्त होण्यापूर्वी लेखक निखालस अज्ञानीच होता, येवढेंच नव्हे तर खोटया तत्त्वज्ञानानें भ्रमिष्ट झालेला असला पाहिजे; व या भ्रमक तत्त्वज्ञानाकडे पुनः न वळविण्याविषयीं त्यानें खबरदारी घ्यावी म्हणूनच देवतेनें खोट्यानाट्या मतांचा एवढा तपशिलवार उपन्यास केला असावा. पारमिनाइड्स हा प्रथमतः पायथॅगोरॅसचा अनुयायी होता, व पुढें तो झेनोफेनसचा अनुयायी झाला. हें त्याचें मतांतर म्हणजेच देवतेचा कृपाप्रसाद असा पारमिनाइड्सचा मतलब असला पाहिजे. पारमिनाइड्स एका काळीं पायथॅगोरॅसच्या पंथांत असावा, या म्हणण्याला बराच पुरावा आहे. पायथॅगोरिक पंथांतील आपला पहिला शिक्षक एमीनिअस ( Ameinias ) याचें स्मारक म्हणून त्यानें एक समाधि बांधली असून, त्या समाधीवर जो मृत्युलेख आहे त्यावरूनच वरील संबंधाचा तर्क झाला आहे. स्ट्रॅबोनें दिलेल्या माहितीप्रमाणें पारमिनाइड्स व झेनो हे दोघेही पायथॅगोरियनच होते व आयांब्लिकॉसनें ( Iamblichos ) संभाळून ठेविलेल्या पायथॅगोरियनांच्या यादींतही पारमिनाइड्सचें नांव सांपडतें. पारमिनाइड्सनें भ्रामक म्हणून जें मत देवतेकडून वदविलें आहे, तें एखाद्या अज्ञ मनुष्याचें नसून साधक बाधक प्रमाणांचा विचार करून बसविलेलें भासते. परंतु तें चुकलेलें आहे असें म्हणण्याचा रोख पारमिनाइड्सचा दिसतो. या सर्व गोष्टींना जुळते येण्यास एक पायथॅगोरियन मतच योग्य आहे.

याजवर कोणी असा आक्षेप घेतील कीं, जर पारमिनाइड्सला पायथॅगोरॅसचें मत इतकें त्याज्य वाटत होतें, तर त्यानें येवढा काळजीपूर्वक त्याचा उपन्यास तरी कशाला केला ? पण असा प्रश्न करणें म्हणजे वाद-

विवादात्मक पद्धतींतील मर्माचें अज्ञान प्रकट करण्यासारखें आहे. पूर्व पक्षाच्या उठावाशिवाय सिद्धांताचें स्वरूप चांगलें उमटत नाहीं; व पूर्वस्थितींतील विपत्तीच्या भेसूर चित्राशिवाय उत्तरकालीन संपत्ति फिक्की वाटते. फार काय पण असा पूर्वपक्षाचा उपन्यास करण्याची ही पद्धतीही पायथॅगोरिक पंथांत फार प्रचलित होती, व याचें दर्शक म्हणून इंग्रजीभाषेंतील Y या अक्षरासारखें एक अक्षर वापरण्याचा त्यावेळीं रिवाज पडला होता. सत्यासत्याचा कांहीं एक मार्ग साधारण असला तरी, असा एक बिंदू येतो कीं, जेथें त्या दोन मार्गांची फारकत पडते व एका मार्गाचा त्याग करून दुसऱ्यामार्गाकडे वळल्याशिवाय मनुष्याचा तरणोपाय नसतो. अशा या अडचणीच्या प्रसंगीं आपण पायथॅगोरियन पंथाचा कायमचा त्याग करून सत्यमार्गाकडे वळलों हाच पारमिनाइड्सचा सांगण्याचा मतलब आहे.

आयोनियांतील थेल्सच्या पंथांतील विचारसरणी घ्या, हिरॅक्लीटसचा अग्निकारणवाद पहा, किंवा पायथॅगोरसची ही जगताची उपपत्ति काय होती याचा निष्कर्ष काढा, एकाच वस्तुची नानाविध रूपें होऊं शकतात हें त्यांना मान्य होतें, आणि या नानाविध अवस्थांची उदाहरणें जल, हिम, बाष्प, अशीं देण्यांत येत होतीं अॅनॅक्झिमीनसनें पूर्वीच्या उपपत्तीलाच एक घनीभवन व विरलीभवन या कल्पनेची जोड दिली होती. या कल्पनेबरोबर दुसऱ्या काय गोष्टी गृहीत धराव्या लागतात याची अॅनॅक्झिमीनसला देखील क्वचितच कल्पना असेल. घनीभवन व विरलीभवन यांची उपपत्ती लावण्यासाठीं आपणांस असें गृहीत धरलें पाहिजे कीं, अखिल वस्तूंची मूळ घटक वस्तु अवकाश प्रचुर आहे; व हाच अवकाश किंवा पोकळी कमी-जास्त झाल्यामुळें घनविरळ भाव उत्पन्न होईल; पण अशी पोकळ जागा मूळ घटकद्रव्यांत आहे काय? या प्रश्नाचा अॅनॅक्झिमीनसने कधी विचारच केला नाहीं. हा विचार इतका सूक्ष्म आहे कीं, आज

देखील ही गोष्ट एकदम ध्यानांत येण्यासारखी नाहीं. मग मनुष्याच्या अप्रगल्भ अवस्थेंत ती त्याच्या नजरेंतून निसटली यांत काय आश्चर्य ? पायथॅगोरियन लोकांनीं यास विचारसरणीला एक आणखी पुस्ती जोड-ल्यामुळें हा प्रश्न अधिक पुढें आला असावा. त्यांनीं अशी कल्पना केली होती कीं, या जगताच्या बाहेर हवेचा कोश आहे व या कोशां-तून हवा घेऊनच वस्तु दीर्घ होतात. हा विचार आल्याबरोबर साह-जिकच असा प्रश्न उभा राहातो कीं, ही हवा राहाण्यास त्या वस्तूंत पोकळ जागा होती कीं काय ?

या सर्व अडचणी ज्या मतांत उपस्थित होत नाहींत असें मत म्हणजे झेनोफेनस याचें वस्तूच्या अचळ स्वरूपाविषयींचें होय; याच मताचा पारमिनाइड्स यानें पुरस्कार केला आहे. झेनोफेनसच्या मतांतील सर्व अस्पष्टपणा दूर सारून पारमिनाइड्सनें सर्व आयोमियांतील मताला विरुद्ध असें आपलें मत पुढें आणलें. पायथॅगोरॅसच्या पंथामध्यें गणित विषयाचें अतोनात माहात्म्य होतें हें आपण पाहिलेंच आहे. आणि गणित शास्त्रामध्यें जें जें विचारविषय तें तें भावमय असा संकेतच आहे. म्हणजे आपणाला ज्या गोष्टीचा विचार कळतो, जो विषय आपणास बुद्धीनें आकलन करतां येतो, तो विषय अस्तिपक्षीय आहे. म्हणजे तो विषय आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. याच कल्पनेच्या आधारा-वर पारमिनाइड्सनें आपली इमारत रचिली आहे. तो प्रथमतः पायथॅगोरियन पंथांतील होता, या म्हणण्यालाहि या गोष्टीनें बळकटीच येते. या मूळ कल्पनेला धरून पारमिनाइड्सचा असा सिद्धांत आहे कीं अभाव हा पदार्थच नाहीं. कारण प्रत्येक विचार किंवा कल्पना ही भावात्मकच आहे. व जे विचारगम्य तेंच खरें. मग ज्या अभावाची भावरूप विचारला कल्पनाच करतां येत नाहीं, तो अभाव सत्य कसा असेल ? आपल्याकडे देखील अभाव हा पदार्थ मानावा किंवा मानू नये, हा मोठा वाद आहे. वैशेषिक वादी अभाव

हा एक पदार्थ मानून त्याच्या पोटजाती वगैरेही पाडतात. वेदांती अभाव मानीत नाहींत. ते म्हणतात कीं अभाव ही कल्पनाच खोटी आहे. कारण प्रत्येक अभाव हा भावरूपच आहे. तुम्ही ज्याला घटाभाव म्हणता तो कांहीं एक प्रकारचा अभाव नसून भूतलाचें स्वरूप आहे. एखाद्याला अमूक एका ठिकाणीं घडा नाहीं असें समजलें म्हणजे काय? तर, तो ज्याठिकाणीं घडा पहावयास गेला तेथें त्याला फक्त भूईच दिसली. सारांश सर्व ज्ञान हें भावात्मकच आहे. पारमिनाइडसची विचारसरणी एवढ्यापुरती अशीच आहे. अभाव म्हणून मुळीं कांहीं नाहींच. आणि ज्याअर्थी अभाव नाहीं, त्याअर्थी मूळ वस्तू अमूक एका ठिकाणीं नाहीं असें म्हणताच येत नाहीं. कारण अभाव हा पदार्थच सत्य नाहीं. मग जेथें अवकाश किंवा पोकळीच नाहीं, तेथें घनविरळ-भाव कसा शक्य होणार? वस्तु एकरूप व निरवकाश आहे. वेदांतांतील परब्रह्माची व्यापकता दाखविण्यासाठीं ज्याप्रमाणें तें ‘ कृत्स्न ’ आहे, पूर्ण आहे, अवकाशरहित आहे, असें म्हटलें आहे; त्याप्रमाणेंच पारमिना-इडसची मूळवस्तु कृत्स्न आहे.

वस्तु निरवकाश आहे तशीच जन्ममरणातीत आहे. वस्तु आहे या म्हणण्याचाच अर्थ तसा होतो. कारण वस्तु उत्पन्न झाली म्हणावें तर ती वस्तुचा भाव किंवा अभाव यापासून उत्पन्न झाली असावी; परंतु ज्या अर्थी अभाव हा पदार्थच नाहीं, त्याअर्थी ती अभावांतून उत्पन्न झाली नाहीं. बरें भावात्मक वस्तूंतून तिची उत्पत्ति झाली म्हणावें तर ती दुसरी भावात्मक वस्तु तिजशिवाय दुसरी असणार नाहीं. दुसरी म्हणावयाची झाल्यास या दोन वस्तूंमध्यें अवकाश पाहिजे. पण अवकाश म्हणजे अभाव व अभाव तर मान्यच नाहीं. तेव्हां वस्तु आहे याचाच अर्थ मी जन्ममरणातीत आहे.

याच मुद्यावरून वस्तु अविभाज्य, अचल व अमर्याद आहे, हें सिद्ध होतें. कारण वस्तूची विभागणी करावयाची म्हणजे

दोन भाग दूर करावयाचे. पण याचाच अर्थ त्यांजमध्यें अवकाश निर्माण करावयाचा; व अवकाश हा तर बुद्धिगम्य नाहीं व बुद्धिगम्य नाहीं तें सत्य नाहीं. वस्तु हालवायची म्हणजे मी पूर्वी नसेल तेथें ती न्यावयाची. पण वस्तूच्या अभावाची कल्पनाच कोणी करावी? आणि अशा अविभाज्य व अचल वस्तूची मर्यादा तरी कोणी घालावी? जेथें वस्तू संपली व पुढें नाहींशी झाली, तेथें त्याची मर्यादा घालावयाची. पण वस्तु तर नेहमीं भावात्मकमय, मग मर्यादा कोठून येणार? यावरूनच वस्तूची कल्पना द्यावयाची तर ती घनवर्तुळासारखी आहे असें पारमिनाइड्सचें म्हणणें होतें.

पारमिनाइड्सची एकंदर विचारसरणी मोठी परस्पर विरोधी आहे. एकीकडे वस्तू निर्मर्याद आहे म्हणून तर म्हणावयाचें, व दुसरीकडे ती घनवर्तुळाकृति आहे म्हणूनही आपणच प्रतिपादन करावयाचें?

पारमिनाइड्सच्या वस्तुस्वरूप दिग्दर्शनावर असा एक आक्षेप येऊं शकेल कीं, या जगांत आम्हांस दरक्षणीं नानाविधता व स्थित्यंतर दिसत असतां वस्तु अचळ व कैवल्यरूप आहे असें म्हणावयाचें तरी कसें? पण याला उत्तर येवढेंच कीं, आपणांस जें जसें दिसतें तसेंच तें असेल तर तत्त्वज्ञानाची जरूर तरी काय? तत्त्वज्ञानाचें हेंच मुख्य काम कीं, आपल्याला दिसणाऱ्या आभासाची छाननी करून सत्यवस्तु प्रकट करावी. आपणास भ्रमानें सृष्टींत नानाविधता दिसली म्हणून ती तशीच असली पाहिजे असें थोडेंच आहे.

पारमिनाइड्सचें मत वेदांतील मतांशीं फारच मिळतें येतें. परंतु यावरून त्याची बुद्धि आमच्या ब्रह्मविचारापर्यंत जाऊन पोहोंचली होती

असें म्हणतां येत नाहीं. अलीकडल्या पदार्थविज्ञानामध्यें ज्याला जड द्रव्य किंवा Matter म्हणतात, तेथपर्यंत त्याची प्रगति झाली होती. जड द्रव्याचें किंवा प्रकृतीचे पडदे दूर सरून त्याला औपनिषद पुरुषाचें अगर अक्षरस्वरूप ब्रम्हाचें दर्शन झालें नव्हतें. तथापि पारमिनाइड्सची बुद्धि मोठीच सूक्ष्मदर्शनी यांत कांहीं संशय नाहीं. त्याचें मत जितकें सूक्ष्म तितकेंच समजावयास कठीण; व त्यावर आक्षेप येणें त्यामुळेंच फार सोपें. आपल्या गुरूवर येणाऱ्या आक्षेपांचें झेनो कसें खंडन करतो, हें आपण पाहिल्यास आपणास मोठें कौतुक वाटेल.

---

# झेनो.

झेनोचाही जन्म खुद्द इलिया येथेंच झाला असून त्याच्या बापाचें नांव टेल्युटॅगोरस ( Teleutagoras ) असें होतें. तो पारमिनाइड्स-पेक्षां पंचवीस वर्षांनीं लहान असून त्याचा पट्टशिष्य होता, व त्यांचें परस्परावरील प्रेम इतकें उत्कट होतें कीं, प्लेटोनें झेनोला पारमिना-इड्सचा मुलगाच म्हटलें आहे. ज्या वेळीं पारमिनाइड्स अथेन्स येथें गेला, त्यावेळीं झेनो हा त्याजबरोबर होता, व त्याची उमर या सुमारास चाळीस वर्षांची होती, असें आपणास प्लेटोच्या म्हणण्यावरून समजतें. प्रसिद्ध अथीनियन पेरिक्लिज यानें झेनोचें संभाषण ऐकलें होतें व प्रसिद्ध सोफिस्ट प्रोटॅगोरस व झेनो यांचा वादविवादही झाला होता.

झेनो हा एका राजकीय कटांत पकडला गेल्याबद्दलचा बराच लोक-प्रवाद आहे. परंतु त्या सर्व प्रवादांमधील सामान्य भाग म्हणजे आपल्या कटवाल्या बांधवांच्या संरक्षणार्थ त्यानें प्रकट केलेला निश्चय हाच आहे, व त्यावरून आरंभापासूनची त्याची उदार व निश्चयी वृत्ति हीं दिसून येतात. झेनो अगदीं तरुण असतांनाच त्यानें आपले लेख लिहिले व त्यांचा उद्देश म्हणजे आपल्या गुरूवर येणारे आक्षेप दूर करावे असा होता; परंतु हें साधण्याची झेनोची पद्धत म्हणजे पार-मिनाइड्सच्या मतावरील आक्षेपांचें खंडण करणें अशी नसून, इतर मतांतील अडचणीं दाखवून देणें ही आहे. अर्थातच झेनोच्या म्हणण्याचें तात्पर्य असें कीं, पारमिनाइड्सचें मत अडचणीचें, येवढ्यावर त्याचा त्याग करून वस्तूंच्या नानाविधतेची तरफदारी कराल तरी देखील तुम्हांला अनेक अडचणी आल्यावाचून राहणार नाहींत. दुसऱ्यांच्या मताच्या खोटेपणाबद्दल आपल्या मताची सत्यता दाखविण्याची ही पद्धत आपल्याकडे प्रचलित होती, व ती साधारणतः कोठच्याही काळांत असणारच. बौद्ध किंवा जैन हें श्रुतिप्रमाण मानीत नाहींत;

व वेदांतवादी म्हणजे तर श्रुति हेंच मुख्य प्रमाण मानून तदनुकूल तेवढाच तर्क पत्करणारा, मग जेथें परस्परांची प्रमाणेंच भिन्न आहेत, तेथें उभयतांचा वाद कसा व्हावा, व वेदांत मताचा विजय तरी कसा साधावा ? ही अडचण दूर करण्यासाठीं अशी योजना करावयाची कीं, वेदांतमताचा मुळींच उपन्यास करावयाचा नाहीं. बौद्ध किंवा जैन-मतांचाच पूर्वपक्ष करून त्यांना मान्य असलेल्या तर्कप्रमाणानेंच तो सदोष आहे असें दाखवावयाचें; व ज्याअर्थी वेदांतमताखेरीज इतर सर्वांचा पक्ष खोटा आहे, त्याअर्थी शिल्लक राहिलेला वेदांत पक्षच खरा असला पाहिजे. तोही सत्य न म्हणावें तर जगांत कोणताच पक्ष सत्य राहाणार नाहीं; पण असें म्हणणें बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. कारण सरतेशेवटीं कोणतातरी एक पक्ष खरा असलाच पाहिजे.

झेनोची पद्धति म्हणजे याचप्रमाणें नानाविधता स्वीकारणाऱ्या पक्षाचा सदोषपणा दाखवून आपल्या पक्षाला बळकटी आणणें ही आहे. कांहीं प्रसंगीं झेनो आपल्याच एका म्हणण्याविरुद्ध दुसरा पक्ष मांडतो, यामुळें त्याला कोणी कोणी दुतोंड्या म्हणतात. पण झेनोला आपला पक्ष दाखवावयाचा नसून दुसऱ्याचा हाणून पाडावयाचा असल्यामुळें हा परस्परविरोध त्याला बाधक झाला नाहीं.

झेनो म्हणतो कीं, समजा, आपण वस्तु नानाविध आहेत अशी तात्पुरती कल्पना करूं. आतां या वस्तूंची कांहींएक ठराविक संख्या असली पाहिजे. त्याचप्रमाणें जर वस्तु नानाविध आहेत तर कोठच्याही दोन वस्तूंच्या दरम्यान दुसऱ्या वस्तु पाहिजेत. कारण एका जोडीच्या दरम्यान दुसरा पदार्थ आहे व दुसऱ्या एकाद्या जोडीच्या मध्यें तो नाहीं, असें ठर-विण्यास कांहींच कारण नाहीं. मग जर प्रत्येक जोडीमध्यें एक तिसरा पदार्थ पाहिजेच, तर मग वस्तु अपरिमित आहेत असेंच म्हटलें पाहिजे. वस्तूंची नानाविधता पत्करली म्हणजे त्या अनंतही आहेत व सांतही आहेत असें म्हणण्याची पाळी येते, व ही तरी मोठी अडचणच नाहीं काय?

काल किंवा दिक् इत्यादिक पदार्थांचाही उपन्यास केला तर आपणास अशाच अडचणी पडतात. वस्तूला रहावयास जर दिक् किंवा स्थळ पाहिजे तर या स्थळाला राहावयास दुसरें स्थळ नको काय ? बरें दिक् म्हणजे केवळ शून्यरूप म्हणून वस्तू नव्हे असें म्हणावें, तर अवस्तूच्या ठिकाणीं वस्तु कशी राहील ? मग एका स्थळासाठीं दुसरें स्थळ, त्याच्या साठी तिसरें, अशी अनवस्थाच प्राप्त होत नाहीं काय ? कालाचीही अशीच विल्हेवाट लावतां येईल

पायथॅगोरियन पंथांतील लोक भूमीतीचे सिद्धांत, अंकगणिताला किंवा व्यवहाराला लाऊं पहात, पण तेही किती भ्रामक आहेत असें दाखवि-ण्याकरितां झेनो म्हणतो, 'जर बिंदूला परिमाणच नाहीं तर अनेक परि-माण शून्य बिंदूपासून सपरिमाण रेषेची रचनाच होणार नाहीं. एका रेषेचे दोन भाग करता येतात, त्या भागाचे पुनः दोन भाग, त्या प्रत्येक भागाचे पुनः दोन भाग, अशी आपणास विभागणी करतां आली पाहिजे. कारण बिंदुला परिणामच नसल्यामुळें कितीही लहान भाग झाला तरी त्यांत अनेक बिंदू आहेत असेंच म्हटलें पाहिजे. अशा रीतीनें प्रत्येक रेषेचे अनंत विभाग करतां येतील, व सर्वच रेषाचे विभाग अनंत असल्यामुळें एक रेषा मोठी व दुसरी लहान असें म्हणतांच यावयाचें नाहीं.'

जगतांत एकच अचळ पदार्थ म्हटला म्हणजे गति अशक्य. पण आपणास पदार्थ गतिमान् दिसत नाहींत काय ? झेनो म्हणतो हा गति-पक्ष स्वीकाराल तरी अनवस्थाच प्राप्त होईल, ही गतीची अनवस्था त्यानें चार प्रकारांनीं दाखविली आहे. ते प्रकार असेः—

(१) एक वस्तु एका बिंदूपासून दुसऱ्या एखाद्या दूरवरच्या बिंदूकडे जात आहे अशी कल्पना केली, तर तें सबंद अंतर चालून जाण्याच्या आधीं निम्मे अंतर चालून गेलें पाहिजे. त्या निम्यापूर्वीं त्याचें निम्मे अंतर, त्याच्यापूर्वीं त्याचें निम्मे, अशा रीतीनें अनंत विभाग पडतील, व सात काळांत हें अनंत विभाग ओलांडनाच येणार नाहींत. म्हणून

एका पदार्थाची एका स्थळाहून दुसऱ्या स्थळीं गती होतें हें म्हणणें अडचणीचेंच आहे.

( २ ) एखादें कासव अकिलीजच्या थोडेसें पुढें आहे, व अकिलीज त्याला पकडण्याकरितां जलद जात आहे अशी कल्पना केली, तरी या ठिकाणीं अकिलीज कधींच कांसवाजवळ पोंचणार नाहीं. कारण अकिलीजला प्रथमतः कासव पूर्वी ज्या ठिकाणीं होतें त्या ठिकाणीं आलें पाहिजे, व तेवढ्या वेळात कासवही थोडें तरी पुढें सरकणारच. सारांश अकिलीज व कासव यांजमध्यें थोडें तरी अंतर अनंत कालपर्यंत राहणारच. म्हणून अकिलीज कासवाला पकडतो, हें संभवनीय नाहीं. झेनोचें हें कोडें अकिलीज व कांसव याच नांवानें प्रसिद्ध आहे.

( ३ ) एखादा धनुष्यापासून सोडलेला बाण निशाणापर्यंत जातो असें म्हणता येत नाहीं. कारण आपणास वाटेल तो जरी क्षण घेतला, तरी त्या क्षणी तो बाण बरोबर आपल्याच प्रमाणाची जागा व्यापून राहातो व याच अवस्थेला स्थिति ( Rest ) म्हणतात. याच रीतीनें प्रत्येक क्षणीं तो बाण स्थितिमान् आहे असें सिद्ध होतें; मग तो एकंदरीत गतिमान् कसा होईल ? स्थिति व गति यांचा परस्पर विचार असल्यामुळें अनंत स्थितींची बेरीजही कांहीं गति होऊं शकणार नाही.

( ४ ) अशी कल्पना करा कीं, अ, ब, व क, या तीन रेषा आहेत. त्यापैकीं अ ही स्थिर असून ब व क या परस्पर विरोधी दिशेनें जात आहेत. अर्थात् अशा वेळीं ब ही रेषा अ मधील जितके बिंदू ओलांडून जाते, त्याच्या दुप्पट क मधील ओलांडील. कारण गति येथें दुहेरी आहे. मग क मध्यें एकंदर दुप्पट बिंदू व त्यांनां ओलांडण्यास लागणारा वेळ एकेरी बिंदूनां ओलांडावयास लागणार तेवढाच.

सारांश गतीचें अस्तित्व घटकाभर मान्य करून विचार पाहिल्यास त्याजमध्येंही शतशः अडचणी येतात. मग वस्तु एकरूप आहे हा पारमिनाइड्सचा पक्ष कां टाकावा ? तोच खरा म्हणून स्वीकारण्यास हरकत नाहीं. कारण तो बुद्धिला अधिक पटतो.

झेनोचा उद्देश विवक्षित रीतीनें आपल्या गुरूची तरफदारी करावयाची येवढाच असल्यामुळें, त्याचे विचार विशेषसे फळप्रद नाहींत. त्याची विशेष कामगिरी म्हणजे कोटिक्रम करण्याच्या पद्धतीचा पुरस्कार हाच होय. मनुष्याची बुद्धि अद्याप विचारपद्धतीच्या सूक्ष्म नियमांचें ग्रहण करण्यास समर्थ झाली नव्हती अशा परिस्थितीमध्यें झेनोनें आपल्या कोटिक्रमांनीं त्या पद्धतीचा पाया घातला, व याच पद्धतीचें तर्कशास्त्र हें परिणत स्वरूप आहे. एकंदर तत्त्वज्ञानाचा तर्कशास्त्र हा एक महत्वाचा भाग असल्यामुळें, अशा शास्त्राची पूर्वतयारी करण्याचें श्रेय मिळणें हें कांहीं लहानसहान भाग्य नव्हे, व तें भाग्य झेनोला मिळालें ही त्याची महनीयता आहे. त्याच्या कोटिक्रमांतील चुका पुढें ॲरिस्टाटलनें वगैरे दाखवून दिल्या, व आपणास आजही दाखविता येतील. परंतु या चुकांमुळें त्याचा मोठेपणा कांहीं कमी होत नाहीं. विचाराच्या सूक्ष्म गुंतागुंती सोडवितांना असा एखादा उपन्यास जोरानें पुढें आणणें हेंच प्रगतीचें मोठें साधन असतें.

---

# मेलीसस.

मेलीसस हा मूळचा सॅमॉस येथील राहाणारा असून त्याच्या बापाचें नांव इथॅजीनस ( Ithagenes ) असें होतें. तो झेनोपेक्षां वयानें जरा लहान होता. ख्रि. पू. ४४१ वर्षी अथेन्सविरुद्ध लढण्यासाठीं सॅमॉसहून जें आरमार आलें होतें, त्यावर मेलीसस हा मुख्य अधिकारी होता. यावरून प्रचलित राजकारणामध्यें त्याचें केवढें अंग असलें पाहिजे हें स्पष्टच होतें; व राजकारणीपुरुष म्हणून त्याची जी ख्याति आहे तिलाहि पुष्टी येते. मेलीससनें पारमिनाइड्सचें शिष्यत्व पत्करलें होतें, परंतु त्याबरोबरच त्यानें हिरॅक्लीटस व ॲनॅक्झिमीनस यांच्या मताचाही चांगला परिचय करून घेतला होता. पारसीकांच्या स्वाऱ्यांमुळें आयोनिया व इटली येथील लोकांचें जें अधिक संघटन झालें त्याचा परिणाम आपणांस मेलीससच्या मतांमध्यें दृग्गोचर होतो.

झेनोनें आपल्या गुरूची तरफदारी करण्यासाठीं दुसऱ्यांच्या मतांतील अडचणी दाखविल्या, परंतु मेलीससच्या लेखावशेषांचें स्वरूप पारमिनाइड्सच्या मतांना पाठिंबा देणें येवढेंच आहे. त्याचे बहुतेक शब्द देखील थेट पारमिनाइड्स सारखेच आहेत, व याच कारणाकरितां त्याचें येथें चर्वितचर्वण करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. मेलीससच्या विचारसरणींतील विशेष हाच कीं, सद्वस्तु ही घनगोल स्वरूप आहे असें पारमिनाइडसचें मत टाकून, ती केवळ अनंत आहे असेंच तो म्हणतो. वस्तूला मर्यादा लावावयास शून्यता पाहिजे, आणि शून्यता ही अस्तित्वातच नाहीं; व म्हणूनच वस्तु केवळ अनंत आहे, तिच्यांत घनविरळ भाव नाहीं, तिला गति नाहीं व विकार नाहीं. पारमिनाइड्सचें हेंच म्हणणें होतें, व मेलीससनें तेंच अधिक जोरदार भाषेंत पुढें मांडलें. हा जोरदारपणा साधण्यासाठीं त्यानें आपल्या गुरूची दीर्घ वृत्तात्मक रचना टाकून गद्यामध्येंच ग्रंथरचना केली, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

आपला पक्ष खरा असून दुसऱ्या पक्षाचें म्हणणें खोटें असलें पाहिजे हें दाखविण्यासाठीं मेलीससनें एक विशेष मुद्दा पुढें आणला आहे. तेवढा मात्र येथें देऊं. मेलीसस म्हणतो कीं, केवळ प्रतिपक्ष्याच्या मुरवती खातर आपण आपल्या एकरूप सद्वस्तू खेरीज दुसरी सद्वस्तु आहे असें मानलें, तरी आपणांस हें कबूल करावें लागेल कीं, ही एक सद्वस्तु व पहिली उभयपक्षांनां मान्य अशी सद्वस्तु, या अगदीं तंतोतंत सारख्याच असल्या पाहिजेत. नाहींतर त्या दोन्हीही सद्वस्तूच आहेत असें म्हणण्यास तरी आधार काय? बरें त्या दोन्ही अगदीं सारख्या आहेत असें म्हटलें, तर त्या एकमेकांपासून भिन्न आहेत असें म्हणावयास तरी आधार काय? त्या दोन वस्तु एकमेकांपासून शून्यदेशानें तर कांहीं विभक्त होऊं शकतच नाहींत. कारण शून्य प्रदेश हा मुळीं अस्तित्वातच नाहीं; व ज्या अर्थी प्रतिपक्षीयानें मानलेली प्रत्येक सद्वस्तु आमच्या सद्वस्तुबरहुकूम व अविभक्त असली पाहिजे, त्या अर्थी ती तिच्याशीं एकरूपच असली पाहिजे. यावरून सद्वस्तु एक व अविभक्त आहे हें सिद्ध झालें. मेलीससच्या याच कल्पनेचा पुढें परमाणुवाद्यांनीं काय उपयोग केला हें ओघानें कळेलच.



# प्रकरण ५ वें

## माध्यमिक पंथ

संस्कृतभाषेतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथाच्या द्वारा किंवा साक्षात् बुद्धिधर्मीय पंथांची ज्यांना ओळख आहे त्यांना, माध्यमिक पंथ हा शब्द फारच परिचयाचा वाटेल. बुद्धधर्माचे माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक व वैभाषिक असे चार पंथ आहेत. त्यांपैकीं माध्यमिक हा पंथ सर्वशून्यवादी आहे; परंतु प्रस्तुत प्रकरणांत हा शब्द कोटल्याहि रूढ अर्थानें वापरला नसून त्याच्या मूळ अर्थानुसार घेतला आहे. दोन परस्परविरोधी तत्त्वांची एकवाक्यता करून उभयपक्षांचा समेट होईल असा मार्ग काढण्याचा या पंथामध्यें प्रयत्न झाला, म्हणून या पंथाला माध्यमिक पंथ ( Mediators ) असें नांव देण्यांत आलें आहे. पारमिनाइड्सच्या मताप्रमाणेंच सर्व गोष्टी कबूल कराव्या तर मोठीच आपत्ति येऊन पडते. प्रत्यक्ष अनुभवामध्यें तर आपणास ठिकठिकाणीं नानाविधता व गतिमत्ता दिसून येते, मग वस्तुच्या एकस्वरूपावरच भर देऊन आपण ही विविधता व गतिमत्ता कशी उकलावयाची ? गतिमत्ता ही कल्पना कांहीं पारमिनाइडसला अगम्य नव्हती. पण सद्वस्तूशीं तिची सांगड कशी घालतां येईल हाच प्रश्न होता. व पारमिनाइड्सनें त्याचें स्पष्ट नकारार्थी उत्तर दिलें होतें. जगताच्या व्यवहारानें तत्त्वज्ञान बांधलेलें नाहीं ही गोष्ट खरी, परंतु नानाविधता व गतिमत्ता यांचा आभास होण्यास तरी कारण काय, याची योग्य उपपत्ति लावावयास नको काय ?

उलटपक्षीं ही अडचण दूर होण्यासाठीं पारमिनाइड्सचा पक्ष अजीबात टाकून द्यावा, तर वस्तूच चंचलस्वरूप होऊन हिरॅक्लीटसच्या

मतविवरणप्रसंगीं दाखविल्याप्रमाणें अनिश्चितता व अस्थैर्य प्राप्त होऊं लागतें. जगतांत कांहींच स्थिर नाहीं, कांहींच शाश्वत नाहीं, कांहींच एकरूप नाहीं, हें म्हणणेंही समाधानकारक वाटत नाहीं. कालाच्या व स्थलाच्या प्रतिक्षणीं पालटणाऱ्या ओघामध्येंही आपणास कांहींतरी शाश्वतता हृदयगोचर होत असते. सारांश, कोठलाही एकच पक्ष पत्करावयाचा म्हणून ठरविलें तर मोठी अडचणीचीच वेळ येऊन पडते; पण माध्यमिक पंथी आपणास असें विचारतील कीं, एकाच पंथाला चिकटून राहिलें पाहिजे असा निर्बंध कशाला ठेवावा ? उभयपक्षांमध्यें दिसणारें सत्यस्वरूपसार ग्रहण करून वरील असार शब्द टाकून द्यावे. वस्तू एकविधही आहे व अनेकविधहि आहे. ती शाश्वत आहे व अशाश्वतही आहे, स्थिर आहे व चंचल आहे. आतां कोणास असें वाटेल कीं, हें बोलणें परस्परविरोधात्मक आहे; पण येथें खरा विरोध मुळींच नसून त्याचा आभास मात्र आहे. कारण एकविधता व अनेकविधता, शाश्वति व नाश, यांचीं अधिकरणें किंवा आश्रयस्थानें निरनिराळीं आहेत. तीं कशीं व कोणतीं, याचेंच मुख्यतः विवेचन करणें हें माध्यमिकांचें काम आहे. बाकीच्या विषयांचा विचार केवळ तदनुषंगानें मूळ सिद्धांताला अधिक पोषक म्हणूनच करावयाचा. या पंथांतील पहिला तत्त्वज्ञ एंपिडोक्लस हा झाला.

# एंपिडोकल्स.

एंपिडोकल्स याचा जन्म सिसिलीमध्यें ॲक्रॅगस ( Akragas ) या गांवीं खि. पू. सुमारें ४९४ वर्षें झाला, त्याच्या बापाचें नांव मेटन ( Meton ) असें असून त्याच्या आजाचें नांव एंपिडोकल्स असेंच होतें. आपल्या शहरामध्यें प्रबळ झालेल्या सरदारांच्या सत्तेविरुद्ध त्यानें लोकपक्षाची बाजू उचलल्याचें सांगतात. या कारणामुळें त्याच्या लोकप्रियतेस सुरवात झाली असावी; परंतु त्यामुळेंच त्याला हद्दपारीची शिक्षा झाली होती; व त्यानें आपल्या आयुष्यांतील पुष्कळ काळ ग्रीस देशामध्यें घालविला. पेरिक्लीसच्या वेळीं अथेन्सची जी विलक्षण भरभराट झाली, तिचा त्यानें प्रत्यक्ष अनुभव घेतला होता; आणि थोरिऑई या नांवाच्या ग्रीक वसाहतींत तो खि. पू. ४४४–३ या वर्षीं गेला असतां प्रसिद्ध इतिहासलेखक हिरोडोटस व प्रख्यात सोफिस्ट प्रोटॅगोरस यांनीं त्याला पाहिलें होतें. एंपिडोकल्स हा लोकप्रिय होता म्हणून वर सांगितलेंच आहे. या लोकप्रियतेतच आपणास अलौकिक शक्ति प्राप्त झाली आहे असें दाखवून त्या लोकप्रियतेचें विभूतिपूजेंत रूपांतर करण्याचा स्वतः एंपिडोकल्सही प्रयत्न करीत असे. त्याचा विशेष परिचयाचा विषय म्हणजे वैद्यक व त्याच्या योगानें आतुर प्रकृतीच्या मनुष्याच्या शारीरिक स्थितींत एकाएकीं जे फरक घडून येतात, त्यावरून हा अलौकिक सामर्थ्याचा आहे असा समज उभयपक्षीं दृढतर झाला होता; व आपण वाटेल तें करण्यास समर्थ आहों, अशी एंपिडोकल्सची कल्पना झाली होती. "पिकांची नासाडी करणारे सोसाट्याचे वारे कसे थांबवावे, व पुनः वाटेल तेव्हां कसे आणावे, काळ्या कुट्ट ढगांतून पर्जन्य कसा आणावा, व उन्हाळ्याच्या प्रखर ऊष्म्याचे वेळींही वृक्षसंगोपन करणारें निर्झर कसे खालीं आणावे ? फार काय, पण नरकांत गेलेल्या मृतांचेंही पुनरुज्जीवन कसें घडवून आणावें, हें मीं तुला शिकवीन "

( Frag. 24 ). पायथॅगोरॅस मोठा गूढधर्मी खरा, पण एंपिडोकल्सची ही निर्शृंखल वल्गना त्याच्यावर ताण करणारी होती. पायथॅगोरॅस हा किती झाला तरी गणिती, व त्या शास्त्राचा त्याच्या एकंदर वर्तनावर बराच परिणाम झाला होता; पण एंपिडोकल्स म्हणजे वैद्यविद्येचा अभिमानी, व त्या कारणामुळें व स्वभावगत उथळपणामुळें वल्गना करणारा. आपला मृत्यु कसा झाला हें कोणाला कळलें नाहीं म्हणजे आपल्याला एक तऱ्हेचें देवत्व प्राप्त होईल, या भोळसर समजुतीनें तो आपल्या मरणसमयीं कोणीकडच्या कोणीकडे भटकत होता. कोणाचें म्हणणें आहे कीं, तो ग्रीसमध्येंच मरण पावला. परंतु पुष्कळांचें असें म्हणणें आहे कीं, आपण अकल्पित रीतीनें नाहींसें व्हावें म्हणून त्यानें एटना ज्वालामुखी पर्वताच्या मुखामध्यें उडी टाकली. उडी टाकण्याच्या गर्दींत त्याचें एक पितळी चपात मागें राहिलें, व त्याच्या मरणाची खरी हकीगत चट्कणीं झालीच ! ! शास्त्रीय शोधाबद्दलची कळकळ व मनाचा उथळपणा यांचा असा चमत्कारिक घोटाळा होऊन बनलेला स्वभाव फारच क्वचित आढळेल. एंपिडोकल्स हा निरनिराळे जादूटोण्याचे किंवा मंत्रतंत्राचे प्रयोगही करीत असे; व अशा एका प्रयोगाचे वेळीं आपण स्वतः हजर असल्याचें प्रसिद्ध सोफिस्ट गॉर्जिअस हा सांगत असे.

एंपिडोकल्समध्यें अगदीं जादूच्याच तोडीची कांहीं विद्या असेल तर ती वाणीची मधुरता ही होय. या बाबतींत तो पारमिनाइड्सहून कितीतरी श्रेष्ठ होता. पारमिनाइड्सच्या अंगांत प्रतिभा नसतांना त्यानें उगाच दीर्घवृत्तात्मक रचना करून कवित्वाचा डौल आणला, परंतु एंपिडोकल्स हा खरा कवि होता. अलंकारिक भाषा साधण्यामध्येंही त्याचा हातखंडा असे, व प्रसिद्ध सोफिस्ट गॉर्जिअस याला अलंकारिक या नात्यानें पुढें जी प्रसिद्धि मिळाली, त्याचें पुष्कळसें श्रेय त्याचा गुरु एंपिडोकल्स यालाच दिलें पाहिजे.

सत्यज्ञानप्राप्तीच्या मार्गांतील अडचणी एंपिडोकल्सनें दाखविल्या आहेत; व त्यावरूनच सत्यज्ञानाची किंमत किती असली पाहिजे हें सुचविलें आहे. " मनुष्यांच्या इंद्रियांनां ज्ञानप्राप्तीची फार थोडीं साधनें आहेत; व अभ्यासी मनुष्यांच्या विचारांना कुंठित करण्यासाठीं हजारों विघ्नें उभीं आहेत. जीविताच्या एका भागाकडेच मनुष्याची नजर जाते व आपणास सर्व ज्ञान झालें असा त्याला भास होतो." (Frag. 2). आपलें तत्त्वज्ञानमात्र सत्य आहे, असा अर्थातच एंपिडोकल्सचा निष्कर्ष आहे.

एंपिडोकल्सच्या मनावर पायथॅगोरॅसच्या मतांचा बराच परिणाम झालेला दिसतो. लॅारेल या लतांच्या पानापासून अगदीं अलिप्त असावें म्हणून जो त्यानें उपदेश केला आहे ( Frag 440 ) त्यांतील मतलब लक्षांत येत नाहीं, परंतु त्यानें वाटाण्याला स्पर्श देखील न करण्याबद्दल जो कडक निर्बंध घातला आहे ( Frag. 441 ) त्याचें मूळ पायथॅगोरॅसच्याच नियमांत आहे. याशिवाय पायथॅगोरॅसचें त्याला विशेष पटलेलें मत म्हणजे पुनर्जन्म हें आहे. मनुष्याला नाना योनींतून व नाना स्थानांतून हिंडावें लागतें असें त्याचें मत दिसतें. " या जन्मापूर्वीं मी एकदा कुमार, तर एकदा कुमारी, झाड, पक्षी, मासा, इत्यादि होतो व या पृथ्वीवरील खुनी व क्रोधाचीं कृत्यें पाहून मला फार वाईट वाटलें ( Frag. 383 and 385 ). या कारणांकरितांच मनुष्यानें हिंसा करूं नये असें एंपिडोकल्स मोठ्या कळकळीनें सांगतो. " दुष्टपणानें हिंसा करण्याचें तुम्हीं थांबवणार नाहीं काय ? निष्काळजीपणानें तुम्ही एकमेकांस खाता हें तुमच्या कसें लक्षांत येत नाहीं." ( Frag. 427 ) " केवळ आकार बदलला म्हणजे बाप मुलाला, व मुलगा बापाला, आई मुलीला व मुली आईला मारण्यास प्रवृत्त होतात, व त्यांनां प्राणहीन करून त्यांचें मांस खातात." ( Frag. 430 ) " अरेरे! ओठानेंच मांस खाण्याचें नीच कृत्य करण्यापूर्वींच माझा प्राण गेला असता तर!"

( Frag. 436 ). "असे मांसाहारी प्राणी पुनः जन्माला येतात तेव्हां ते सिंह होतात, व ते झाड झाले तर लॉरेळ होतात," (Frag. 438) म्हणून लॉरेलला शिवूं नये. ( Frag. 440 ).

पारमिनाइड्सच्या मतानें सद्वस्तु ही जन्ममरणातीत आहे. म्हणजे ती कधीं उत्पन्न होत नाहीं व कधी नाशाही पावत नाहीं व येवढ्यापुरती त्याची व एंपिडोकल्सची एकवाक्यता आहे; परंतु पारमिनाइड्सनें त्यावरून गति-मत्तेची अशक्यता व निरुपयोगिता असल्याबद्दल जो निष्कर्ष काढला आहे तो एंपिडोकल्सला मान्य नाहीं. पारमिनाइड्सचें म्हणणें असें कीं, सद्वस्तु एकरूप असल्यामुळें व शून्यस्थळ अशक्य असल्यामुळें गति उत्पन्नच होणार नाहीं. व कदाचित् झाली असें गृहीत धरलें तरी सद्वस्तु सर्व ठिकाणीं एकरूपच असल्यामुळें ती गति असून नसून सारखीच ठरेल. या विरुद्ध एंपिडोकल्सचें असें म्हणणें आहे कीं, पारमिनाइड्सच्या म्हणण्याप्रमाणें सद्वस्तु जर एकरूप व एकसंख्यांक असती, तर अशी आपत्ति आली असती खरी; परंतु वस्तु जन्ममरणातीत असली तरी बहुविध व बहुसंख्यांक आहे, व म्हणूनच शून्यस्थळाच्या अभावी देखील गति शक्य आहे. सद्वस्तूच्या समूहाचे घटक यांची परस्पर सापेक्ष स्थिति बदलल्यामुळें कार्यप्रवण गतिमत्ता उत्पन्न होते. एंपिडोकल्सचें म्हणणें उदाहरण घेऊन अधिक स्पष्ट करूं. समजा कीं, एका खोलीमध्यें बरो-बर वीसच माणसांना बसावयास जागा आहे, कोणालाही बाहेर जाता येत नाहीं किंवा कोणाला आंतही येतां येत नाहीं. अशा प्रसंगीं त्यांच्या-मध्यें गतिमत्ता कांहीं अशक्य नाहीं. एक दुसऱ्याच्या जागेवर जातो आहे, तोंच दुसरा तिसऱ्याच्या, तिसरा चवथ्याच्या, अशा क्रमानें एके जागेची विल्हेवाट लागत गेली तर त्या खोलीमध्यें केवढी तरी गति उत्पन्न होईल ? बरें ही गतिमत्ता निरर्थकही नाहीं. याच उदाहरणामध्यें अशी कल्पना केली कीं, त्याखोलीला एक खिडकी आहे आणि त्या खिडकींतून निशाण मारावयाचें आहे, तर एखाद्या निशाणबाज

मनुष्याला हळूहळू त्या खिडकीपर्यंत सरकून तें कार्य साधतां येईल. या उदाहरणामध्यें ज्याप्रमाणें तीं वीसही माणसें एकरूप नाहींत, त्याप्रमाणेंच सद्वस्तुही एकरूप नाहीं. तर अनेकरूप व अनेकसंख्याक आहे, आणि म्हणूनच गतिमत्ता शक्य व सार्थ आहे. असेंच एक आधुनिक शास्त्रप्रयोगांतील उदाहरण दिलें तरी तें अस्थानी होणार नाहीं. सर्व बाजूंनीं बंद अशा पाण्यानें पूर्ण भरलेल्या भांड्याखालीं आंच लाविली असतां, त्या भांड्यामध्यें जलशून्य मुळींच जागा नसतांही गति उत्पन्न होते. या ठिकाणीं गति उत्पन्न होण्यास आंच हें एक कारण आहे, त्याप्रमाणेंच सृष्टीमध्यें गतिमत्ता उत्पन्न होण्यास काय कारण आहे? या प्रश्नाचें उत्तर एंपिडोकल्सच्या मताप्रमाणें पुढें येईलच. सध्यां आपणास उदाहरणांतून एखाद्या वस्तुसमूहाच्या घटकांची सापेक्ष स्थिति बदलली असतां कशी गति उत्पन्न होते येवढेंच पाहावयाचें आहे.

वस्तु बहुरुप व बहुसंख्यांक आहे म्हणून म्हटलें, तर हीं रूपें किती व कोणचीं, हा पुढील प्रश्न आहे. वस्तु ही चतुःसंख्यांक आहे असें एंपिडोकल्सचें म्हणणें आहे. या वस्तुरूपांनां तो "वस्तुमूळें." ( Roots ) असें नांव देतो. हीं चार वस्तुमुळें म्हणजे पृथ्वी, आप, अग्नि व हवा अशीं आहेत. पृथ्वीलाही एंपिडोकल्स मूळ द्रव्यांत ढकलतो. यावरून तो थेल्सच्या काळाच्याही मागें पडत आहे, व या दृष्टीनें त्याची विचारसरणी मागसलेली आहे असें वाटेल, परंतु हवा किंवा वायु या मूलतत्त्वाची प्रतिष्ठा करण्यांत त्यानें शास्त्रीय ज्ञानामध्यें एक महत्वाचें पाऊल पुढें टाकलें आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. या शोधाला मूळ प्रवृत्ति होण्यास कारण पारमिनाइड्सनें प्रतिपादिलेली शून्यतेची अशक्यता हेंही असावें. हवा म्हणजे अभावात्मक नसून भावरूप आहे हें एंपिडोकल्सनें प्रथम सिद्ध केलें येवढी गोष्ट खरी. हें सिद्ध करण्यास त्यानें क्लिप्सिड्रा (Klepsydra) या नांवाचें एक यंत्र उपयोगांत आणलें होतें. या यंत्राची विशिष्ट रचना काय होती याची नक्की माहिती

सांपडत नाहीं; परंतु एंपिडोकल्सच्या त्रोटक लिहिण्यावरून साधारण अटकळ बांधवयाची म्हटल्यास आपणास त्याच्या या प्रयोगाची कांहींशी कल्पना देतां येईल. समजा कीं, आपण पितळेच्या किंवा प्रयोग अगदीं सहज स्पष्ट दिसावा म्हणून काचेच्या दोन चार अगदीं सारख्या नळ्या घेतल्या, व त्यांचीं टोकें एका पातळींत येतील अशा त्या बांधल्या किंवा सांधल्या म्हणजे ती एक प्रकारची दोन चार पुडें असलेली एकच नळी होईल. आतां ही अनेक पुडांची नळी घेऊन त्याच्या एका बाजूचीं सर्व पुडें आपल्या हातानें किंवा बोटानें बंद करून ती नळी पाण्यांत बुडवावी. आपण जोंपर्यंत एका बाजूचीं तोंडें बंद केलीं आहेत, तोंपर्यंत त्या पुडांत दुसऱ्या टोकानें पाणी शिरणार नाहीं. कारण आंतल्या पोकळींत हवा आहे व ती जोंपर्यंत बाहेर गेली नाहीं, तोंपर्यंत पाणी आंत जाऊं शकणार नाहीं. जर हवा म्हणजे शून्यच असती तर पाणी शिरण्यास अडचण कां पडावी? पण हवा तशी नाहीं, ती भावरूप आहे व म्हणूनच ती ज्या ठिकाणीं आहे त्याच ठिकाणीं पाण्याचा समावेश होऊं शकत नाहीं. आंतील हवेचा दाब बाहेरच्या पाण्यावर पडून ते बाहेरच थांबविलें जातें. आतां आपण दुसऱ्या तोंडाकडील हात अगर बोटें उचललीं तर हवेला निघून जाण्यास मार्ग मोकळा होतो; व ती जसजशी निघून जाईल तसतशा प्रमाणानें पाणी पुडांत येतें. आपण जर एकाच पुडावरचें बोट उचललें तर तेवढ्याच पुडांत पाणी येईल. यावरून हवा हा एक पाण्याइतकाच भावरूप पदार्थ आहे हें सिद्ध होत नाहीं काय? पुढें याच प्रयोगाची पुरवणी म्हणजे नळीचीं सर्व पुडें पाण्यानें भरून घ्यावीं व मग आपल्या हातानें अगर बोटांनीं नळींचीं वरचीं तोंडें अगदीं गच्च झांकून नळी वर उचलावी. आपणास असें आढळून येईल कीं, जोंपर्यंत वरील टोकें गच्च झाकलेलीं आहेत, तोंपर्यंत पुडांतील पाणी खालीं पडत नाहीं; व जसजसें वरील आवरण कमी होईल, तसतसें पाणी निघून जातें. याचें कारण असें कीं, या वर उचललेल्या नळीच्या

भोंवताली असलेली हवा त्या पुडांतून शिरण्याचा प्रयत्न करीत होती, व वरचीं तोंडें बंद असल्यामुळें त्या हवेचा सर्व दाब खालील टोकांवर पडत होता. या दाबामुळें आंतील पाणी थांबविण्यांत येत होतें, परंतु वरील तोंड मोकळें झाल्याबरोबर खालील दाब कमी झाला, व पाणी निघून जाऊन पुनः पूर्ववत् त्या पुडांमध्यें हवा भरली. हा किंवा असलाच प्रयोग म्हणजे प्रस्तुत काळीं एक नित्यपरिचयामुळें महत्त्वशून्य वाटणारी गोष्ट आहे. परंतु एंपिडोक्लसनें त्यावेळीं ती गोष्ट प्रथम स्पष्टपणें निदर्शनास आणली, ही त्याची मोठी महत्त्वाची कामगिरीच म्हणावयाची.

पृथ्वी, आप, तेज व वायु, या स्वतंत्र व शाश्वत तत्त्वांच्या संमिश्रणानें सर्व सृष्टपदार्थ उत्पन्न झाले आहेत. अगदीं लहानशा किड्यापासून तो हत्तीसारख्या अवाढव्य प्राण्यापर्यंत, किंवा मनुष्यांपासून देवांपर्यंत सर्व याच द्रव्यांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाले आहेत. एंपिडोक्लसनें या ठिकाणीं एका चित्रकाराचें उदाहरण घेतलें आहे. ज्याप्रमाणें एखाद्या चितार्‍याजवळ तीन चारच विशिष्ट रंग असतात, व त्या रंगाच्या कमिजास्त प्रमाणांत बनविलेल्या मिश्रणानें तो चितारी वाटेल त्या प्रकारची तसबीर खर्‍या पदार्थांशी बरोबर मिळेल अशी बनवून देतो. त्याप्रमाणेंच अपरिमित सृष्ट पदार्थांच्या मुळाशीं वर सांगण्यांत आलेली चार तत्त्वेंच आहेत याबद्दल कोणी संशय मानूं नये. ( Frag. 121 ). याच उदाहरणावरून आपल्या असेंहीं लक्षांत येईल कीं, वास्तविक पाहूं जातां सृष्टपदार्थांना जन्मही नाहीं व मरणही नाहीं. चारही घटकद्रव्यांचा मिलाफ झाला म्हणजे उत्पत्तीचा भास होतो, व तींच घटकद्रव्यें विभक्त झालीं म्हणजे तो सृष्टपदार्थ नाश पावला असें आपण म्हणतों. परंतु वास्तविक पाहूं जातां चार द्रव्यांशिवाय कांहींच नाहीं; व तीं चार द्रव्यें विभक्त झालीं म्हणून नष्ट होत नाहींत; किंवा एकत्र झालीं म्हणून वाढतही नाहींत. त्यांचें सांनिध्य परानिध्य त्यांच्या परस्परसापेक्ष स्थितीच्या फेरबदलामुळें कार्यकारी

होतें. ज्याप्रमाणें तसबीर पुसली गेली तरी रंग नाहिसे होत नाहींत, व ती काढली म्हणून वाढत नाहींत. त्याप्रमाणेंच वस्तुमूळें हीं वस्तुनिर्मितीच्या भरतीओहोटीनें अधिक किंवा न्यून होत नाहींत. त्यांची एकंदर गोळाबेरीज एकच असते. फक्त त्यांची परिस्थिति बदलते इतकेंच. ( Frag. 36, 40, 45 ) जें वस्तुतः मुळांत नाहीं, त्याजपासून सत्यवस्तूची उत्पत्ति होणें हें जितकें अशक्य, तितकेंच सत्यवस्तूचा सर्वथा नाश होणें अगदीं अशक्य आहे. वस्तूंचें स्थान बदलो, पण त्या कोठेंतरी असावयाच्याच. ( Frag 48. ) अज्ञ मनुष्याला या सत्यज्ञानाची कल्पना येत नाहीं त्याला आपण काय करावें ?

सृष्टपदार्थांतील निरनिराळे पदार्थ घेऊन व त्यांचें पृथक्करण करून त्यांत पृथ्वी, आप, तेज व वायु, हींच तत्त्वें कशीं आहेत हें दाखविण्याचा एंपिडोकल्सनें फारसा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. त्याचे ग्रंथावशेष हे अगदीं अनुक्रमवार उपलब्ध नाहींत; त्यामुळें हें अत्यंत आवश्यक विवरण अनुपलब्ध ग्रंथावशेषांत आलें असावें. अशी कल्पना करण्यास जागा आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं असें कांहीं विवरण सुचविल्यासारखें दिसतें. दारू म्हणजे झाडाच्या सालीखालीं फेसाळलेलें पाणीच होय; ( Frag 221) किंवा पृथ्वी ही सर्व घन पदार्थांचा पाया आहे (96) इत्यादि स्थळें एंपिडोकल्सच्या विचारांचें दिग्दर्शन करण्यास पुरेशीं आहेत. त्याप्रमाणें जळ किंवा वायू यांनां काव्यमय नांवें देऊन त्या त्या द्रव्यांच्याच सप्रमाण मिश्रणानें मनुष्याचीं हाडें व मांस निर्माण होतात, हें त्यानें दाखविलें आहे ( Frag 199, 203 ).

अशा रीतीनें पारमिनाइडसचा वस्तूच्या जन्ममरण राहित्याविषयीं उपदेश स्वीकारून देखील व्यावहारिक जन्ममरणाची उपपत्ती दाखवितां येते, व गतिमत्तेची सुलभताही सिद्ध होते. कारण आतां एकरूपत्व व नानाविधता, शाश्वतता व नाश, यांचा विरोधच नाहीं. वस्तुमूळें सर्व ठीकाणीं एकरूपच आहेत, त्यांचीं मिश्रणें मात्र नानाविध आहेत; वस्तु-

मुळें शाश्वतच आहेत. त्यांचे विशिष्ट समूह समूहरूपानें नाशवंत आहेत, व याच कारणाकरितां या उभयतांमध्यें मुळींच विरोध नाहीं.

पारमिनाइडसच्या विचारमार्गानें प्राप्त होणारी एक आपत्ति अशा रीतीनें टाळण्यांत आली; परंतु या ठिकाणीं पुनः असा प्रश्न शिल्लक राहिलाच कीं, मुळांत ही गतिमत्ता उत्पन्न होण्यास कारण काय? गतिमत्ता शक्य असेल पण ती सुरू होण्यास प्रयोजन काय? कांहीं तरी हेतूवाचून कोणतेंच कार्य घडत नाहीं. मग या सृष्टींतील गतीच्या मुळाशीं कोणता हेतु आहे? या प्रश्नाला एंपिडोक्लसनें असें उत्तर दिलें आहे कीं, या गतिमत्तेला कारण द्रव्यांतील स्नेह (Love) किंवा द्वेष (Strife) हेंच होय. द्रव्यांतील परस्पर स्नेहामुळें तीं एकत्र गोळा होतात, व परस्पर द्वेषांमुळें त्यांचें मिश्रण नष्ट होऊन तीं पुनः शुद्ध स्वरूपांत परिवर्तन घडविण्यास प्रवृत्त होतात; व या कारणानें दोन तऱ्हेच्या गति प्रवृत्त होतात. याच गतींनां अनुक्रमें मध्यबिंदुवर्ति (Centrifugal) व परिघवर्ति (Circumfugal) असें म्हणतात. ज्याप्रमाणें एखादा रोटीवाला पाण्यांत कणीक मिसळतो व त्याचा तिंबून सुरेख गोळा बनवितो (Frag. 204) त्याचप्रमाणें या जगांत परस्पर स्नेहानें संघटनात्मक कार्य होत आहे. आपल्याकडील वैशेषिक दर्शनामध्यें संग्रह म्हणजे संघटना याचें असाधारण कारण स्नेह हें सांगितलें असून, स्नेह या शब्दाच्या अनेक रूढ अर्थांपैकीं प्रीति हाही एक अर्थ आहे, या गोष्टीची येथें आठवण झाल्यावाचून राहत नाहीं.

एंपिडोक्लस लिहितो 'स्नेह व द्वेष पूर्वीं होते व पुढेंही राहतील. त्या व्यतिरिक्त कोठलाही बुद्धिगम्य काळ सांपडणार नाहीं. (Frag 110). परंतु उलटपक्षीं जेव्हां द्वेष सुरू होतो त्या वेळीं घडून आलेली संघटना नाहींशी होते. फार काय पण आपणांस ज्ञान होतें तेंही या स्नेहतत्त्वावरच होतें. कारण आपण पृथ्वीनेंच पृथ्वी पाहतों; पाण्यानेंच पाणी, वायूनेंच वायु, व स्नेहद्वेषानेंच स्नेहद्वेष अनुभवाला येतात. (Frag. 333).

या स्नेहद्वेषाच्या दोन लाटा आहेत, अशी एंपिडोक्लसची कल्पना आहे. पहिल्या प्रथम द्वेषाची लाट अगदीं बाहेरच्या मर्यादेशी सुरू होते, व ती आंत आंत जातां जातां अगदीं मध्यबिंदूपर्यंत जाते, व नंतर पुनः स्नेहाची लाट उत्पन्न होऊन तीहि थेट बाहेरपर्यंत येऊन पोंचते. या दोन लाटांमुळें दोन प्रकारची व्यावहारिक उत्पत्ति व विनाश होतो. संघटित वस्तूंची विघटना करणें ही एक तऱ्हेनें उत्पत्ती व एक तऱ्हेनें विनाश; व विघटित वस्तूंची संघटना करणें हेंहि उत्पत्ति-विनाशरूपच आहे. म्हणून उत्पत्ति व विनाश यांची ही लाट दोनदां उत्पन्न झाली म्हणजे एक परिवर्तन पुरें झालें असें म्हणावयाचें. ( Frag 60, 74 )

इतकें विवरण झाल्यावरही असा एक प्रश्न शिल्लक राहातोच कीं, स्नेह आणि द्वेष यांचें तरी स्वरूप काय आहे? पृथ्वी, आप, तेज, वायु यांनीं न बनविलेलें असें तें एक स्वतंत्र घटकद्रव्य आहे, कीं कांहीं निराळें आहे? शिवाय तें जडरूप आहे कीं कांहीं निराळें आहे? येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एंपिडोक्लसच्या काळीं अजड पदार्थांची कल्पना करण्याइतकी मनुष्याच्या मनाची तयारी झाली नव्हती. चारच वस्तुमूलांनीं सर्व सृष्टीची उपपत्ति लागत नाहीं, गतीला मूळ हेतु म्हणून स्नेहद्वेषांचा उपन्यास करावा लागतो, अशी कल्पना करूनही अखेर एंपिडोक्लसनें स्नेह व द्वेष यांना जडस्वरूपच बनविलें आहे फार काय ज्याला एंपिडोक्लस स्वतः बुद्धि किंवा (Intelligence) असें नांव देतो, त्याचें स्वरूप म्हणजे फुफुसांच्या भोंवतालचें रक्त हेंच आहे असें त्याचें मत आहे. ( Frag 327. ) एंपिडोक्लस हा वैद्यकविषयंत प्रवीण होता व म्हणून मनुष्याच्या शरीररचनेवरूनच त्यानें सृष्टि-रचनेची अस्पष्ट कल्पना केली आहे. एंपिडोक्लसनेंच प्रथमतः रक्ताचे प्रवाह काळजापासून सर्व अवयवांकडे व पुनः परत काळजाकडे जातात याचा शोध लावला होता; व या अपूर्व शोधाच्या प्रथमोत्साहांत त्याच्याबर-हुकूमच जगतांतील घडामोडी होत आहेत, येवढें म्हणणेंच पुरें आहे

असें त्याला वाटणें अगदीं साहाजिक आहे. ज्याप्रमाणें मनुष्याच्या श्वास व उच्छ्वास या क्रियांनीं सर्व शरीरभर रक्ताचें प्रसरण सुरू होतें, त्याप्रमाणेंच स्नेहद्वेषरूपी श्वासोच्छ्वासानें जगतांतील परिवर्तन चालू आहे येवढेंच म्हणणें त्यावेळीं अद्भुत होतें. ज्याला आधुनिक शास्त्रामध्यें Force of attraction म्हणजे आकर्षणशक्ति व Force of repulsion म्हणजे विकर्षणशक्ति म्हणतात, त्याच्याच शोधाकडे एंपिडोकल्सची प्रवृत्ति होती हेंच महत्त्वाचें आहे. Matter म्हणजे जडद्रव्य व Force म्हणजे शक्ति, यांचा भेद दाखवून शक्ति अमूर्त व अजड आहे, असें ठरविण्याइतकी एंपिडोकल्सच्या काळाची प्रगति झाली नव्हती.

त्याचप्रमाणें कांहीं संघटना शक्य कां, व कांहीं अशक्य कां, याची एंपिडोकल्सला नीट उपपत्ति लावतां आली नाहीं. " पाण्याचें व दारूचें मिश्रण उत्तम होतें, पण तेलाशी तें कधींच मिसळत नाहीं " ( Frag. 284. ) व ' चकचकित तागाच्या कापडावर शेंदरी रंग चांगला खुलतो ' ( Frag. 286. ) हा अनुभव कसा जुळवावयाचा येथें घोटाळा पडतो. पाण्याचा व दारूचा स्नेह आहे, परंतु त्याचा तेलाशी द्वेष आहे येवढेंच म्हणून चालत नाहीं. त्या त्या पदार्थांच्या शरीरछिद्रांमधील साम्य व वैषम्य हेंच याचें कारण असावें असा एक एंपिडोकल्सचा तर्क आहे.

सृष्टींतील नानाविध रचनांविषयींची एंपिडोकल्सची उपपत्ती अशीच अपूर्ण पण मनोरंजक आहे. पुराणांतरी आपणांस चमत्कारिक देह-रचनांचीं वर्णनें सांपडतात. एखाद्याचा सर्व देह पुरुषाचा पण डोकेंच तेवढें बैलाचें, कोणाला दोन डोकीं, तर कोणाला चार हात, कांहीं ठिकाणीं अर्धी स्त्री आणि अर्धा पुरुष, तर कांहीं ठिकाणीं अर्धी स्त्री तर अर्धी नागीण. अशीं जीं

वर्णनें आहेत त्याची उपपत्ती एंपिडोकल्स अशी लावतो कीं, सृष्टीच्या आरंभीं निरनिराळ्या प्राण्यांचे निरनिराळे अवयव अंतरिक्षामध्यें फिरत होते व केवळ सापेक्ष स्नेहाधिक्यामुळें चित्रविचित्र रचना झाली. म्हणजे एकाद्या मनुष्याच्या देहाला ताडाच्या शेंड्यापेक्षां बैलाचें डोकें अधिक जवळचें म्हणून तेंच त्यानें उचललें, झाडाच्या फांद्यापेक्षां हात अधिक प्रिय म्हणून फांद्या टाळण्यासाठीं एकानें हातच पत्करले. अशा रीतीची धालमेल होऊन विचित्र सृष्टिरचना झाली. परंतु कालक्रमानें ही घालमेल कमी होऊन तिला व्यवस्थित स्वरूप आलें. मनुष्याच्या उत्क्रांतीची ही कल्पना मोठी मनोरंजक परंतु अपरिपक्व व चमत्कारिक नाहीं काय ?

पुरुष आणि स्त्री असा भेद होण्याचें कारण एंपिडोकल्स असें सांगतो कीं, " गर्भाशयाच्या उष्णतर भागांतून पुरुषाची उत्पत्ती होते, व म्हणूनच ते अधिक कृष्णवर्ण, अधिक दणगट व केंसाळ असतात " ( Frag. 276 ) पण अगदीं आरंभीं स्त्री कशी झाली व तिला पुरुषांहून निराळी गर्भ–रचना कशी झाली, याची कांहीं यांत उपपत्ति लागत नाहीं.

ज्यावेळेस निरनिराळीं चार द्रव्यें पृथक् झालीं, त्यावेळीं अग्नीनें बराच गोलार्ध व्यापला व हवा खालच्या गोलार्धांत गेली; परंतु या गतीमुळें सृष्टीच्या घनगोळाचा समतोलपणा बिघडून आकाशाची दैनंदिन गति सुरू झाली, आणि याच गतीमुळें पृथ्वी मध्यभागीं राहिली. जर अग्नि पुनः पुनः पृथ्वीखालीं झाला नसता, तर पृथ्वी पडून गेली असती. या अग्निमय गोलार्धालाच दिवस म्हणतात, आणि वायुमय गोलार्धाला रात्र असें नांव पडलें आहे. याच अग्निमय गोलार्धांतून पृथ्वीवर प्रकाश पडतो; व ज्या प्रमाणें एकाद्या वर्तुळाकृति आरशावरून उन्हाचे सर्व किरण एका केंद्रांत जमून त्यांचा तेजस्वी कवडसा होतो, त्याप्रमाणेंच या पृथ्वीवर पडलेला तो प्रकाश

ज्या केंद्रांत मिळाला आहे त्यालाच सूर्य असें म्हणतात. या गोष्टीची उपपत्ति काय, हें एंपिडोक्लसच्या लिहिण्यांत येत नाही. चंद्र हा मात्र परप्रकाशित असून एखाद्याच्या रथामागें फिरावें, त्याप्रमाणें पृथ्वीच्या भोवती तो फिरतो असें त्याचें म्हणणें आहे. ( Frag. 154 ) रात्रीं काळोख पडतो याचें कारण पृथ्वी अग्निमय गोलार्धाच्या आड येते हें होय. ( Frag. 160 )

ज्यावेळेस ही पृथ्वी व हा समुद्र निर्माण झाला नव्हता, ज्यावेळीं तेजस्वी सूर्य व अंधारी रात्र हीं सारखीच अज्ञात होती, तेव्हां सर्व संवादात्मक ( Harmoy ) स्थळीं, घनस्वरूप, ईश्वर निरतिशय शांततेचा आनंद भोगीत होता ( Frag 135 ). त्या परमेश्वराजवळ प्रत्यक्ष जाणें तर दूरच, पण तो आपल्या डोळ्यांच्याही टप्यांत येत नाहीं. त्याला हात नाहींत पाय नाहींत. त्याचें स्वरूप म्हणजे पवित्र व अनिर्वाच्य मन हें आहे; व हेंच मन सर्व सृष्टींतून बाणासारखें संचार करीत आहे ( Frag. 344 ). अमूर्त किंवा अजड अशा तत्त्वाची कल्पना करण्याइतकी तयारी न झाल्यामुळें एंपिडोकल्सच्या बुद्धीची धांव येथेंच थांबली, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. परमेश्वराचें मूळ स्वरूप मात्र फार साधें असून पुढें पुढें पशु हिंसा करून परमेश्वराला खुष करण्याचा सुरू झालेला प्रकार मात्र अत्यंत अनुचित आहे, असें एंपिडोक्लसचें मत होतें.

---

# ॲनॅक्झॅगोरॅस.

तत्त्वज्ञानाच्या इतिहासामध्यें अथेन्सचें नांव प्रथम याच तत्त्वज्ञाच्या हकीगतींत येतें. ॲनॅक्झॅगोरॅस हा मूळचा अयोनिया मधील क्लिझोमिनी (Clazomenae) येथील राहणारा असून त्याच्या बापाचें नांव हेगिसिबूलॉस (Hegesiboulos) असें होतें. तो खि. पू. च्या पाचव्या शतकाच्या मध्य भागाचे सुमारास अथेन्समध्यें आला व पुढें सरासरी तीस वर्षेपर्यंत तेथेंच होता. प्रख्यात अथीनिअन मुत्सद्दी पेरिक्लीज याजबरोबर त्याचा गाढ स्नेहसंबंध असून त्याच्या बोलावण्यावरूनच ॲनॅक्झॅगोरॅस अथेन्सला गेला होता, असें कित्येकांचे म्हणणे आहे. अथेन्सच्या बौद्धिक उत्कर्षाचा पाया घालण्यास जी मंडळी कारणीभूत झाली त्यांतच ॲनॅक्झॅगोरॅस होता यांत कांहीं संशय नाहीं. प्रख्यात नाटककार युरिपाइडिज, अलौकिक इतिहासकार थ्युसिडायाडिस व सर्वमान्य सोफिस्ट प्रोटॅगोरॅस यांचा व ॲनॅक्झॅगोरॅसचा स्नेहसंबंध होता व त्यांच्या प्रमाणेंच त्याची त्यावेळीं ख्याती होती, ही एकच गोष्ट त्याच्या कार्याच्या महत्वाची साक्ष देत आहे. या नव्या विद्येचा प्रसार विशेषतः सरदार घराण्यांतच अधिक झाला होता; व लोकपक्ष आणि सरदारपक्ष यांच्या चुरशींत ॲनॅक्झॅगोरॅस हा विनाकारण बळी गेला. सृष्टीविषयीं त्यानें जी भौतिक उपपत्ति लाविली व ग्रीक लोकांनां अत्यंत प्रिय असलेल्या सूर्यदेवालाही एक लाल तापलेला लोखंडी गोळा ठरविलें, त्यामुळें चिडून जाऊन त्यांनीं ॲनॅक्झॅगोरॅसला शिक्षा केली असें कित्येकांचें म्हणणें आहे. कदाचित ॲनॅक्झॅगोरॅसची भौतिक उपपत्तीच या संकटाला कारण नसून त्याची कांहीं विशेष आक्षेपार्ह भाषासरणीही झाली असेल असा तर्क केल्यास तोही पुष्कळ संभवनीय दिसतो. कारण त्याच वेळीं डायागोरॅस (Diagoras) या नांवाच्या एका नास्तिकाची चौकशी झाली. त्यावेळीं अथीनियन लोकांचा विशेष कटाक्ष त्याच्या नास्तिक-

वादावर नसून त्यानें ग्रीक देवता किंवा त्यांचे उत्सव यांविरुद्ध वापरलेल्या अश्लाध्य भाषेवर होता. एखाद्यास देवाचें अस्तित्व मानावयाचें असल्यास मानावें किंवा मानूं नये; परंतु सर्व समाजाला संमत असलेल्या देवदेवतांची अश्लाध्य भाषेनें निंदा करूं नये, असा अथेनियन लोकांचा कटाक्ष दिसतो. तें कसेंहि असो, ॲनॅक्झगोरॅसवर फिर्याद होऊन त्याला बंदिवासांत पडावें लागलें, व आपला प्राण वाचविण्यासाठीं, पेरिक्लीजच्या साहाय्यानें आपली मुक्तता करून घेऊन, त्याला लांबसॅकॉसला पळ काढावा लागला. पुढें तो कांहीं दिवस लांबसॅकॉस येथेंच राहिला, व तेथेहि त्यानें आपला पंथ स्थापन केला. तथापि एकंदरींत ॲनॅक्झॅगोरॅसचा पुष्कळ काळ अथेन्समध्येंच गेला असल्यामुळें अथेन्समधील सर्वांत अधिक जुना तत्त्वज्ञ तोच असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

ॲनॅक्झॅगोरॅसच्या जन्मकाळाविषयीं बराच वाद आहे. ॲरिस्टॅटलनें एका ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, " ॲनॅक्झॅगोरॅस हा एंपिडोक्लसपेक्षां मोठा होता; परंतु लिहिण्यामध्यें तो त्याच्या मागें होता ?' या म्हणण्याचा अर्थ, त्यानें एंपिडोक्लसनंतर लिहावयास सुरवात केली. परंतु त्यावेळीं त्याचें वय एंपिडोक्लसपेक्षां अधिक होतें असाच घ्यावयाचा, किंवा तो एंपिडोक्लसपेक्षां वयानें मोठा असून देखील त्याची लेखनशक्ती एंपिडोक्लसच्या शक्तीपेक्षां पुष्कळच कमी होती असा घ्यावयाचा, हें नक्की सांगता येत नाहीं. त्याचप्रमाणें त्याजवर झालेली फिर्याद कधीं झाली हेंही नक्की नाहीं. अथेन्स व स्पार्टा यांजमध्यें जे पेलॉपोनीससचें युद्ध सुरू झालें, त्याचे आधीं ही गोष्ट घडून आली असावी असा तर्क आहे. तथापि या गोष्टीचा काळ बराच मागें नेण्यासही कांहीं विशेष हरकत दिसत नाहीं. सॉक्रेटिसनें ॲनॅक्झगोरॅसच्या मतांचा अनेकदां उल्लेख केला आहे; व त्यापासून आपलें समाधान झालें नाहीं म्हणून म्हटलें आहे. परंतु प्लेटोनें आपल्या संवादामध्यें त्याची व सॉक्रे-

टिसची भेट झाल्याचा कोठेंच उल्लेख केला नाहीं. ॲनॅक्झगोरॅसचा मित्र व प्रख्यात सोफिस्ट प्रोटॅगोरॅस याजबरोबर सॉक्रेटिसचा झालेला संवाद प्लेटोनें दिला आहे. यावरून ॲनॅक्झगोरॅसवर अधार्मिकतेबद्दल झालेली फिर्याद पूर्वींच झाली असून सॉक्रेटिसच्या तरुणपणींदेखील तो स्वतः अथेन्समध्यें नसावा, केवळ त्याचें मत मात्र परंपरेनें राहिलें असावें, असें अनुमान करण्यास जागा आहे.

ॲनॅक्झगोरॅसचा व अथेन्सचा कितीही संबंध झाला तरी त्यानें आपला आयोनियांतील विशेष संस्कार कधींही सोडला नाहीं. आयोनियांतील तत्वज्ञानाच्या पद्धतीला अनुसरून त्यानें आपली ग्रंथरचना गद्यांत केली ही तर महत्वाची गोष्ट आहेच; पण ॲनॅक्झिमीनसची सृष्टीरचनेसंबंधीचीं मतें देखील त्यानें सोडलीं नाहींत ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

एंपिडोक्लसनें विविध सृष्टीच्या उत्पत्तीला आधारभूत अशी चार द्रव्यें मानलीं, व त्यांना सन्मूलें असें नांव दिलें. ॲनॅक्झिगोरसनें तें वस्तूच्या मूळ घटकांनां ' बीजें ' असें नांव दिलें आहे; परंतु एंपिडोक्लसची मूळ द्रव्यें व ॲनॅक्झगोरसचीं बीजें यांमध्यें फार अंतर आहे. मनुष्याच्या शरीरांतील हाडासारखा एक पदार्थ घेतला तर एंपिडोकलसचें असें म्हणणें होतें कीं, पृथ्वी, आप, तेज व वायु, यांच्या विशिष्ट परिणामांत झालेल्या एकीकरणानें हा पदार्थ तयार झाला आहे; परंतु ही कल्पना ॲनॅक्झगोरॅसला पसंत नव्हती. तो असें उदाहरण देतो कीं, मनुष्य अन्न व उदक यांचें सेवन करतो, व त्यांपासून त्याच्या अंगावर केस उगवतात, शरीरांत रक्त वाढतें व त्याचीं हाडें कणखर होतात. आतां हें अन्नोदकाचेंच परिवर्तन आहे म्हणावें तर ही गोष्ट मोठी कठीण आहे. एका वस्तूची दुसरी वस्तू कशी होईल. वस्तूचें मूळद्रव्य म्हणून जें कांहीं एंपिडोकलस सांगतो, तें तरी आपलें मूळ रूप काय म्हणून टाकील ? (Frag 10) यावरून एंपिडोकलसची उपपत्ति पुरेशी होत नाहीं.

तर मग या विविध सृष्टीच्या उपपत्तीचा खरा मार्ग कोणता ? व ॲनॅक्झॅगोरस ज्याला वस्तूबीजें म्हणतों, त्यांचें स्वरूप तरी काय ! ॲनॅक्झॅगोरॅसचें असें मत आहे कीं, आपण जर मनुष्याच्या शरीरांतील हाड व रक्त हे दोन पदार्थ घेतले व त्यांचे अगदीं लहान लहान विभाग पाडीत गेलों, व अशा रीतीनें त्यांचें पृथक्करण करूं लागलों, तर त्यांचे अनंत अवयव होतील; परंतु आपणांस सरते शेवटीं असें आढळून येईल कीं, हाडकाच्या प्रत्येक अंशांत हाडकाचेंच सर्व गूण अंशतः सांपडतात व रक्ताच्या अंशांत रक्ताचे गूण सांपडतात. हाच नियम सर्व पदार्थांना लागू आहे. यावरून नानाविध व नानागुणक अशा पदार्थांच्या मुळाशीं जे तितक्याच प्रकारचे व त्याच गुणाचे त्यांचे अंश आहेत अशी ॲनॅक्झ-गोरॅसची कल्पना होती, त्या अंशांना त्यानें वस्तुबीजें असें नांव दिलें आहे. या नामकरणामध्यें कदाचित् असाही गर्भित अर्थ असेल कीं, ज्याप्रमाणें एक वृक्ष दुसऱ्या वृक्षापासून जितका, व ज्या गुणांमुळें भिन्न, तितकींच त्यात्या वृक्षांचीं बीजेंही एकमेकांपासून तितकींच व त्याच गुणांमध्यें भिन्न असतात. त्याप्रमाणेंच हे वस्त्वंश एकमेकांपासून भिन्न असतात. याच मताला गुणपरमाणुवाद किंवा Qualitative atomism असें नांव देतात. आपल्या इकडील वैशेषिक दर्शनामध्यें विशेष हा एक पदार्थ मानला आहे, व त्यावरूनच त्याला वैशेषिक हें नांव पडलें आहे. हें वैशेषिक दर्शन गुणपरमाणुवादि आहे असेंच म्हटलें पाहिजे. विशेष हा पदार्थ मानण्याची जरूर काय, असा प्रश्न उपस्थित झाला तर वैशेषिक असें म्हणतात कीं, आपण एक घट व एक पट अशा दोन वस्तु घेतल्या तर त्या एकमेकांपासून भिन्न आहेत; याचें कारण त्यांचे अवयव भिन्न आहेत. पण अशा रीतीनेंच त्या अवयवांचेही अवयव पाडीत आपण पुढें गेलों तर सरतेशेवटीं आपणास जे अविभाज्य सूक्ष्म वस्त्वंश सांपडतात त्यासच परमाणू म्हणतात. पाश्चात्य राष्ट्रांतील परमाणुवादाचा उदय ॲनॅक्झगोरॅस पासून झाला, व पुढें ल्युसीपसनें

त्याला अधिक स्पष्ट स्वरूप दिलें, ही हकीगत याच भागांत पुढें येणारच आहे. वैशेषिक म्हणतात कीं, हे घटाचे मूळ परमाणू व पटाचे मूळ परमाणू हेही एकमेकांपासून भिन्न आहेत; व ते ज्यामुळें भिन्न आहेत त्यालाच आम्ही विशेष असें म्हणतो. एका वस्तूची दुसऱ्या वस्तूपासून अत्यंत व्यावृत्ति होण्याचें कारण विशेष आहे. फार काय, एका घटाचे जे मूळ परमाणू तेही परस्पर भिन्नच आहेत आणि त्यांचा भिन्नपणाही या विशेषावरच अवलंबून आहे. ज्याअर्थी हे परमाणू अनेक आहेत, त्या अर्थी विशेषही अनंतच आहेत. ॲनॅक्झगोरॅसचेंही असेंच मत दिसतें कीं, तें वैशेषिक दर्शनाइतके स्पष्ट मांडले गेलेले नाहींत हें मात्र खरें.

ॲनॅक्झॅगोरॅसच्या मताप्रमाणें ही वस्तुबीजें अगदीं भिन्नभिन्नधर्मीय आहेत अशी कल्पना केली, तर अशी एक अडचण उपस्थित होते कीं, विविधपदार्थांच्या उत्पत्तीचें कोडें सुटल्यासारखें वाटतें; पण सुटत नाहीं. झाडाचे व रक्ताचे अत्यंत सूक्ष्म अंश एकमेकांपासून भिन्न असावेत हें म्हणणें ठीक आहे; पण पुढें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, अन्नपाण्यापासून रक्तमांसाची वृद्धी कशी होते, किंवा हाडें बळकट कशीं होतात? झाडाला पाणी घातलें तर त्याला पाणी न फुटतां पानें कशीं फुटतात, किंवा गाईला चारा घातला असतां तिला दूध कसें येते? या पदार्थांमध्यें परस्पर साम्य तर कांहीं दिसत नाहीं, मग ही सृष्टींतील विविध रचना या वस्तूबीजांमधून कशी व्हावयाची? यावर असें लक्षांत ठेवावयाचें कीं, ॲनॅक्झॅगोरॅसच्या मतें हीं वस्तुबीजें अनंत आहेत येवढेंच नव्हें तर सर्व गुणसंपन्न आहेत. जगतामध्यें जे जे गुण आहेत ते ते सर्व त्याच्या अत्यंत सूक्ष्म बीजांमध्येंही आहेत. एक वस्तूबीज दुसऱ्यापासून छाटून दूर केलेलें नाहीं असें जें तो म्हणतो त्याचा मतितार्थ हाच दिसतो. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, प्रत्येक वस्तू प्रत्येक दुसऱ्या वस्तूंत अंशतः आहेच, व त्यावरून विविध-सृष्टीची रचना व भिन्नधर्मीय वाटणाऱ्या पदार्थांची उत्पत्ती शक्य आहे.

वर घेतलेल्या उदाहरणाकडे पुनः वळून आपणांस असें म्हणता येईल कीं, अन्नपाण्यापासून हाडें वाढतात याचें कारण अन्न-पाण्यांतही हाडांचा अंश असतो हेंच होय. पाण्यांत पानें व पानांत पाणी हें अंशतः आहेच. दूध घेतलें तरी त्यांत गवताचा अंश आहेच व गवत तरी दुधाच्या अंशाशिवाय नाहींच. मग वस्तूचा अन्यथाभाव कसा होईल ही अडचण कशी उपस्थित होईल? आपल्याकडील वेदांतग्रंथामध्येंही ही विचारसरणी कांहीं कांहीं ठिकाणीं घेतली आहे. उदाहरणार्थ श्रीरामानुजाचार्य आपल्या ग्रंथामध्यें, सर्वत्र सत्ख्याति म्हणजे सत्स्वरूप वस्तूचीच प्रतीति आहे हें सांगण्यासाठीं ते म्हणतात कीं, सर्व वस्तू हा एकाच द्रव्यांच्या त्रिवृत्करणानें सिद्ध झालेल्या असल्यामुळें प्रत्येक वस्तूंत दुसरी प्रत्येक वस्तू आहेच असें म्हणावयास हरकत नाहीं; व म्हणूनच सर्व ठिकाणीं सत्ख्याति आहे. उदारणार्थ चकचकणारी शिंपी पाहून तीं चांदी आहे म्हणून मनुष्य उचलावयास जातो. त्या ठिकाणीं त्याला नसणारी चांदी दिसली कीं असलेली चांदी दिसली असा प्रश्न येतो, व निरनिराळ्या पंथाचे लोक त्याला निरनिराळीं उत्तरें देतात. परंतु श्रीरामानुजाचार्य म्हणतात कीं, येथें जी चांदी त्या मनुष्याला दिसली ती खरीच चांदी आहे; कारण चांदींत शिंप आहे व शिंपेंतही चांदी नाहीं असें नाहीं. कदाचित् अदृष्टवशानें मनुष्याला शुक्त्यंश मुळींच न दिसतां रूप्यंश मात्र दिसतो, व मनुष्याला ही चांदी आहे असें वाटतें.

प्रत्येक वस्तूंत दुसरी प्रत्येक वस्तू आहे असें म्हटलें तर मग एक वस्तू दुसऱ्यापासून वेगळी आहे असें तरी कसें म्हणावयाचें? अन्नांत हाडें व हाडांत अन्न असेल तर एकाला अन्न कां म्हणावयाचें व दुसऱ्याला हाड कां म्हणावें? यावर ॲनॅक्झॅगोरॅसचें असें उत्तर आहे कीं, वस्तू-मध्यें जो भाग अधिक असेल त्यावरून त्याचें नांव पडतें. अन्नामध्यें अन्नाचा अंश अधिक आहे व हाडाचा फार थोडा आहे म्हणून त्याला

अन्न म्हणतात. श्रीरामानुजानींही हेंच उत्तर दिलें आहे. शिंपींत रूपें असूनही तिला शिंप म्हणण्याचें कारण तरी हेंच कीं, तिजमध्यें शिंपीचा अंश अधिक आहे. या जगताच्या आरंभी जो एक अव्यवस्थित वस्तूबीजांचा ढीग होता, त्यामध्येंही हवा किंवा अग्नी यांचेंच अधिक्य असल्यामुळें त्याचें स्वरूपही अग्निमय किंवा वायुमय आहे असें भासणें अगदीं स्वाभाविक आहे. ॲनॅक्झॅगोरॅस हा आयोनियन होता व म्हणून त्याचा मूळपासून ॲनॅक्झिमीनसकडे ओढा होता, व एंपिडोकल्सच्या मताप्रमाणें हवा किंवा वायू हें एक स्वतंत्र तत्त्व झाल्यावरही आपल्या मूळ गुरूची एक तऱ्हेची तरफदारी करण्याचाच या ठिकाणीं ॲनॅक्झॅ-गोरॅसनें प्रयत्न केला आहे.

येथपर्यंतच्या विवेचनावरून ॲनॅक्झॅगोरॅसची गणना माध्यमिक पंथांत ( Mediators ) मध्यें कां केली जाते हें लक्षांत येईलच. त्याच्या मतें वस्तुबीजें हीं एकरूप म्हणजे अविकृतच आहे; फक्त त्यांच्या भिन्न-भिन्न प्रमाणांतील मिश्रणानें विविध सृष्टीची रचना झाली आहे, व यांतच पारमिनाइड्स्च्या व सृष्टिवाद्यांच्या मताचा समेट झाला आहे.

यापुढील विशेष महत्वाचा प्रश्न म्हणजे गतीचें मूळ कारण काय हा होय. एंपिडोकल्सनें त्याचें उत्तर स्नेह व कलह असें दिलें होतें. ॲनॅक्झ-गोरॅसचें मत याहून निराळें आहे. पारमिनाइड्सच्या विवेचनानें पदार्थां-मध्यें स्वयंसिद्ध गति नाहीं हें सिद्ध झालें होतें; व म्हणून त्यांजमध्यें गति उत्पन्न होण्यास कांहींतरी आगंतुक कारण अवश्य हवें होतें. सृष्टीमध्यें सभोंवार नजर फिरविली असतां असें आढळून येतें कीं, त्याचे व्यापार अव्यवस्थित नसून अगदीं रेखलेले आहेत. विशेषतः आकाशांतील तारकापुंजांच्या गति परस्पर संवादी असून नियमबद्ध आहेत. पायथॅगोरॅसच्या मताप्रमाणें तर हे गोल एकाच तालावर फिरत आहेत. ॲनॅक्झगोरॅस हाही एक गणिती होता अशी त्याची ख्याती असल्याचें कित्येक ग्रंथकार म्हणतात, व पायथॅगो-

रॅसच्या मताची त्याला चांगली माहिती असावी हें अगदीं साहजिकच आहे. आतां जगतांतील सर्व गति जर कांहीं नियमानुरूप असतील तर त्या नियमाचा किंवा कायद्याचा कोणीतरी कर्ता पाहिजेच, व तो कर्ता बुद्धिगुणोपेत पाहिजे. असा बुद्धिगुणोपेत चालक ज्याप्रमाणें शरीरांत त्याप्रमाणेंच अखिल सृष्टींतही मनच आहे. याला ॲनॅक्झॅगोरॅसनें नाउस असें नांव दिलें आहे. एका बाजूला सर्व जड वस्तु व दुसऱ्या बाजूला त्याहून अतिशय भिन्न व सर्वचालक असें मन, याप्रमाणें हें द्वैत स्थापन झालें. जड व अजड यांचें हें भिन्नत्व ॲनॅक्झॅगोरॅसनें प्रथम पुढें मांडलें. त्याच्या मतें मनाला इतकें स्वातंत्र्य आहे कीं, तें एकच असंमिश्र आहे. प्रत्येक पदार्थांत दुसरी प्रत्येक वस्तु असते हा सामान्य नियम मनाला मात्र लागूं नाहीं. मनाला मात्र स्वतंत्र अस्तित्व आहे. तें आपण होऊन ज्या पदार्थाशीं मिसळेल तो पदार्थ सचेतन होतो व दुसरा अचेतनच राहातो. सृष्टीच्या नियमबद्धतेवरून त्याच्या मुळाशीं बुद्धिरूप तत्त्व असावें असें अनुमान काढून परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध करणाऱ्या मताला Teleology बुद्धिमत्कर्तृकवाद असें नांव आहे; व या मताचा मूळपाया ॲनॅक्झॅगोरॅसच्या मतांत आहे.

हें मन किंवा ही बुद्धि प्रथमतः चक्राकार गति उत्पन्न करते, व त्यापासून इतर सर्व गती उत्पन्न होतात असें ॲनॅक्झॅगोरॅसचें म्हणणें आहे. या मनालाच तो ईश्वर असें नांव देतो. यावरून तो खऱ्या दृष्टीनें पूर्ण अस्तिक्यवादी आहे असेंच म्हटलें पाहिजे. या मनाव्यतिरिक्त इतर वस्तूंनां कोणी देव मानल्यास, ते त्याला न खपून तो झेनोफेनसप्रमाणेंच त्याची टवाळी करी हें खरें; व त्याच्या-दृष्टीनें अदेव असणारे कित्येक पदार्थ ग्रीक लोकांच्या मतें देवच होते हेंच त्याच्यावर आलेल्या नास्तिकत्वाच्या आरोपाचें मूळ आहे.

आपण एखाद्या नागमोडी रस्त्याच्या पहाडांतून प्रवास करीत असलों तर पुष्कळवेळां असें होतें कीं, आपली मुक्कामाची जागा अगदीं जवळ

आलेली दिसते; परंतु लगेच रस्त्याला वाकण लागतें व आपल्या नजरे-समोर दिसणाऱ्या त्या विश्रामस्थानाला पोंचण्यास आपणास कित्येक मैल प्रवास करावा लागतो. तत्त्वशोधनामध्यें तरी हीच तऱ्हा आहे. आपणास क्षणभर असें वाटतें कीं, या विश्वाचें कोडें उलगडलें, पण पुनः पहावें तों आपण अनिश्चिततेच्या नागमोडी रस्त्यानें भटकतां भटकतां त्या प्रत्यक्ष सुखापासून कितीतरी वेळ लांबच राहातों. ॲनॅक्झॅगोरॅसनें मन किंवा बुद्धि या अजड व स्वतंत्र तत्त्वाची स्थापना केल्याबरोबर क्षणभर असें वाटतें कीं, आतां विश्वाचें कोडें खास उलगडेल, पण पुनः पहावें तो आपलें परिभ्रमण कायमच. मनाचें स्वरूप काय, असा प्रश्न उपस्थित झाल्याबरोबर ॲनॅक्झॅगोरसची गडबड उडते, व मन हें जड द्रव्याच्या सर्वांत सूक्ष्म अंशांनीं बनलेलें एक तऱ्हेचें द्रव्यरूप तत्त्व आहे असेंच कांहींतरी म्हणून त्याला वेळ मारून न्यावी लागते. या कारणाकरितांच साक्रेटिसनें ॲनॅक्झॅगोरॅसचें मत असमाधानकारक आहे असें म्हटलें आहे. सर्व भौतिक सृष्टीचें कोडें मनाच्या जोरावर त्यास उकललें आहे म्हणून मोठ्या आस्थेनें जों तें पाहूं जावें तों तें मनच अखेर भौतिक निघतें! मग येवढ्या खटपटीचा उपयोग तरी काय? ॲनॅक्झॅगोरॅसचें मत सूचक या दृष्टीनें मात्र अतिशय महत्त्वाचें आहे. त्या दिव्य बुद्धितत्त्वाची त्याला पूर्ण ओळख झाली नाहीं तरी त्यानें ती अपूर्णत्वानें तरी ओळखली व पुढें मांडली हीच त्याची तत्त्व-ज्ञानविषयक मोठी सेवा होय.

चंद्र, सूर्य इत्यादि खगोलस्थ वस्तूंविषयीं ॲनॅक्झॅगोरॅसचीं मतें मोठीं चमत्कारिक होतीं. चंद्र व सूर्य हे लाल तापलेले दगड किंवा लोखं-डाचे गोळे आहेत असें तो म्हणे, व त्याजवर अधर्मिकतेचा आरोप येण्यास हेच त्याचे शब्द कारणीभूत झाले असावे. कारण ग्रीक लोक सूर्याची पूजा करीत व सूर्य म्हणजे एक धोंडा किंवा लोखंडाचा गोळा असें म्हणणें त्यांच्या दृष्टीनें नास्तिकपणाचेंच होतें. ख्रि. पू. सुमारें

४६८–७ ह्या वर्षी ग्रीस देशामध्यें एक मोठी उल्का पडली होती; व या उल्काशिलेवरून ॲनॅक्झॅगोरसची अशी कल्पना होती की, असेच कित्येक दगड किंवा लोहगोळ पृथ्वीपासून विभक्त होऊन, गोफणींतून फेंकलेल्या गोट्याप्रमाणें पृथ्वीभोंवतीं फिरत असावे. त्यापैकीं सूर्य हा गोळा पेलोपोनिसस किंवा दक्षिणग्रीस येवढा मोठा असावा असें त्याचें अनुमान होतें. चंद्र परप्रकाशित आहे असेंच त्याचें मत होतें. सूर्यग्रहण हें, चंद्र, पृथ्वी व सूर्य यांजमध्यें आल्यामुळें होतें हें त्याला कबूल होतें; परंतु पृथ्वीचा घनगोल आकार त्याला मान्य नव्हता. या बाबतींत तो ॲनॅक्झिमीनसच्याच मताला चिकटून राहिला होता. पृथ्वी ताटलीसारखी आहे अशाच मताचा त्यानें स्वीकार केला होता. म्हणून चंद्रग्रहणाची उपपत्ति लावण्यासाठीं त्याला आपणांस अदृश्य अशा कांहीं काळ्याकुट्ट वस्तूंच्या अंतरिक्षांतील भ्रमणाची कल्पना पत्करावी लागली.

# ल्युसीपस.

ॲनॅक्झॅगोरॅस व ल्युसीपस यांजमध्यें गुरुशिष्यांचें नातें असल्याचा कोठेंही उल्लेख नाहीं. ल्युसीपसचें जन्मस्थान गायलीटस किंवा इलिया याबद्दलही संशयच आहे. तथापि तो इलिया येथील पंथाशीं विशेष परिचित असून त्याचा त्यांतल्यात्यांत झेनोशीं विशेष संबंध होता; परंतु ल्युसीपसनें इलियाटिक पंथालाच चिकटून न राहतां एंपिडोकल्स व ॲनॅक्झॅगोरॅस प्रमाणेंच दोन्ही पक्षांमध्यें एकतऱ्हेची तडजोडच काढण्याचा प्रयत्न केला; व म्हणून त्याचा विचार याच माध्यमिक पंथांच्या प्रकरणांत करणें योग्य आहे.

ल्युसीपससंबंधी आपणांस जवळ जवळ कांहींच माहिती नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. येवढेंच नव्हें तर, त्याच्या गुरुहूनही विशेष प्रसिद्ध शिष्य डिमॉक्रीटस याच्या मतांपासून त्याचीं मतें किंवा ग्रंथावशेष निराळे काढण्यासही ॲरिस्टॉटल व थिओफ्रेस्टॉस यांचेच श्रम कारणीभूत झाले आहेत.

एंपिडोकल्सनें विविध सृष्टीची उभारणी चार मूलद्रव्यावर आहे असें दाखविलें, व ॲनॅक्झॅगोरसनें त्याच विविधतेचा नियमित चारच मूळ द्रव्यावर न ठेवतां अनंत गुणपरमाणूवर रचला; परंतु ल्यूसीपसचें मत या दोघांहूनही निराळेच आहे. तो म्हणतो कीं, वस्तु ही केवळ शरीर म्हणजे जडद्रव्य आहे, व म्हणूनच तिजमध्यें गुण आहेत ही कल्पना फोल आहे. इतक्या पुरता तो इलियाटिक पंथाचा पूर्ण अनुयायी आहे; परंतु त्याच्या मतें पारमिनाइड्स म्हणतो त्याप्रमाणें वस्तु एक नसून अनंत आहे आणि हीं सृष्टीचीं अत्यंत सूक्ष्म अनंत रूपें म्हणजे परमाणू होत. मेलीससनें असा एक मुद्दा पुढें आणला होता कीं, जर कदाचित् आम्हीं म्हणतों त्या विरहित दुसरी सद्वस्तु असेल तर ती हुबेहुब

आमच्याच वस्तूसारखी असली पाहिजे, व ती इतकीं सारखी होईल कीं, दोन्हीमध्यें भेदच राहाणार नाहीं. हा विचार पुढें मांडण्यांत मेलीससचा हेतु विषमोपपत्ति ( Reduction and absurdum ) दाखविण्याचा होता; परंतु ल्युसीपसचें म्हणणें असें कीं, ही विषमोपपत्तिच होत नाहीं. वस्तू अनंत असूनही मेलीससच्या म्हणण्याप्रमाणें अडचण न येण्याचें कारण असें कीं, इलियाटिक पंथाची शून्य प्रदेशाभावाची कल्पना ल्युसीपस मुळींच मान्य करीत नाहीं. त्याचें म्हणणें असें कीं, शून्यस्थल व अभाव हीं अगदीं समानार्थक नाहींत. जगांत शून्यस्थलाची कल्पना केलीच पाहिजे व याच शून्यस्थलानें वस्तूंचीं अनंत रूपें एकमेकांपासून विभक्त असल्यामुळें तीं एकरूप होत नाहींत.

परमाणूंची सापेक्ष स्थिति पालटली म्हणजेच गति उत्पन्न होते. सर्व परमाणू सारख्याच आकाराचे नसल्यामुळें ही गति एकदां उत्पन्न झाली म्हणजे आकारानें मोठें असलेले परमाणू मध्यभागीं जमा होतात व ज्यांचा आकार लहान आहे ते परमाणू परिघाच्या ठिकाणीं जातात. असें होण्याचें कारण त्या परमाणूंचे वजन नव्हे. वजन हा गूण परमाणूंचा स्वभावसिद्ध नसून त्याच्या आनुषंगिक संख्याधिक्यावरून ठरणारा आहे. मोठे परमाणू मध्यभागीं जमा होण्याचें कारण असें कीं, त्यांचा आकार मोठा असल्यामुळें आघात प्रत्याघाताला उघडा पडणारा त्यांचा पृष्ठभाग मोटा असतो, व त्यामुळें त्या आघात प्रत्याघाताचा परिणाम कमी तीव्र होतो व म्हणून जेथें गति कमी असेल तेथें राहाण्याची त्याची साहजिकच प्रवृत्ति होते. परीघवर्ति गतीपेक्षां मध्यवर्ती गती लहान असल्यामुळें हे सर्व स्थूलपरमाणू मध्यभागी जमा होतात. ज्याप्रमाणें एखाद्या चाळणीच्या साहाय्यानें जोंधळे, गहूं, बाजरी, हीं धान्यें मिसळलीं असली तरी सहज वेगळीं होतात, किंवा ज्याप्रमाणें नदीच्या लाटांनीं लांबोडे व वाटोळे दगड आपोआप एकत्र होतात, त्याप्रमाणेंच हे स्थूल व सूक्ष्म परमाणू एकत्र होतात. ल्युसी-

पसच्या मतांमध्यें जगतांची यांत्रिक उपपत्ती जवळ जवळ पूर्णत्वाला गेली आहे. त्याचप्रमाणें त्याचा जडवादही अगदी उघड उघड व निर्धास्तपणें पुढें मांडलेला आहे. आत्मा म्हणून कांहीं जडाव्यतिरिक्त वस्तू आहे असें ल्युसीपस मुळींच मानीत नाहीं. आत्म्याचे परमाणू अतीशय सूक्ष्म असल्यामुळें त्यांची गति अतिशय तीव्र व वाऱ्यासारख्या आनुषंगिक कारणांवर अवलंबून नाहीं. डिमॉक्रीटसनें याबद्दल असा दृष्टांत दिला आहे कीं, ज्याप्रमाणें सूर्यकिरणांत दृग्गोचर होणारे सूक्ष्म रजःकण वारा नसला तरी खालीं वर फिरत असतात त्याप्रमाणेंच आत्म्याच्या परमाणूंची अवस्था आहे.

गतीच्या शक्याशक्यतेविषयीं उपपत्ती लावणें हा मुद्दा जितका महत्वाचा आहे तितकाच त्या गतीचें मूळकारण शोधून काढणें हा आहे. एंपिडोक्लसनें राग द्वेष या दुकलीची कल्पना करून त्याची उपपत्ती बांधली तर ॲनॅक्झॅगोरसनें असामान्यरूप बुद्धीची स्थापना करून त्याची व्यवस्था लावली. परंतु ल्युसीपसच्या मतें या गतीच्या कारणाचा शोधच करण्याची जरूर नाहीं. या जगतांत गति ही मूळचीच आहे, ती गति थांबली तरच ती थांबण्यास कांहीं कारण पाहिजे. सारांश गतिची उपपत्ती लावण्यांचें कांहीं कारण नसून गतिनाश झाला तरच त्याची उपपत्ती लावली पाहिजे. ल्युसीपसच्या या विचारसरणीनें निमित्तकारणरूप परमेश्वर, मन, राग द्वेष-इत्यादि कल्पनांना एकदम उच्चाटण मिळतें. जगताचें रहाटगाडगें आपोआपच सारखें फिरत आहे. त्याला फिरवणारा ह्मणून कोणी परमेश्वर नको किंवा त्यांच्या प्रवृत्तीला साधक म्हणून रागद्वेषांचीही तिळमात्र जरूरी नाहीं.

जगताच्या रचनाविषयक बाबतींत ल्यूसीपस हा ॲनॅक्झिमीनसच्याच मताला चिकटून होतां येवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे. पृथ्वीचा पृष्ठभाग दक्षिणदिशेला कलता असण्याचें कारण मात्र ल्युसीपसनें असें

दिलें आहे कीं, त्या भागांतील उष्णतेनें हवा विरळ झाल्यामुळें तिला पृथ्वीचें वजन न झेपल्यामुळें पृथ्वीचा दक्षिण गोलार्ध खालीं झुकला.

पहिल्या प्रकरणांमध्यें थेल्सनें जगतांच्या आदिकारणाचीं व त्याच्या उपपत्ती विषयींची ज्या हेतूनें पृच्छा केली होती त्या हेतूनें त्या प्रश्नाचें उत्तर ल्युसीपसनें दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. निदान सध्यां तरी मानवी ज्ञानाची मर्यादा पुढें जाणें शक्य नव्हतें. तें साधण्यास आधीं ज्ञान ( Knowledge ) व आचार ( Conduct ) या विषयांचाच ऊहापोह होणें अत्यंत अवश्यक होतें व या मालेच्या द्वितीय पुष्पांत याच विषयाचा यथावकाश विचार करावयाचा आहे. या विषयांतील मध्यवर्ती विभूति म्हणजे प्रख्यांत सॉक्रेटिस हीच होय; परंतु डिमॉक्रीटस त्याचा समकालीन असूनही ल्यूसीपसचा शिष्य व म्हणूनच माध्यमिक पंथांत मोडणारा, यास्तव त्याजविषयीं थोडक्यांत माहिती देऊन हें प्रकरण आटोपूं. प्रस्तुत पुष्पाचा उद्देश साधारणतः सॉक्रेटिसच्या काळापर्यंतचा तत्त्वज्ञानाचा इतिहास सांगणें हा असल्यामुळें, केवळ कालगणनेवरून पाहिलें तर डिमॉक्रीटसला येथें स्थान मिळूं शकत नाहीं; परंतु ल्यूसीपसचा शिष्य या नात्यानें त्याच्या मतांची माहिती देणें या ठिकाणीच विशेष सोईचें वाटल्यावरून तसें करण्यांत येत आहे.

---

# डिमॉक्रीटस

डिमॉक्रीटसच्या कार्याची दिशा पुष्कळशी सॉक्रेटिसच्या कार्यासारखीच आहे. डिमॉक्रीटसचा नागरिक बंधू व प्रख्यात सोफिस्ट प्रोटॅगोरॅस यानें ज्ञानाच्या शक्याशक्यतेविषयी जो प्रश्न उपस्थित केला होता व त्याजप्रमाणें इतर सोफिस्टांनींहीं आचारविषयक प्रश्नांची जी चर्चा सुरू केली होती, त्याला योग्य उत्तर देणें हा डिमॉक्रीटसचाही उद्देश होता. सॉक्रेटिसनें स्वतः ग्रंथरचना मुळीच केली नाहीं म्हटलें तरी चालेल. उलटपक्षीं डिमॉक्रीटसची ग्रंथलेखनाबद्दल ख्याती आहे. परंतु डिमॉक्रीटस व त्याचे ग्रंथ याजविषयींची आपली माहिती अल्पच आहे. याचें कारण असें कीं, त्यानें आपले सर्व ग्रंथ ॲब्डेरा येथें लिहिलें व अथेन्समध्यें त्यांनां विशेषशी मान्यता मिळाली नाही. जर त्यांची अथेन्समध्यें चहा झाली असती तर प्लेटोच्या पीठांत ( Academy ) त्यांचा खास संग्रह झाला असता असें म्हणावयास हरकत नाहीं. अरिस्टॉटलला मात्र डिमॉक्रिटस व त्याचे ग्रंथ यांची बरीच माहिती होती. कारण त्याचा जन्म अयोनियाच्या उत्तरभागांतच झाला होता व डिमॉक्रीटसचे ग्रंथ अथेन्समध्यें मान्य झाले नसले तरी त्याच्या ग्रंथांचे परिशीलन व त्याच्या मतांचा प्रसार ॲब्डेरा, टिऑस इत्यादि ठिकाणीं बराच काळपर्यंत सुरू होता. थ्रॅसीलसनें डिमॉक्रीटसचे ग्रंथ एकत्र केलें होतें, परंतु या प्रयत्नांनाही यावें तसें फल आलें नाहीं. एपिक्यूरिअन् लोकांनीं आपलीं कांहीं मतें डिमॉक्रिटसपासून उचलली होतीं व या दृष्टीनें त्यांना या ग्रंथकाराचें विशेष महत्व वाटून, त्यानीं त्याच्या ग्रंथांचे जतन करावें; परंतु एपिक्यूरियन् लोक बहुधा शास्त्राभ्यासपराङ्मुख असत व डिमॉक्रिटसच्या मतांची माहिती पुरवून आपल्या मतांतील नाविन्याचें श्रेय गमावणें हेंहीं त्यांनां कदाचित् पसंत नसावें असें दिसते.

सारांश डिमॉक्रिटसच्या ग्रंथांबद्दलची माहिती फार तुटक आहे, व त्याच्या चरित्राविषयींही आपणास कांहीं विशेष माहिती नाहीं. त्याचा जन्म थ्रेसमध्यें अॅबडेरा येथें झाला. प्रख्यात सोफिस्ट प्रोटॅगोरॅस हाही याच गांवचा असल्याबद्दल वर उल्लेख आलाच आहे. अॅब्डेरा हें गांव त्याच्यांतील लोकांच्या मंदपणाबद्दल प्रसिद्ध आहे; परंतु ज्या गांवांत प्रोटॅगोरॅस व डिमॉक्रीटस सारखे बुद्धिमान् लोक निपजले, त्या गांवावर मंदपणाचा शिक्का पडणें हें जरा चमत्कारिकच दिसतें. असा ग्रह होण्यास कदाचित् डिमॉक्रीटसचेच उद्गार कारणीभूत झाले असावेत. उलटपक्षीं तेथील लोक आनंदी असावेत असेंही अनुमान होतें. खुद्द डिमॉक्रीटस यालाच "हास्यमुख तत्त्वज्ञ". ( The laughing philosopher ) असें टोपण नांव मिळालें होतें.

डिमॉक्रीटसच्या जन्मकाळ अनिश्चितच आहे. त्यानें आपल्या एका ग्रंथामध्यें असें म्हटलें आहे कीं, तो ग्रंथ ट्रॉय शहर पडल्यावर ७३० वर्षांनीं लिहिला गेला, पण ट्रॉय शहर केव्हां पडलें याचा वादच आहे. व स्वतः डिमॉक्रीटसचें या बाबतींत काय मत होतें तें आपणांस ठाऊक नाहीं. त्यावेळीं दोन चार शक रूढ होते. दुसऱ्या एका ठिकाणीं त्यानें असें लिहिलें आहे कीं, अॅनॅक्झॅगोरॅस वृद्ध असतां तो तरुण होता, परंतु हें विधान फारच सामान्य असल्यामुळें त्यापासून तादृश फायदा होत नाहीं. एकंदरींत त्याचा काळ साधारणतः सॉक्रेटिसच्या काळाशीं मिळता येतो येवढी गोष्ट खरी.

डिमॉक्रीटस हा ल्युसीपसचा शिष्य होता; परंतु त्याची तत्त्वज्ञान-विषयक जिज्ञासा व्यापक असल्यामुळें त्यानें पायथॅगोरिक पंथांतील मतांचा चांगला अभ्यास केला असून त्यानें कित्येक तत्पंथीय लोकांज-वळून शिक्षण घेतल्याचें प्रसिद्ध आहे. याशिवाय पारमिनाइड्स, झेनो, अॅनॅक्झॅगोरॅस इत्यादिकांविषयीं त्याच्या ग्रंथांत जागजागीं उल्लेख आहेत.

डिमॉक्रीटस ईजिप्ट, अथेन्स वगैरे ठिकाणीं प्रवास करून आल्याबद्दलचे त्याच्या ग्रंथांतील उल्लेख मात्र प्रक्षिप्त आहेत, असें विद्वानांचें मत आहे.

डिमॉक्रीटसचा जन्म निराळ्या काळीं झाल्यामुळें त्याच्यापुढें पारमिनाइड्सला काय उत्तर द्यावें हा प्रश्न नसून, प्रोटॅगोरॅस व इतर सोफिस्ट यांनीं उत्पन्न केलेल्या प्रश्नांचें काय उत्तर द्यावें हा होता. परमाणुवादाच्या बाबतींत सर्वस्वी ल्यूसीपसचें व जगताच्या रचनेविषयीं प्रधानतः ॲनॅक्झॅगोरॅसचें मत स्वीकारून त्यानें ज्ञानाच्या शक्याशक्यतेविषयीं किंवा आचारनियमांविषयीं विचार करण्याकडे अधिक लक्ष देणें हें अगदीं साहजिकच आहे.

## डिमॉक्रीटसची ज्ञानमीमांसा

ल्युसीपसचें मत स्वीकारून डिमॉक्रीटसनें संवेदनेची शुद्ध यांत्रिक उपपत्ति लाविली आहे; व या विषयांतील बारीक सारीक तपशील डिमॉक्रीटसनेंच ठरविला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. त्याच्या मतें इतर सर्व वस्तूंप्रमाणेंच आत्माही पण परमाणुमयच असल्यामुळें संवेदना म्हणजे बाहेरच्या परमाणूंचा आत्मपरमाणूंवर होणारा आघात होय; व ज्ञानेंद्रियें हीं केवळ या आघाताचीं द्वारें होत. आपल्या संवेदनेचा विषय म्हणजे वास्तविक स्वरूपांतील बहिर्गत पदार्थ म्हणण्यापेक्षां त्याच्या पदार्थांचें प्रतिबिंब असतें असेंच म्हटलें पाहिजे; आणि म्हणूनच डोळ्यांतील बाहुलीला येवढें महत्त्व आहे. हें प्रतिबिंब अगदीं वस्तुबरहुकुम मात्र नसतें तर मध्यंतरी असणाऱ्या हवेमुळें त्याचें रूप अस्पष्ट होतें. हीच मधील हवा अतिशय झाली—म्हणजे त्या वस्तूचें व आपलें अंतर वाढलें- म्हणजे ती वस्तु अगदीं दिसेनाशीही होते. आपलें चक्षुरिंद्रिय व दृष्टिविषय यांजमध्यें मुळींच हवा नसती तर आपणास आभाळावर रांगणारी मुंगी देखील अगदीं स्पष्ट दिसली असती. वस्तूंचे रंग निरनिराळे दिसण्याचें कारण त्याच्या पृष्ठभागाचा कठीणपणा अगर मऊपणा हेंच आहे

शब्द श्रवणाची उपपत्तीही अशीच आहे. शब्द निनादित वस्तूपासून तत्सदृश आघातांनीं युक्त असा जो परमाणुप्रवाह येतो त्याच्या योगानें आपणास शब्दज्ञान होतें. याप्रमाणें साधारणः इतर संवेदनांचीही उपपत्ति आहे.

परंतु या संवेदना म्हणजेच ज्ञानाची इतिश्री नाहीं. ज्ञान हें द्विविध आहे. एक व्यभिचारि व एक सत्य. इंद्रियजन्य सर्व ज्ञान हें पहिल्या प्रकारचें म्हणजे व्यभिचारि ज्ञान आहे, असें डिमॉक्रीटसचें म्हणणें आहे. व याच ठिकाणीं त्याचा व प्रोटॅगोरॅसचा विरोध आहे. प्रोटॅगोरॅसचें असें म्हणणें कीं, सर्व संवेदना संवेत्त्याच्या (sentient subject) दृष्टीनें सत्यच आहेत, व संवेदनांशिवाय ज्ञानाला दुसरा आधारच नसल्यामुळें सर्व निरनिराळीं संवेदनात्मक ज्ञानें सत्यच आहेत. मध एकाला गोड लागतो म्हणून तो गोड हें जितकें खरें, तितकेंच तो दुसऱ्या कोणाला कडू लागतो म्हणून तो कडू हेंही खरें. आणि म्हणूनच सर्वसामान्य ज्ञान-सिद्धांताची उभारणीच अशक्य आहे. या अडचणींतून डिमॉक्रीटसनें काढलेला मार्ग, हा सॉक्रेटिसच्या मार्गासारखाच आहे. ज्ञान हें द्विविध आहे म्हणून सांगितलें; परंतु खरें पाहिलें असतां संवेदनात्मक ज्ञान हें ज्ञानच नव्हे. कारण त्या ज्ञानामध्यें संवेत्त्याच्या अंतरंगांतील परमाणूशीं जुळणारा परमाणू बाहेरील द्रव्यांत मुळींच नसतो. या ठिकाणीं डिमॉक्रीटसनें आपलें धोरण पारमिनाइड्सच्या मताबरहुकूमच ठेविलें आहे. पारमिनाइड्सनें असें स्पष्टच म्हटलें होतें कीं, रस, वर्ण, शब्द हीं केवळ नांवें मात्र आहेत. ल्युसीपसचेंही मत असेंच असेल, परंतु डिमॉक्रीटसच्या काळापर्यंत हा प्रश्नच फारसा पुढें आला नव्हता. प्रोटॅगोरॅसच्या आक्षेपामुळें त्याला रंग चढला, व म्हणून डिमॉक्रीटसला त्याचें स्पष्ट शब्दांत उत्तर देणें जरूर होतें. डिमॉक्रीटस म्हणतो कीं, केवळ संवयीमुळेंच कडू व गोड, उष्ण व शीत, कृष्ण व गौर, या कल्पना आल्या. मुळांत पाहूं गेलें तर परमाणू व पोकळी याशिवाय कांहीं नाहीं. खरोखर पाहिलें तर ह्या

संवेदना जरी बहिर्गत पदार्थांमुळें उत्पन्न झाल्या असल्या तरीही त्यांज-पासून त्याच बहिर्गत पदार्थांबद्दल देखील त्रिकालाबाधित ज्ञान होत नाहीं. या कारणामुळेंच आपणांस एक वस्तु शरीरादिकांच्या भिन्नभिन्न अवस्थांमुळें निरनिराळी भासते. सत्यज्ञानाचा हा मार्ग नाहीं. कारण सत्य हें फार खोल असतें. सारांश संवेदनात्मक ज्ञान हें सत्यज्ञान नव्हे. सत्यज्ञान म्हणजे इंद्रियांच्या साह्यावांचून आत्म्याला होणारें ज्ञान होय.

या सत्यज्ञानाचें स्वरूप काय, व त्याच्या प्राप्तीची तऱ्हा कोणती, हें पाहिलें म्हणजे मात्र डिमॉक्रीटसचें ज्ञान अद्यापही किती अपरिपक्व आहे हें लक्षांत येतें. डिमॉक्रीटसच्या मतें आत्म्याचें परमाणू एकाच ठिकाणीं जखडले गेलेले नसून सर्वतः संचारी आहेत; व म्हणूनच त्यांचा व बहिर्गत परमाणूंचा संयोग घडून येऊं शकतो. परंतु ही सत्यज्ञानाची मीमांसा अगदीं यांत्रिक पद्धतीचीच असून, तिच्या योगानें सत्य व व्यभिचारि ज्ञानामध्यें फारसें अंतर राहत नाहीं. सॉक्रेटिसनें ज्याप्रमाणें इंद्रियव्यापार ( sense ) व मनो-व्यापार ( thought ) यांचें स्पष्ट निसदृशत्व दाखविलें, तसें डिमॉक्रीटस मानीत नाहीं. आणि म्हणूनच तो आपल्या इंद्रियांनां असें म्हणावयास लावतो कीं, " गरीब बिचाऱ्या मना, आम्हाला झुगारून देण्याची तुला शक्ति प्राप्त झाली, ती तरी आमच्यामुळेंच. "

## डेमॉक्रीटसची आचारमीमांसा

डिमॉक्रीटसची आचारमीमांसा त्याच्या ज्ञानमीमांसेपेक्षांही अधिक मनोरंजक झाली असती; परंतु तीही आपणांस अगदीं पूर्णपणें ज्ञात नाहीं. तथापि " आनंदीपणा " या विषयावरचा त्याचा लेख प्रसिद्ध असून सेनेका व प्लुटार्क यांनीं त्याचा पुष्कळ उपयोग केला असल्यामुळें त्याचे बरेच अवशेष राहिले आहेत.

सुख हें अनुकूल व प्रतिकूल संवेदनांवर अवलंबून आहे, हें या लेखांतील प्रथम तत्त्व आहे; व त्याचा मतलब असा कीं, मनुष्याला जें सुख मिळतें त्याचें कारण बाह्य पदार्थ नव्हत. “ सुख हें गुराच्या कळपांत नाहीं किंवा सोन्यामध्येंही नाहीं. आत्मा हेंच सुखाचें स्थान आहे.” मनुष्याचें ध्येय म्हणजे शक्य तितकें अधिक सुख मिळविणें व शक्य तितके परिश्रम टाळणें हें आहे खरें; परंतु त्यावरून इंद्रियलोलुपता हीच कांहीं सुखाची सामुग्री होत नाहीं. ज्याप्रमाणें संवेदना सत्यज्ञान नाहीं, त्याप्रमाणेंच इंद्रियजन्य सुख हें खरें सुख नव्हे. एकतर तें फार अल्पकाळ टिकणारें असतें, व दुसरें, त्याचें पुष्कळदां दुःखांत परिवर्तन होतें. मनुष्यानें नश्वर गोष्टींवर आपलें सुख अवलंबून ठेविलें नाहीं तरच त्याला त्याची प्राप्ति होईल. आपल्याला जर खऱ्या सुखाची इच्छा असेल तर निरनिराळ्या सुखांची योग्य किंमत आपणांस करतां आली पाहिजे. उच्चतर सुखाची कल्पना नसल्यामुळेंच मनुष्य फसतो, व मग उगाच आपल्या दैवाच्या नांवानें खडे फोडीत बसतो. सुखाची निवड करतांना आपण संवाद अथवा समता हीं तत्त्वें लक्षांत धरावीं. ( हीं तत्त्वें मूळचीं पायथॅगोरिक आहेत ) म्हणजे आपणास शरीरस्वास्थ म्हणजे आरोग्य, व आत्मस्वास्थ्य म्हणजे सुख, याची प्राप्ति होईल. जो मनुष्य आत्मवस्तूकडे धांवतो, तो दैवी सुखाला पात्र होतो. केवळ नश्वर शरीराला चिकटून राहाणारा प्राणी मानवी सुखाच्याच जाळ्यांत सांपडतो.

सृष्टीच्या रचनेविषयीं डिमॉक्रीटसनें जे विचार दर्शविले आहेत, त्यावरून त्याच्या मनाचा कल सृष्टीच्या उपपत्तीकडेच अधिक होता; व या कारणाकरिता त्याचा याच प्रकरणांत विचार करणें योग्य असें वाटतें. या बाबतींत त्याचीं मतें अगदीं मागसलेलीं होतीं. पृथ्वी ही त्याच्या दृष्टीनें ताटलीसारखीच होती; व ॲनॅक्झॅगोरसच्या मताप्रमाणेंच त्याचेंहीं मत असेंच होतें कीं, ती एकाद्या भांड्याच्या झांकणाप्रमाणें हवेंत तरंगत आहे.

इलियाटिक पंथांतील लेखकांप्रमाणेंच वस्तूच्या असंविभक्तपणा-विषयींही त्यानें एका ठिकाणीं विचार केला आहे. तो म्हणतो कीं, आपण एक प्रकारच्या घन पदार्थांचा कोनाचा बैठकीशीं समांतर अशा रेषेंत तुकडा पाडला, तर वरच्या तुकड्याची बैठक व खालच्या तुकड्याचें शिखर सारखें होईल का लहानमोठें होईल ? सारखें म्हणावें तर एकावरील एक वर्तूळाचा आकार सारखा झाल्यामुळें तो घन पदार्थ सिलेंडर होऊं लागेल, बरें लहान मोठें म्हणावें तर त्या कोनाचा भाग खडबडीत आहे असें म्हणण्याची पाळी येईल.

डिमॉक्रीटसच्या काळामुळें त्याची ही इतर विषयांवरील प्रवृत्ती फारशी प्रकट झाली नाहीं हें खरें; तथापि जीं कांहीं थोडी स्थळें आपणांस सांपडतात त्यावरून त्याचा मूळ ओढा चांगला प्रत्ययास येतो; परंतु आपणांस आतां या सृष्टीविषयक भानगडींतून जरा दुसरी-कडेच वळावयाचें आहे. प्रस्तुत मालेच्या द्वितीय पुष्पामध्यें ज्ञानमीमांसा व आचारमीमांसा हेच विषय प्रामुख्यानें यावयाचे आहेत. डिमॉक्रीटस हा साक्रेटिसच्या मागूनचा खरा, पण ल्युसीपसच्या संबंधामुळें त्याला एका तऱ्हेनें ग्रीक आद्यतत्वज्ञ व साक्रेटिस, या दोन दुव्यांनां जुळविण्याचा मान मिळाला आहे.



# साक्रेटिस

## प्रकरण १ लें

### सॉक्रेटिसचा जीवनवृत्तांत.

एकंदर तत्त्वज्ञानाच्या व विशेषतः पाश्चात्यतत्त्वज्ञानाच्या इतिहासांत ज्यांचें व्यक्तिविषयक चरित्र विशेष परिणामकारक वाटतें, अशा सॉक्रेटिससारख्या विभूति फार थोड्या. साधारणतः कोठचेंही तत्त्वज्ञान म्हटलें म्हणजे त्याचा प्रचारक अथवा द्रष्टा हा महत्वाचा असतोच, व तत्त्वज्ञानाचा विचार करीत असतां आपणास त्याच्यासंबंधीही माहिती मिळवावी लागते. परंतु येवढें खरें कीं, त्याचें तत्त्वज्ञान हेंच त्यांच्या चरित्राहून अधिक महत्वाचें असतें. आपल्या देशांतील कांहीं उदाहरणें द्यावयाचीं झाल्यास उपनिषत्कालीन याज्ञवल्क्यांच्या चरित्रापेक्षां त्यांच्या तत्त्वज्ञानाचें अधिक महत्व आहे. महाभारतकार व्यास यांच्या जीवनांतील सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे महाभारतरूपानें प्रसृत होणारी त्यांची ज्ञाननदीच. ज्ञानेश्वराच्या खासगी गोष्टींपेक्षां त्यांची ज्ञानेश्वरीच अधिक लक्षांत येते. याच्या उलट भगवान् श्रीकृष्ण, बुद्ध, विद्यारण्य, तुकाराम, इत्यादिकांचा जीवनक्रम हा त्यांच्या विशिष्ट मतांइतकाच मनोरंजक असतो. त्यांचें तत्त्वज्ञान व त्यांचें जीवन यांचा इतका बेमालूम मिलाफ

झालेला असतो कीं, एकाशिवाय दुसऱ्याचें महत्वच लक्षांत येत नाहीं. पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासांतही जर्मनी देशांतील कँटसारख्या तत्त्ववेत्त्याचें जीवन म्हणजे त्यांचें तत्त्वज्ञानच होय. सृष्टीच्या नियमित व्यापाराइतकेंच नियमबद्ध व सहजतेनें चालणारें त्यांचें जीवन कित्येक बाबतींत आदर्शभूत झालें तरी तितकें मनोवेधक होत नाहीं; पण उलटक्षीं डेकार्ट, न्यूमन, सॉक्रेटिस यांचीं चरित्रें मोठीं मनोरंजक व सूचक असतात. प्रत्येक मत हें एका विशिष्ट व्यक्तीकडून विशेष प्रसृत झाल्यामुळें त्या त्या व्यक्तींतील विशेष गुणावगुण व सुखदु:खप्रसंग हीं लक्षांत घेतलीं असतां आपणांस तें मत अधिक चांगलें समजेल ही गोष्ट खरी; परंतु वर सांगितलेल्या पहिल्या प्रकारच्या तत्त्ववेत्त्यांच्या बाबतींत त्यांचें मत व त्यांचें चरित्र, हीं वृक्ष व त्याचें फळ याप्रमाणें असतात. ज्याप्रमाणें झाडाचें फळ त्याच्या शाखासमूहापासून भिन्न असतें, त्याप्रमाणेंच त्यांचें तत्त्वज्ञान त्यांच्या चरित्रापासून भिन्न करतां येतें. परंतु दुसऱ्या प्रकारच्या तत्त्ववेत्त्यांचें मत म्हणजे सोमरसाप्रमाणें असतें. रस काढून घेतल्यावर राहिलेला भाग दूर फेंकून दिला तरी रसाची चव म्हणजे पानांचीच चव होय. आम्रवृक्षाची चव आम्रफळांत नाहीं, पण सोमवल्लीची सर्व चव सोमरसांत येते. कांहीं तत्त्ववेत्त्यांचें मत याप्रमाणेंच त्यांच्या चरित्रांतून जणूं काय पिळून काढल्यासारखें असतें; आणि सॉक्रेटिसच्या बाबतींत तर हें विशेषच अनुभवास येतें. याचें विशेष कारण असें कीं, निरनिराळ्या लोकांना सारखींच पटतील अशीं मतें प्रसृत करणें येवढाच त्यांच्या जीवनवृत्तांतील निष्कर्ष नसून, विचार व आचार यांनां विशिष्ट वळण लावून, शील व विषयविवेचन यांची विशिष्ट पद्धति स्थापन करणें, हा त्यांतील अधिक महत्वाचा भाग आहे. आणि ही बाब गुरुशिष्यपरंपरेनें अविकृत राहत नसून प्रत्येक ठिकाणीं निरनिराळ्या तऱ्हेनें दृष्टिगोचर होणारी आहे. या कारणाकरितांच इतिहासांतील अशा विभूतींच्या पूर्वचरित्राविषयीं आपली एवढी मोठी जिज्ञासा असते. त्यांच्या

बुद्धीची वाढ कशी झाली व सर्व जगावर आपली छाप बसविण्याइतकी परिणतावस्था तिला केव्हां प्राप्त झाली, हें कळण्याची आपणास अनिवार इच्छा असते. ही इच्छा तृप्त करण्यास लागणारीं साधनें मात्र नेहमींच उपलब्ध असत नाहीत ही दुर्दैवाची गोष्ट आहे. मोठेपणीं सॉक्रेटिसचा जीवनक्रम कसा होता व त्याचीं मतें कशीं होतीं, याची आपणास अगदीं तपशीलवार माहिती मिळते; परंतु त्याच्या चरित्राच्या पूर्वार्धाची माहिती तितकी तपशीलवार सांपडत नाहीं. कांहीं प्राचीन लेखकांच्या अर्धवट व केव्हां केव्हां अश्रद्धेय भासणाऱ्या विधानांशिवाय त्याला विशेषसा आधारही नसतो.

सॉक्रेटिसचा जन्म अथेन्समध्यें इ. स. पूर्वी ४६९ व्या वर्षीं झाला, व त्याच संस्थानांतील न्यायाधिशींत त्याजवर फिर्याद होऊन त्याला इ. स. पूर्वी ३९९ व्या वर्षी विषप्राशनाची शिक्षा झाली. हीं सत्तर वर्षें म्हणजे ग्रीसच्या इतिहासांतील अत्यंत मनोरम भाग होय. पूर्वेकडील इराणी सत्तेच्या अमर्याद सामर्थ्यापुढें हार न खातां, स्वाभिमानानें, एकजुटीनें, मर्दुमकीनें, मॅरॅथॉन, थर्मापुली, प्लॅटिआ, सॅलॅमिस या ठिकाणीं शत्रूचा धुव्वा उडवून ग्रीक संस्थानांचें नांव उज्वल होऊं लागल्यापासून पेरिक्लिसच्या काळांतील अप्रतीम राजकारणकुशलता निर्माण होईपर्यंतचा हा काळ मोठा महत्वाचा आहे; व या कालांतच सॉक्रेटिसचा जन्म झाल्यामुळें त्याला ग्रीकसंस्कृतीच्या ऐन अमदानींतील सर्व संस्कार-विशेषांचा फायदा मिळाला होता. त्याचा बाप सोफ्रोनिस्कस हा मूर्तिकार होता, व सॉक्रेटिसनें आरंभीं आरंभीं हाच धंदा चालू ठेविला होता; आणि अथेन्सच्या गोपुरांवर "ग्रेसीस" या नांवाच्या देवतांच्या वस्त्र-विभूषित मूर्ति सॉक्रेटिसनेंच तयार केल्या असल्याचें सांगतात. परंतु ही माहिती कितपत विश्वसनीय मानावी हा एक प्रश्न आहे. साक्रेटिसची टवाळी करण्याकरितां ॲरिस्टोफेनस यानें रचलेल्या नाट-कांत, व सॉक्रेटिसचे शिष्य झेनोफन व प्लेटो यांनीं दिलेल्या हकीगतींत

या कलेचा मुळींच उल्लेख नाहीं. यावरून असें अनुमान होतें कीं, सॉक्रेटिसनें मूर्तिकाराचा धंदा कधींच केला नसावा, किंवा केलाच असल्यास ॲरिस्टोफेनसचें नाटक रंगभूमिवर येण्यापूर्वीच बंद केला असावा. सॉक्रेटिसच्या आईचें नांव फेनारिटे ( Phaenarete ) असें असून ती सुइणीचा धंदा करीत असे. अशा रीतीनें गरीबीच्या परिस्थितींत जन्म झाला असतांहि सॉक्रेटिसला ग्रीक संस्कृतींतील उत्कृष्ट विद्या प्राप्त करून घेतां आली. त्यावेळीं अथेन्स शहरांत उच्चनीच भाव फारसा जोरांत नसल्यामुळें अगदीं गरीब मनुष्याला देखील मोठ्यांच्या सहवासानें व त्या संस्थानांत भरभराटीस आलेल्या कलांच्या अवलोकनानें पुष्कळ ज्ञान मिळवितां येई.* यावरून सॉक्रेटिसचें शिक्षण सर्वांगसुंदर झालें असावें असें आपणांस अनुमान करतां येतें; परंतु त्याबद्दलची विश्वसनीय हकीगत फारच थोडी उपलब्ध आहे.

ग्रीक रिवाजाप्रमाणें प्रथमतः शारीरिक कसरत व संगित यांचें ज्ञान करून घेतल्यावर सॉक्रेटिसानें इतर शास्त्रांचें थोडें बहुत अवलोकन केलें. भूमितीचे कठीण प्रश्न सोडविण्यांत तो प्रवीण झाला होता, व खगोलविज्ञानाचा त्याला परिचय होता. ही साधारणतः मध्यम वयाची हकीगत झाली. मोठेपणीं त्याची व पुष्कळ प्रसिद्ध पुरुषांची गांठ पडल्यामुळें त्याचा तत्त्वज्ञानाकडे विशेष ओढा लागला असावा. उदाहरणार्थ त्यावेळच्या सोफिस्टांमधील अथवा पंडितांमधील प्रख्यात पंडित प्रोटॅगोरॅस, जॉर्जिअस्, व विशेषतः प्रॉडीकस यांच्याशी त्याचा बराच निकट संबंध होता.

* सॉक्रेटिसच्या काळीं सोफिस्टस नांवाचे लोक असत. त्यांनीं प्रथम पद्धतशीर शिक्षणक्रमाचा पाया घातला, परंतु या शिक्षणक्रमापेक्षां सॉक्रेटिस सारख्या तीव्र बुद्धिच्या पुरुषाला केवळ अवलोकनानें प्राप्त होणारें ज्ञानच अधिक होतें. फार काय पण त्या वेळच्या सुधारणेच्या ओघांत एखादा मनुष्य अगदीं वाहून जाणें शक्य होतें. सुधारणेचीं साधनें त्यावेळीं इतकी सुखसाध्य असत.

त्यांचें नातें अगदीं तंतोतंत गुरुशिष्यांचेंच नसलें तरी खुद्द सॉक्रेटिसच कित्येकवेळां त्यांचा गुरुस्थानीं असल्याप्रमाणें उल्लेख करतो. यावरून त्यांच्या संभाषणादिकांचा सॉक्रेटिसवर बराच परिणाम झाला असावा. सॉक्रेटिस व हे विख्यात पंडित यांच्यांमध्यें जें कांहींसें साम्य दिसतें, व सॉक्रेटिस हा एक सोफिस्टच होता असा जो समज प्रचलित झालेला आढळतो, त्यावरून या अनुमानाला अधिक बळकटी येते. पारमिनाइड्सचा आभासवाद, हिरॅक्लीटसचा अग्निकारणवाद, परमाणु-कारणवाद्यांचीं मतें, ॲनॅक्झॅगोरॅसचा भौतिकवाद व बहुतत्त्ववाद, याविषयीं सॉक्रेटिसला माहिती होती असें अनुमान निघतें. झेनो व पारमिनाइडस् यांच्याशीं त्याचा प्रत्यक्ष परिचय होता किंवा नाहीं, ही गोष्ट संशयास्पदच आहे; व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथभांडार त्याच्या वाचण्यांत कितपत आलें असेल याविषयीं कांहींच सांगता येत नाहीं. तथापि त्याच्या संभाषणामधून येणाऱ्या कित्येक उल्लेखांवरून तो एकंदरींत बहुश्रुत होता येवढी एक गोष्ट मात्र निःसंशय सिद्ध होते.

सॉक्रेटिसनें आरंभीं आरंभीं आपल्या बापाच्याच धंद्यास सुरवात केली असेल, परंतु लवकरच त्याचा कल नीति व तत्त्वज्ञान या विषयांकडे वळला व आपला परंपरागत धंदा न पत्करतां, मनुष्याच्या अत्यंत हिताचे उपरि-निर्दिष्ट विषय यांजविषयीं विचार करून ते विषय समाजास शिकविणें हें आपलें कर्तव्य आहे, असें त्यास वाटूं लागलें. सॉक्रेटिस हा नेहमीं एका ' डेमन ' विषयीं उल्लेख करीत असे. हा डेमन म्हणजे कोण व त्याचें स्वरूप काय, याची चर्चा पुढें करण्यांत येईलच. सध्यां येवढेंच सांगावयाचें कीं, सॉक्रेटिसाचे मनांत एखादी गोष्ट करावयाची असून ती परिणामीं हितकारक नसेल तर ती न करण्याविषयीं आपणांस एक कर्णपिशाच्च किंवा आंतरिकवाणी सुचविते, असें सॉक्रेटिसास वाटे, व या अंतर्वर्ती शब्दांस तो डेमन म्हणत असे. सॉक्रेटिसानें केवळ आपल्या बापाचाच धंदा करीत रहावें, हें या डेमनला पसंत न पडून

त्यानें तशी सूचना केली असेल, व सॉक्रेटिसाचें एकंदर आयुष्य लवकरच निराळ्या वळणाला लागलें असेल. कारण या डेमनचा प्रत्यय त्याला फार लहानपणींच आला होता, असें त्यानेंच आपल्या भाषणांत म्हटलें आहे. आपला व्यक्तिविषयक धंदा सोडून सर्व जगताला नीतिज्ञान शिकवावयाचें तर मनुष्याची तशीच तयारी हवी. म्हणून सॉक्रेटिसनें अपरंपार मेहनत घेतली असावी. त्याचा स्वभाव मोठेपणीं फारच शांत होता, परंतु तो मूळचा फार तापट असून केवळ विचाराच्या जोरावर त्यानें त्यांत क्रांती घडवून आणली असें म्हणतात. ही एकच गोष्ट त्याच्या निःसीम दृढनिश्चयाची साक्ष देत आहे. लोकांस नीतिज्ञान शिकविण्याचें व्रत ज्याला पत्करावयाचें असेल, त्याला आधीं स्वतःचे मनोविकार आकलन करतां आले पाहिजेत; व ते स्वतःला साधल्याशिवाय लोकांना नितिबोध शिकविण्याचा आव घालणें उपहास्यास्पद आहे, अशी खात्री झाल्यामुळेंच सॉक्रेटिसनें प्रथमतः आपल्या मनोविकारांवर विजय मिळविला. आपला हा विजय कितपत साधला हें पाहण्यास त्याला दैवयोगानें घरींच एक साधन होतें. त्याची बायको झँटिपी ही मोठी खाष्ट बायको होती. ती त्याला नाना प्रकारच्या शिव्या देई. फार काय पण ती त्याजवर अतिशय रागावली तर भर रस्त्यांत त्याचे कपडे फाडण्यापर्यंत तिची मजल जात असे. एकदां तर सॉक्रेटिसावर शिव्यांचा नुसता भडिमार करूनही समाधान न झाल्यामुळें तिनें घाणेरड्या पाण्यानें भरलेली घागर आणून सॉक्रेटिसाच्या डोक्यावर ओतली. परंतु या प्रसंगानेंही आपली स्वस्थता ढळूं न देतां सॉक्रेटिस नुसता हंसत हंसत म्हणाला, " येवढी प्रचंड मेघगर्जना झाल्यावर थोडीफार तरी वृष्टी व्हावयाचीच " आपल्या देशांतील संतवर्य तुकाराम महाराज व सॉक्रेटिस यांचें या बाबतींत फार साम्य आहे. झँटिपीचा स्वभाव जिजाईसारखाच तापट, परंतु अंतःकरणांत प्रेमळ असे; व आपल्या नवऱ्याला वागविण्याचा प्रकारही दोघींचा एकच.

तुकाराम महाराज आपली शांतवृत्ति चळूं न देतां आपल्या बायकोशीं कसे वागत असत हें सांगण्याचें प्रकृत स्थळ नव्हे. त्याबद्दलच्या पुष्कळ गोष्टी त्यांच्या चरित्रांतून सांपडतील. सॉक्रेटिसाविषयीं लिहीत असतां आपल्या देशांतील सत्पुरुषाविषयीं स्मरण झाल्यावर त्याजविषयीं एक दोन शब्द लिहिल्यावाचून राहवेना म्हणून त्याचा उल्लेख केला. असो. अशारीतीनें सॉक्रेटिसला आपल्या शांतवृत्तीची कसोटी लाऊन घेण्याचे प्रसंग घरच्याघरीच वारंवार येत असत, व तो त्यांचा फायदा करून घेत असे. येवढेंच नव्हे, तर आपणास असा फायदा मिळावा म्हणून आपण होऊनच त्यानें अशी खाष्ट बायको केली, असें सॉक्रेटिसनें स्वतःच सांगितलें आहे. झेनोफेनच्या बँक्वेट किंवा भोजनसमारंभ या प्रकरणांत सॉक्रेटिसाच्या बायकोविषयीं बोलणें निघालें असतां तो म्हणतो कीं, “ अश्वारोहणांत प्राविण्य मिळविणारे नेहमीं दांडग्या घोड्यांवर बसण्याचा अभ्यास ठेवतात, कारण जर त्यांनां त्या मस्तवान घोड्यांनां ताब्यांत ठेवतां आलें, तर इतर घोड्यांनां सहजच ताब्यांत ठेवितां येईल. याच कारणाकरितां सर्व मानवजातीशीं संबंध ठेवण्याची इच्छा असल्यामुळें मी मुद्दामच अशी बायको केली. कारण माझी अशी खात्री होती कीं, जर मी तिच्याशीं वागण्यांत शांतवृत्ति ठेविली तर मला इतर कोणाबरोबरही शांतवृत्तीनें वागतां येईल. ” यावरून लोकांनां नीतिज्ञान सांगण्यापूर्वी स्वतःची तयारी सॉक्रेटिसनें किती केली होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मनुष्याचा स्वभाव मूळचाच शांत असला तरी त्यास मोठें कौतुक वाटतें, मग तो स्वभाव केवळ दृढनिश्चयानें, पूर्वस्थितीच्या प्रतिकूलतेला न जुमानतां सिद्ध करून घेतला असेल तर काय विचारावें !

याप्रमाणें सॉक्रेटिस हा पूर्ववयापासूनच शांतवृत्तीचा व तत्त्वज्ञानप्रवण होता. त्याच्या ह्याच वृत्तींनां अधिक चालन मिळून त्याच्या आयुष्याची दिशा कायम ठरण्यास एक प्रासंगिक गोष्ट कारण झाली. या गोष्टीचा उल्लेख त्यानें आपल्या आत्मसमर्थनपर भाषणांत केला

आहे, तो पुढें येईल. कैरिफन् ( Chaerephon ) नांवाचा एक सॉक्रेटिसचा मित्र होता. तो कांहीं कामानिमित्त डेल्फीला गेला होता. डेल्फी येथें अपोलो किंवा सूर्यदेव यांचें एक भव्य मंदीर होतें. कोठल्याही गोष्टीचा संशय पडला तर, या देवळांतील पुजारी किंवा पुजारिणी यांच्या अंगांत देवाचा संचार झाला असतां त्या संशयाचें निरसन करण्याकरितां त्यांनां प्रश्न करण्यांत येत असत, व त्याला त्यांजकडून मिळालेलें उत्तर प्रत्यक्ष देवानेंच दिलें असें मानण्यांत येत असे, व त्याची सत्यता सर्वमान्य असे. आपल्या इकडेहि कोणाच्या अंगांत आलें असतां त्यास प्रश्न विचारण्याची वहिवाट आहेच, तेव्हां या गोष्टींत आपणांस चमत्कारिक असें कांहींच वाटणार नाहीं. असो, कैरिफन् यानें असा प्रश्न केला कीं, " सॉक्रेटिसपेक्षां अधिक शहाणा कोणी आहे काय ? " या प्रश्नावरूनच हें सिद्ध होतें कीं, सॉक्रेटिसची बुद्धिमत्ता ही कैरिफन्च्या दृष्टीनें अतिशय उच्च दर्जाची होती. पण ती अप्रतीम आहे किंवा नाहीं हाच त्याला संशय होता. यावरून डेल्फीच्या देवाला हा प्रश्न विचारण्यापूर्वी सॉक्रेटिस हा नीतिशास्त्रज्ञ म्हणून निदान त्याच्या मित्रांनां तरी ठाऊक असला पाहिजे. असो, हा प्रश्न विचारल्यावर त्याला उत्तर नकारात्मकच आलें. हें उत्तर ऐकून कैरिफनला आश्चर्य वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें, व सॉक्रेटिसला तरी तें अगदींच आश्चर्यकारक वाटलें असेल असें वाटत नाहीं. परंतु तें उत्तर ऐकून तो थोडासा बुचकळ्यांत पडला, असें त्याच्याच भाषणांत आलें आहे खरें.

सॉक्रेटिस हें उत्तर ऐकून खरोखरच बुचकळ्यांत पडला असो, किंवा त्याच्या उत्तर–कालीन अज्ञानदर्शनाप्रमाणें वरील उक्ती ही एक त्याच्या भाषणांतील लकब असो, पण एक गोष्ट निःसंशय आहे कीं, त्याच्या आयुष्यक्रमाला एकरूप आणि निश्चित वळण देण्यास ही नूतन प्रतीति कारण झाली. आपली व आपल्या कुटुंबाची उदरपूर्ति

केली म्हणजे आपलें कर्तव्य संपलें, असें न मानतां अखिल मानव-जातीला व विशेषतः आपल्या देशबांधवांनां सदुपदेश करणें व तो उपदेश करण्यास आपणास अधिकार यावा म्हणून आपलें वर्तन शुद्ध ठेवणें, हें आपलें कर्तव्य आहे, ही त्याची समजूत पूर्वीं पासूनच झाली होती; परंतु आतां तर प्रत्यक्ष देवाच्याच शब्दानें तो सर्व मानवजातींत शहाणा ठरल्यामुळें तेंच त्याचें कर्तव्य हें निश्चित ठरलें. कारण असे श्रेष्ठ पुरुष जर मानवजातीला सदुपदेश करण्याचें व्रत पत्करणार नाहींत, तर मग जगताच्या सुधारणेचा मुख्य आधारस्तंभच नाहींसा झाला म्हणावयाचा. शिवाय आपल्या गुरुत्वाच्या पात्रापात्रते-बद्दल सॉक्रेटिसास कांहीं संशय असल्यास तोही नष्ट झाल्यामुळें तर सॉक्रेटिसास विशेषच स्फुरण चढलें. त्यानें लोकांनां सदुपदेश देण्याचें व्रत कायमचें पत्करलें, आणि हें व्रत उत्तम रीतीनें पार पडावें म्हणून इतर सर्व व्यासंगांनां रजा देण्याचा सॉक्रेटिसानें निश्चय केला. तो आधींच गरीब होता, तशांतच लोककल्याणासाठीं सर्व उद्योगधंदादेखील सोडा-वयाचा त्याचा विचार होता, मग अशा स्थितींत चालू संसार कसा हाकावयाचा ? त्याची वडिलोपार्जित मालमिळकत फार थोडी होती, व त्याच्या श्रीमंत मित्रांकडून—त्यानें एका शब्दानेंही विनंति न करतां केवळ यदृच्छेनें मिळालेल्या भेटींपासून—होणारी मदत अनिश्चित व अपुरी होती. परंतु केवळ दारिद्र्याला भिऊन परमेश्वरानें आपल्यावर सोंपलेलें कार्य टाकून द्यावयाचें नाहीं, हा विचारच सॉक्रेटिसच्या मनांत अहर्निश जागृत होता. काय वाटेल तो प्रसंग येवो, परमेश्वराच्या स्फूर्तीनें प्राप्त झालेलें कर्तव्य बजावण्याकरितां तो सोसलाच पाहिजे, असा सॉक्रे-टिसानें दृढ निश्चय केला, व त्या दृष्टीनेंच आपला आयुष्यक्रम आख-ण्याची त्यानें तयारी केली. त्याची संपत्ति अत्यंत मर्यादित होती, व उच्चतम कर्तव्य टाकल्याशिवाय जर ती वाढणें शक्य नव्हतें, तर ती संपत्ति वाढविण्याचा प्रयत्नच करावयाचा नाहीं, व आहे तेवढी संपत्तीच

जर वाढत्या गरजा भागविण्यास पुरेशी नसेल तर, गरजा वाढूं देण्याचें तर दूरच राहो, परंतु त्या कमी करतां करतां अगदीं संपुष्टांत आणावयाच्या असा त्यानें दृढ निश्चय केला. ज्याप्रमाणें देव हे गरजांच्या तडाक्यांत सांपडत नाहींत, त्याप्रमाणेंच आपणही गरजांवर विजय मिळविण्याची तयारी केली पाहिजे. सॉक्रेटिस नुसता निश्चयच करून राहिला नाहीं, तर त्यानें लगेच तो अमलांत आणण्यास सुरवात केली. सर्व ऋतूंत व सर्व प्रसंगीं त्यानें एकच व अगदीं साधा पोषाख वापरण्याचें ठरविलें, त्यानें अनवाणीच चालण्याचा क्रम ठेविला आणि त्यानें हा नियम सर्व ऋतूंत कडकपणें पाळला. फार काय, पण अथेन्सचा नागरिक या नात्यानें पॉटीडियाच्या मोहिमेवर तो गेला असतांना थ्रेसमधील कडक थंडीच्या दिवसांत जिकडे तिकडे दंव पडलेलें असतांहि त्यानें आपला क्रम मुळींच बदलला नाहीं. याप्रमाणेंच त्यानें मिताहाराचा व साधेपणाचा नियम पत्करला. चांगली खडखडीत भूक लागली असतां साधें अन्नच गोड लागतें, व एकदां थोडेसें खाल्ल्यावर व क्षुधेचें पूर्णपणें निवारण झाल्यावर, उगाच पक्वान्न म्हणून, अगर रुचकर म्हणून अधिक अन्न खाणें अगदीं अप्रशस्त आहे, असें त्यानें ठरविलें. ज्या मनुष्याला तत्त्वज्ञानाचा अभ्यास करावयाचा आहे, त्यानें अशारीतीनें शक्य तितक्या आपल्या गरजा कमी कराव्या हें तर उघडच आहे. परंतु सॉक्रेटिसाचें असें म्हणणें असें कीं, साधेपणा व नियमितपणा, हा प्रत्येक अवस्थेंतील पुरुषाला उपयुक्तच आहे. विशेषतः अथेन्ससारख्या संस्थानांतील नागरिकांना तर तो अत्यंत आवश्यक होता, असें त्याचें म्हणणें असें. कारण, कोणता नागरिक देशाच्या अधिक उपयोगीं पडेल, व युद्धप्रसंगीं अगर शांततेच्या काळीं अधिक काम करूं शकेल, असा प्रश्न केला असतां आपणास सहजच दिसून येईल कीं, ज्यांनीं आपल्या गरजा नियमित केल्या आहेत तोच आपल्या देशाची अधिक चांगली सेवा बजाऊ शकतो. ज्या शिपायाला प्रत्यक्ष रणांगणावर देखील

ऐषआराम सोडवत नाहींत, व आपल्या जाम्यानिम्यांत यत्किंचितही न्यूनता राहिली तर ज्याला आपला एक अवयवच तुटला असें वाटतें, फार काय पण आपले नित्य आवडीचे पदार्थ असल्याशिवाय ज्याला अन्न रुचत नाहीं, तो मनुष्य काय मर्दुमकी बजावील? ज्या वेळेस जो प्रसंग येईल तो काढण्यांत पटाईत असलेलाच मनुष्य रणशूर होण्यास योग्य. आपल्या इकडे मोंगल व मराठे यांच्या इतिहासाकडे पाहिलें तर हेंच आढळून येतें. बरें शांततेच्या काळीं देखील अशा नियमितपणाची जरूरच असते. शांततेच्या काळीं देखील ज्याला आपल्या शरीरिकसुखांत यत्किंचित न्यून पडलेलें सहन होत नाहीं, तो काय महत्वाची कामगिरी बजावील? गहन शास्त्रांचा अभ्यास करावयाचा असेल, महत्वाचे शोध लावावयाचे असतील, राज्यकारभारांत प्राविण्य संपादून लोकांच्या उपयोगीं पडावयाचें असेल, तर शरीरिक सर्व आळस झाडून सुखाविषयीं विशेषतः शरीरिक सुखाविषयीं बेफिकीर राहिल्याशिवाय साधेल काय? तेव्हां सॉक्रेटिसाचें म्हणणें येवढेंच कीं, जर मनुष्याला एक उपयुक्त नागरिक व्हावयाचें असेल तर साधेपणा व नियमितपणा हा अवश्य पाहिजे. मग ज्यानें लोकांस शहाणें करण्याचें व्रत पत्करलें त्याजविषयीं तर बोलावयासच नको. सॉक्रेटिसचा या साधेपणाबद्दल कित्येक वेळां उपहासही होत असे. अरिस्टोफेनस याच्या टारगट नाटकांत सॉक्रेटिसची निंदा करतांना त्याची साधी रहाणी, साधेंच जेवण, घाणेरडें व अपुरें वस्त्रप्रावरण, अनवाणीपणा, आणि तोंडावरील कळाहीनपणा, यांनीं तो अगदीं भिकारडा दिसे असें म्हटलें आहे. परंतु हा सर्व उपहास सॉक्रेटिस मोठ्या शांतवृत्तीनें सहन करीत असे. आपला स्वतःचा उपहास सहन करण्याची सॉक्रेटिसची अगदीं पक्की तयारीच झाली होती. सॉक्रेटिस अत्यंत प्रसिद्धीस आल्यावर अरिस्टॉफेनसनें त्याची चेष्टा करण्याकरितां हें नाटक

केलें होतें. त्याच्या प्रयोगाचे प्रसंगीं तो स्वतः एकदां हजर होता, व शेवटपर्यंत अगदी शांतवृत्तीनें बसला होता म्हणून सांगतात. सारांश, लोकलज्जेचें भय सोडून सॉक्रेटिस नेहमीं साधेपणानेंच राहत असे.

या ठिकाणीं असें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हा सॉक्रेटिसचा साधेपणा व सिनिक्स (Cynics) या नांवानें पुढें प्रसिद्धीस आलेल्या लोकांची लोकविरुद्ध रहाणी, यांत फार अंतर आहे. सॉक्रेटिसच्या दृष्टीनें नीति अगर तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासाला अगर शिक्षणाला साधेपणा हा विशेष अनुकूल आहे; परंतु सिनिक्स हे सर्वसुखाचें साधन हाच साधेपणा आहे असें समजत. या समजुतीमधील फरक दाखविण्यास त्यांच्या आयुष्यक्रमांतील फरकही पुरेसा होतो. आयुष्याचा साधेपणा किंवा निष्परिग्रहता याजवरच सर्वसुखकारणाचा आरोप करून Cynics नीं आपल्या शरीराचे हाल हाल करणें देखील मान्य केलें; उलट सॉक्रेटिस हा सणावारासारख्या अगर उत्सवादिकांसारख्या प्रसंगीं मद्याचें देखील यथास्थित सेवन करी, व अशा वेळीं मद्य पिण्यांत देखील त्याची कोणी बरोबरी करूं शकत नसे. इतकें मद्य पिऊन देखील त्याच्या अमलानें सॉक्रेटिस कधीं गाफल होत नसे, व याबद्दल त्याच्या मित्रांनां अनेकवार अनुभवही आला होता. अशा समारंभाच्या प्रसंगीं एकदम पुष्कळ मद्य न पितां तें हळू हळू व पुष्कळ प्यावें, असें त्याचें मत होतें. कारण त्याच्यायोगानें एकदम पूर आल्याप्रमाणें सर्व मनोवृत्ती एकदम वाहून न जातां, त्याजवरून जणूं काय हळू हळू उत्साहाच्या लाटावर लाटा उसळतात. सारांश, अगदीं कमी खाऊन किंवा अगदीं अनावृत्त राहून, शरीर कृश, रोगट, किंवा कमकुवत करणें, आणि तें लोकसेवेस नालायक करणें, हें सॉक्रेटिसाला मान्य नव्हतें. स्वावलंबनाला व स्वाभिमानाला पोषक होईल अशा दृष्टीनेंच आपण त्याचा स्वीकार करावा, ही त्याची खरी कल्पना होती. सिनिक्स लोकांबद्दल विस्तारानें लिहिण्याचा प्रसंग आला म्हणजे सॉक्रेटिसाचें मत केवळ अर्धवट समजल्यामुळें ते कसे

घसरले हें दाखवूं. सध्या सॉक्रेटिसाच्या साधेपणांतही काय विशेष होता हें सांगण्याकरितांच येवढा विस्तार केला.

लोकांनां उपदेश करण्याचें व्रत पत्करल्यावर तें सॉक्रेटिसानें असामान्य एकनिष्ठतेनें चालविलें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत लोकांबरोबर संभाषण करण्यावाचून त्यानें कोणताच उद्योग केला नाहीं. त्याच्या विशिष्ट शिक्षणपद्धतीमुळें तो आपल्याकडे नेहमीं अज्ञान पत्करीत असे, व म्हणून तो स्वतःस कधीं शिक्षक म्हणवीत नसे; व सोफिस्ट लोकांसारखीं विद्यालयेंही त्यानें काढलीं नाहींत. आपल्याला असलेलें ज्ञान दुसऱ्यास देण्याचा सॉक्रेटिसचा मार्ग म्हणजे त्याजबरोबर संभाषण करणें. तें संभाषण अमक्या बरोबरच होईल असा कधींही नियम नसे. जो कोणी त्याच्याबरोबर बोलायला, त्याला प्रश्न करायला, किंवा तो बोलेल तें ऐकण्याला तयार असेल त्याच्याबरोबर तो बोलणें सुरू करी. आपण या आपल्या आवडत्या व्यासंगावर किती प्रेम करतों, हें दाखविण्याकरितां सॉक्रेटिस म्हणत असे कीं, दुर्दैवानें आपलें भाषण आपखुषीनें ऐकण्यास कोणीच मिळाला नाहीं तर पैसे देऊन देखील आपण तसा मनुष्य पैदा करूं; परंतु असा प्रसंग त्याजवर कधींच आला नाहीं. त्याचें भाषण इतकें आकर्षक असे कीं, त्याच्याभोंवती लोकांची व विशेषतः तरुण लोकांची नुसती मीड असे. त्याची बोलण्याची विशेष पद्धती व त्यांतील विचारसरणी यांजबद्दल दुसऱ्या एखाद्या भागामध्यें सविस्तरपणें लिहावयाचें आहे; म्हणून सध्यां त्याजविषयीं विशेष न लिहितां येवढेंच सांगतों कीं, ज्ञानाचा दंभ माजविणाऱ्या मोठमोठ्या लोकांचें अज्ञान उघड करून त्यांची तो फजीती करीत असतां तेथें जमलेल्या मंडळीस एक आपली गंमतच वाटत असे, व त्याच प्रसंगीं अत्यंत महत्वाच्या विषयावर एकाएकी नवीन माहिती मिळत असल्यामुळें तरुण मंडळींना सॉक्रेटिसचें भाषण फार आवडत असे. व सॉक्रेटिसही ज्या ज्या ठिकाणीं माणसांची गर्दी असण्याचा

संभव त्या त्या ठिकाणीं आपण होऊन जाई, व आपल्या संभाषणास सुरवात करी. सकाळीं उठल्याबरोबर आधीं लोकांच्या फिरावयास जाण्याच्या ठिकाणीं, आखाड्यांत, आणि शाळांत तो जाई. त्याचप्रमाणें बाजार अगदीं भरलेला असण्याच्या वेळीं तेथें जाऊन तो निरनिराळ्या वखारींतून हिंडे व सर्वांशी संभाषण करी. फार काय पण प्रसंगानुरोधाचें त्यानें वेश्यांबरोबर संभाषण करून त्यांच्या धंद्याविषयीं प्रश्नोत्तरें करण्यांत देखील अनमान केलें नाहीं. अस्पेशिया व थिओडोटे या नांवाच्या वारांगनांबरोबर त्याचें संभाषण झाल्याचें प्रसिद्ध आहे. त्याच्या भाषणावर लुब्ध होऊन जे कोणी तो जाईल तिकडे जात, अशांची गणना लोक त्याच्या शिष्यांमध्यें करीत असत; परंतु असें नातें त्यानें स्वतः कधींच मनामध्येंही आणिलें नाहीं. अशा त्याच्या शिष्यांमध्यें अथेन्समधील रहिवाशीच असत असें नाहीं; तर मिगारा, थीब्स, एलिस, इत्यादि इतर संस्थानांतील लोकसुद्धां केवळ त्याचें भाषण ऐकण्यास येत. या एका गोष्टीवरून देखील त्याचें संभाषण किती खुबीदार, मोहक व उपदेशक असेल याचा कोणालाही अदमास होईल.

सकाळपासून संध्याकाळपर्यंत लोकांशी संभाषण करून त्यांच्या कल्पना सुधारण्यांतच खरें लोककल्याण व खरी ईश्वरसेवा आहे असा सॉक्रेटिसचा भरंवसा होता. देशसेवा करण्याच्या इच्छेनें तो राजकारणांत कां शिरला नाहीं, याचें कारण त्यानें आपल्या आत्मसमर्थनांत सांगितलें आहे; तें पुढें येईलच. परंतु राजकारणाच्या विशेष उलाढालींत तो पडला नाहीं तरी अथेन्सचा नागरिक या नात्यानें त्याजकडे येणारी कामगिरी चोख बजावण्यास तो कधींच चुकला नाहीं. पॉटीडिया, डेलियम्, ॲंफिपॉलिश वगैरे ठिकाणीं झालेल्या युद्धांत तो सामान्य शिपायांच्या नात्यानें ( As a hoplite. ) हजर होता, व तेथें त्यानें आपलें काम फार धैर्यानें व विश्वासानें बजाविलें होतें. सॉक्रेटिसच्या मित्रांनां

त्याचीं कृत्यें स्तुतीस पात्र वाटावीं हें साहजिकच आहे,परंतु या युद्धप्रसंगीं त्यानें दाखविलेल्या धैर्याची असामान्यता सोडून दिली तरी एकंदरींत तो नागरिकत्वानें प्राप्त होणारीं आपलीं कर्तव्यें करण्यांत कधींही चुकत नसे, हें यावरून सिद्ध होतें. त्याचप्रमाणें एकदां तो सिनेट-सभेचा अध्यक्ष असतांना त्याला असामान्य मनोधैर्य दाखवून अन्यायाचा प्रतिकार करावा लागला. परंतु याशिवाय त्याचा राजकारणाशीं फारसा संबंध आला नाहीं. आपण स्वतः सरदार होण्यापेक्षां अनेकांनां सरदार करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे, यांतच ग्लडस्टन साहेबांनां भूषण वाटत असे. त्याचप्रमाणें आपण स्वतः राजकारणी होण्यापेक्षां राजकारणी पुरुषांनां अत्यंत अवश्य असलेली बुद्धिमत्ता लोकांत निर्माण करणें हेंच अधिक भूषणावह आहे, असें सॉक्रेटिसाचें मत होतें; व त्याप्रमाणें लोकांमध्यें मिसळून त्यांची सुधारणा करण्याकरितां आपल्या वयाच्या सत्तराव्या वर्षापर्यंत तो अहर्निश झटला.

या त्याच्या महनीय आचरणामुळें कित्येक लोकांवर त्याचे उपकार झाले व ते त्याजवर प्रेम करूं लागले. व कित्येक तर त्याच्या इतके भजनी लागले कीं, त्यांनीं जवळजवळ आपलीं घरेदारें देखील सोडलीं व ते नेहमीं त्याच्याच भोंवती राहूं लागले. परंतु या मित्रांच्या बरोबरच सॉक्रेटिसनें आपणास अनेक शत्रूही करून घेतले होते. ज्यांचें अज्ञान त्यानें उघडकीस आणलें होतें व ज्यांची त्यानें भर चव्हाट्यावर फजिती केली होती, त्या लोकांनीं त्याजविरुद्ध कट केला, व त्याजवर फिर्याद केली. या फिर्यादींत त्याला विष प्राशनाची शिक्षा झाली. या फिर्यादीच्या वेळीं सॉक्रेटिसनें कसें वर्तन ठेवलें, तिचा असा प्रतिकूल निकाल कां झाला, सॉक्रेटिसच्या मरणाचे वेळीं काय काय प्रसंग घडले, त्याच्या मरणानंतर त्याजविषयीं लोकमतांत काय फरक पडत गेला, इत्यादिक गोष्टींचा विचार क्रमशः पुढें येईलच. त्याच्या आधी, या अल्प वृत्तांतांत केवळ

सूचित केलेल्या अनेक विषयांची विशेष माहिती देणें अवश्य आहे. सॉक्रेटिसच्या भाषणपद्धतींतील विशेष कोणचा, त्याचीं विशिष्ट विषयां-संबंधीं मतें काय, व तत्त्वज्ञानाच्या बाबतींत त्यानें विशेष प्रगति काय घडवून आणली, इत्यादि विषयांचा आधी सांगोपांग उहापोह करून मग आपण त्याच्यावर झालेल्या फिर्यादीच्या व त्यांतच झालेल्या त्याच्या अंतकाळाच्या हकीगतीकडे वळूं.



# प्रकरण २ रें.

---:o:---

## साक्रेटिसची वाद्पद्धति.

साक्रेटिसनें तत्त्वविचारांत ज्याप्रमाणें मोठी क्रांति घडवून आणली, त्याप्रमाणेंच वादपद्धतींतही त्यानें मोठी भर टाकली. इलिया येथील पंथापैकीं झेनोविषयीं लिहितांना त्याच्या अनिष्टापत्तिरूप पद्धतीचें विवेचन करण्यांत आलेंच आहे. तत्त्वज्ञानाचा एक अत्यंत महत्वाचा भाग जो तर्कशास्त्र त्याचें बीजारोपण करण्याचा मान झेनोकडे येत आहे; परंतु या बीजाचा अंकुर अतिशय अपरिपक्क स्थितींत असतां त्याची योग्य जोपासना करून त्याला परिणतावस्थेंत आणण्याचें श्रेय सॉक्रेटिस, प्लेटो व ॲरिस्टॉटल यांजकडे आहे. या नव्याकाळांत तर्कशास्त्राची जी प्रगती झाली त्याचें कारण त्या प्रगतीच्या मुळाशीं असलेली खळबळ उत्पन्न करण्यांत सॉक्रेटिसानें आपला काळ घालविला, आणि त्याच्या प्रयत्नानें झालेल्या जागृतीला या परिणतीचें श्रेय आहे. त्यांतही आश्चर्याची गोष्ट हीच कीं, अरिस्टॉटलच्या नंतर तर्कशास्त्राची वाढ झाली असें म्हणण्यापेक्षां केवळ त्याची साफसुफी झाली असेंच म्हणावें लागतें. ज्याप्रमाणें एखाद्या वृक्षाच्या आडव्यातिडव्या फुटलेल्या शाखा छाटून त्याला थाटदार स्वरूप दिलें, किंवा त्याच्या ओबडधोबड दिसणाऱ्या मुळांभोंवतीं सुंदर संगमरवरी पार बांधला, म्हणजे त्या वृक्षाची वाढ झाली असें म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें तर्कशास्त्राच्या आधुनिक परिणतीचीही स्थिति आहे. ती खरी परिणती नसून केवळ साफसुफी आहे. उलटपक्षीं साक्रेटिसपासून ॲरिस्टॉटलपर्यंतचा काळ पाहिला, व त्यापूर्वीच्या काळांतील तर्कशास्त्राचें स्वरूप ध्यानांत आणलें, तर एखाद्या अत्यल्प वटबीजा-

पासून आपल्या दूरवर पसरलेल्या शाखाविस्तारांनीं असंख्य पथिकांनां व विविध विहंगमांनां विश्रामस्थान झालेला प्रचंड वटवृक्षच निर्माण व्हावा, त्याप्रमाणें तर्कशास्त्राची वाढ झाल्याप्रमाणें वाटतें. ॲरिस्टॉटलचा काळ आपणास इतका जुना असतांही तो अगदीं जवळचासा भासतो, व सॉक्रेटिसच्या पूर्वीचा काळ त्यापेक्षां एखाद्या शतकानेंच जुना असतांही त्या दोन कालविभागांत केवढें तरी अंतर असावें असें वाटतें. रथाचे घोडे अगदींच रेंगाळत चालले तर एखादा मैलही किती लांब वाटतो, पण उलटपक्षीं ते मोठ्या वेगानें धांवत चालले तर कित्येक योजनांचाही हिशोब रहात नाहीं, तशीच कांहीशीं ही स्थिति आहे.

तर्कशास्त्राची जशी जशी वाढ होत जाईल तशी तशी त्यांतील परिभाषा अधिकाधिक निश्चित व रूढ होत जाते. भरतभूमींतील तर्कशास्त्राची वाढ फार प्राचीन काळीं झाली, व त्यामुळें ही परिभाषा ठरण्यापूर्वींचे बौद्धिक परिश्रम आपणास केवळ अनुमानगम्य आहेत. सात किंवा सोळा पदार्थ मानून त्यावर वैशेषिक व न्याय या भारतीयतर्कशास्त्राच्या दोन शाखांची उभारणी करण्यांत आली आहे; परंतु हे सात किंवा सोळाच पदार्थ निश्चित होण्यापूर्वीं जी कांहीं बौद्धिक चळवळ सुरू असेल त्याची हकीगत आपणास पहावयास सापडत नाहीं; व या तर्कपद्धतींतील पदार्थांचें समर्थन करतांना त्या त्या ग्रंथांतून जे वाद अढळतात, त्यावरून या खटाटोपाची साधारण कल्पना होते. पाश्चात्य देशांतील तर्कशास्त्राच्या परिणतीला कारणभूत झालेल्या चळवळीचें स्वरूप आपणास याहून अधिक स्पष्ट दिसतें, व त्या चळवळींतील प्रधानत्वाचा मान सॉक्रेटिसकडे येत आहे. एकदा शास्त्राची परिभाषा ठरली म्हणजे ती नित्य व्यवहारांत देखील इतकी रूढ होते कीं, त्याचे साधारण अर्थ सामान्य मनुष्यालाही समजतात, व ता ते पारिभाषिक शब्द सहज उपयोगांतही आणतो. उदाहरणार्थ,

जाति व व्यक्ति यांच्यासंबंधीं आपण आज सहज कल्पना देऊं शकतो, परंतु जाति व व्यक्ति यांच्या व्याख्या ठरविणें हें किती कठीण काम आहे? ज्या व्याख्या समजण्यासही बुद्धीला चालन द्यावें लागतें, त्या व्याख्या व्यवस्थित रीतीनें सिद्ध करणें म्हणजे बुद्धीची अचाट कामगिरीच नव्हे काय? मनुष्याचे विचार जसजसे अधिक प्रगल्भ होतात, तसतसें या कार्याचें महत्त्व वाढत जातें. अव्यवस्थित पडलेल्या द्रव्यराशींतून सोनें, मोती, हिरे, एकीकडे निवडून काढण्यास विविध द्रव्यांची योग्य ओळख असावी लागते, व मनुष्याच्या विचारांची सुसंगति लावण्यास व त्या विचाराची प्रगती योग्य दिशेनेंच होईल अशी व्यवस्था करण्यास, याच पृथक्करणपद्धतीची ( analytical process ) आवश्यकता असते. सॉक्रेटिसनें हीच पद्धति उचलली होती. मनुष्याच्या अनपेक्षित भाषणाचा जुंबाडा उकलून त्यांतील प्रत्येक धागा वेगळा केल्याशिवाय त्यांची योग्य संगती लाऊन उंची वस्त्राचा ताण कसा तयार करता येणार? यावरून सॉक्रेटिसच्या पद्धतीचें अगदीं थोडक्यांत स्वरूप म्हणजे आपल्या अव्यवस्थित विचारांचे सूक्ष्म धागे उकलून निश्चित मतांचे ( Conceptions ) प्रतिपादन करणें असें सांगतां येईल.

या पद्धतीला अनुरूप असे सॉक्रेटिसच्या भाषणांत तीन भाग असत, व त्या प्रत्येक भागाचें योग्य महत्त्व पाहून त्यांचा तो प्रसंगानुसार उपयोग करी, त्यांपैकीं पहिला भाग म्हणजे आपल्या अज्ञानाची कबुली असे. जोंपर्यंत मनुष्याला आपणास खरें ज्ञान असल्याचा अभिमान आहे, तोपर्यंत त्याला सत्यज्ञानाची प्राप्ती होणें शक्य नाहीं; आणि त्यांतही ज्या ज्ञानाविषयीं हा अभिमान बाळगावयाचा तें ज्ञानही अयथार्थ किंवा केवळ आभासमयच असेल तर हा वृथाभिमानाचा कांटेरी वृक्ष समूळ उपटून काढल्याशिवाय त्या पुरुषाच्या मनोभूमिकेंत सत्यज्ञानाचें बीजारोपण होणेंच शक्य नाहीं. सॉक्रेटिसनें आपल्या वादपद्धतींत हा भाग ठेवण्याचें एक महत्त्वाचें कारण असें कीं, त्याच्यावेळीं सोफिस्ट या

नांवाचें जे पंडित असत ते सर्वज्ञतेचा मोठा डौल मिरवीत असत, व प्रत्येक विषयांतील आपलें अज्ञान झाकण्यासाठीं पोकळ शब्दावडंबर माजवीत असत. याचा साहजिक परिणाम असा होई कीं, त्या त्या विषयांत पारंगतता मिळविण्याची इच्छा न धरतां आपल्या अज्ञानावर पांघरूण घालण्याची शिताफीच जिकडे तिकडे बोकळली. एखाद्या विषयाचा सांगोपांग अभ्यास करून सूक्ष्म बुद्धीनें व दीर्घ विचारानें त्यांतील मतितार्थ काढणें हें परिश्रमाचें काम असल्यामुळें सोफिस्ट लोक केवळ भपकेबाज शब्दलालित्यावरच वेळ मारून नेत. ज्ञानप्रगतीच्या मार्गांतील हा जबरदस्त अडथळा दूर करावा हा सॉक्रेटिसचा मुख्य उद्देश होता, व हा उद्देश साधावयाचा तर सोफिस्टांच्या पांडित्याचा भ्रमाचा भोपळा फोडणें अत्यंत आवश्यक होतें. हें अज्ञानाचें भरपूर माप सोफिस्टांच्या पदरांत पाडण्यासाठीं सॉक्रे-टिस आधीं स्वतः अज्ञान पत्करी, व माझ्यासारख्या अज्ञानाला तुमचें हें गूढ भाषण कळत नाहीं, तर मी आपला एक मूर्खपणाचा प्रश्न विचारतों त्याचें उत्तर द्या, अशा तऱ्हेची प्रस्तावना करून आपल्या प्रश्न करण्याच्या हातोटीनें तो त्यांना इतका पेंचांत आणी कीं, सरते-शेवटीं त्यांना आपलें अज्ञान कबूल करणें भाग पडे. अशा रीतीनें साक्रेटिसची अज्ञानाची कबुली ही दुसऱ्याचें अज्ञान सिद्ध करण्यांत उपयोगी पडे. यामुळें कित्येकांची अशी समजूत आहे कीं, सॉक्रेटिसनें जाणून बुजूनच हें ढोंग पत्करलें होतें, व ज्याप्रमाणें बूमरँग नावाचें हत्यार फेकणारा इसम प्रथम तें दुसरीकडेच फेंकतो आहे असें दिसतें, परंतु अखेर तें हत्यार नेमकें निशाणावर जाऊन लागते, त्याप्रमाणें सॉक्रेटिस स्वतः अज्ञान पत्करी ते केवळ आपल्या प्रतिपक्षाला अज्ञानी ठरविण्यापुरतेंच, असा या मताचा मथितार्थ आहे. साक्रेटिसच्या या वादपद्धतीनें त्याच्या प्रतिपक्षीयांचें अज्ञान फार लवकर उघडकीस आणतां येई हें खरें आहे; परंतु तेवढ्यावरून सॉक्रेटिस केवळ त्याच उद्देशानें

हें सोंग पांघरी असें सिद्ध होत नाहीं. त्याचप्रमाणें आपण स्वतः अज्ञानच पत्करावयाचें व आपल्या प्रतिपक्ष्याला आपल्या कोटिक्रमानें अज्ञान कबूल करणें भाग पाडावयाचें, म्हणजे एक तऱ्हेनें सत्य ज्ञानाचा असंभवच प्रतिपादण्यासारखें आहे, असाही कित्येकांचा आक्षेप आहे. परंतु सॉक्रेटिस सत्य ज्ञानाचा असंभव मानीत नसे, ही गोष्ट त्याच्या एकंदर चरित्रक्रमावरून सुस्पष्ट आहे. ज्यानें आपलें सर्व आयुष्य लोकांनां सदुपदेश करण्यांत घालविलें, त्याला सत्यज्ञान संपादणें अशक्य वाटणें हें कधींतरी संभवतें काय? मग सॉक्रेटिसच्या या अज्ञान प्रतिज्ञेची उपपत्ती काय, असा प्रश्न उभा राहातो. याला उत्तर म्हणजे येवढेंच कीं, सॉक्रेटिसला ज्ञानविषयक मीमांसा म्हणजे एक अत्यंत गंभीर व अनंत विषय आहे असें वाटे, व म्हणून आपलें ज्ञान कितीही मोठें झालें तरी तें अल्पच असें त्याला वाटे. याशिवाय त्याची दृढ समजूत होती कीं, सत्यज्ञान म्हणून जर कांहीं असेल तर तें निर्विकल्प विचारांची (conceptions) स्थापना हेंच होय. व म्हणून जगांत प्रचलित कल्पनांचा फोलपणा दाखविण्यासाठीं तो प्रथम अज्ञान पत्करी व आपल्या प्रतिपक्ष्याचें अज्ञान स्पष्ट करी. एकाच ग्रंथकाराच्या किंवा तत्त्वज्ञाच्या लेखांतील अथवा भाषणांतील परस्पर विरोधी दिसणारे अंश दाखवून त्यांचें मत धुडकारून लावण्याची सोफिस्टांची रीतच असे. सॉक्रेटिस तीच पद्धति पत्करून परस्पर विरुद्ध मतें प्रचलित करणाऱ्या भौतिक तत्त्वज्ञान्यांना खरें ज्ञानच झालें नाहीं असें दाखवी, व येवढ्या पुरतें त्याचें व सोफिस्टांचें साम्य भासे. परंतु सोफिस्ट लोक ज्ञानासंभववाद पत्करून हें अज्ञान म्हणजे त्यांच्या ग्रंथांतील एक महामंत्रच मानीत. उलटपक्षीं साक्रेटिसच्या मतें या अज्ञानासारखा मनुष्याचा दुसरा शत्रू नाहीं व त्याच्याशीं झगडून त्याचा निःपात करणें हेंच प्रत्येक मनुष्याचें श्रेष्ठ कर्तव्य आहे.

ज्या मनुष्याशीं सॉक्रेटिसाला संभाषण करावयाचें असेल त्या मनुष्याला तो हळूहळू कसे प्रश्न विचारी, व त्याला नकळत आपल्या- मताप्रमाणें वठणीवर आणी, याची योग्य कल्पना यावी म्हणून कांहीं सुप्रसिद्ध उदाहरणें घेऊन त्यांचें थोडेसें विवरण केल्यास तें अस्थानीं होणार नाहीं.

युथीडिमस ( Euthydemus ) या नांवाचा एक तरुण गृहस्थ होता. त्यानें सुप्रसिद्ध कवि व सोफिस्ट यांच्या ग्रंथांचा मोठा संग्रह जमविला होता; व या डौलातच त्याला असें वाटें कीं, मी अतिशय योग्यतेचा मनुष्य आहे. राजकारण काय, लोकानुरंजन काय, परराष्ट्रीय मसलती काय, जें वाटेल तें मला उत्तम साधेल; व माझ्यासारखें दुसऱ्या कोणाला तें साधणार नाहीं. तो वयानें इतका लहान होता कीं, कोठल्याही हुद्याच्या जागेवर त्याची अद्यापि नेमणूक झाली नव्हती. तिथापि त्याला आपल्यासारखा ज्ञानवृद्ध कोणी नाहीं असा गर्व झाला होता. सॉक्रेटिसनें त्याला गांठलें; व हळूहळू संभाषण सुरू करून त्याला जरा खुलविलें. आपला राजकारणांत शिरण्याचा बेत असल्या- बद्दल त्यानें सॉक्रेटिसजवळ कबूल केलें. मनुष्य प्रामाणिक असल्या- शिवाय त्याला राजकारणशास्त्र साधणार नाहीं, इत्यादि गोष्टी युथी- डिमसनें कबूल केल्या. नंतर सॉक्रेटिसनें त्यास विचारले " युथीडिमस, आपण प्रामाणिक आहां काय ? " या प्रश्नाला अस्तिपक्षीं उत्तर मिळाल्यावर साक्रेटिसनें असा प्रश्न केला कीं, ज्याप्रमाणें आपण एखाद्या मनुष्याच्या कार्यावरून त्याच्या धंद्याचें अनुमान करतों, त्याप्र- माणें एखादा मनुष्य प्रामाणिक असल्याबद्दल आपणास अनुमान करतां येईल काय ? युथीडिमसच्या मतें न्याय्य कृत्य करणारा मनुष्य प्रामा- णिक असतो. त्यावर सॉक्रेटिस म्हणाला न्याय्य म्हणजे तरी काय ? व अन्याय कृत्याचें तरी स्वरूप कोणचें ? समजा कीं, आपण न्याय पक्षांत येणाऱ्या सर्व गोष्टी अ या सदरांत घालावयाच्या व अन्याय

पक्षांत मोडणाऱ्या सर्व गोष्टी ब या सदरांत घालावयाच्या असें ठरविलें, तर खोटें बोलणें, फसविणें, एखाद्याला गुलाम करणें, बळजबरी करणें, इत्यादि कृत्यें कोणत्या सदरांत येतील ? हा प्रश्न दिसावयास फार सोपा असल्यामुळें युथीडिमसनें चटकन उत्तर दिलें कीं, या सर्व गोष्टी ब म्हणजे अन्याय्य याच सदरांत येतील. युथीडिमसचें हें उत्तर चुकीचें आहे हें दाखविण्यासाठीं सॉक्रेटिसनें कांहीं विवक्षित उदाहरणें देऊन विचारलें, समज युथीडिमस, ज्यावेळीं एखादा सेनापति आपल्या शत्रु-सैन्याला फसवून फुसलाऊन अडचणीच्या जागीं आणतो, व मग एक-दम उलट खाऊन त्यांचा धुव्वा उडवून देतो, किंवा आपल्या शत्रूंच्या प्रांतांत स्वारी करून आपल्या संस्थानांत घेऊन येतो, किंवा प्रसंगवि-शेषीं राजकारस्थानांत खोटें बोलतो, त्यावेळीं हें सर्व आचरण अन्याय्य होतें काय ? या प्रश्नाला अस्तिपक्षीं उत्तर देणें अशक्य आहे. कारण आपण अशा मनुष्याची सर्वत्र वाहवा झालेली पाहतों. परंतु युथीडिमस तितक्यांत सांवरावयाचा प्रयत्न करून म्हणाला कीं, ज्यावेळीं या सर्व गोष्टी अन्याय्य आहेत असा निकाल दिला, त्यावेळीं माझ्या मनांत फक्त परस्परांत स्नेहसंबंध असलेल्या मंडळीचा व्यवहारच घोळत होता. आपल्या मित्रांशी खोटें बोलणें, त्यांनां फसविणें इत्यादि सर्व अन्याय्य आहे. ही पहिल्या व्याख्येमध्यें एक सुधारणा झाली, पण येवढी सुधा-रणा तरी पुरी आहे काय ? ही सुधारलेली व्याख्याही अद्याप सदोषच आहे, व हें दाखविण्यासही आपणास कित्येक उदाहरणें देतां येतील. सॉक्रेटिस म्हणतो कीं, ज्यावेळीं एखादा सेनापति आपले सैनिक निरु-त्साह झाले आहेत व केवळ त्यांच्या निरुत्साहामुळें कार्यनाश होत आहे असें पहातो, अशावेळीं त्यांनां उत्साह यावा म्हणून मागून मोठी कुमक येत असल्याबद्दल निखालस खोटीच बातमी देतो, त्यावेळीं तो अन्याय्य आचरण करतो काय ? किंवा एखादें लहानमूल औषध घेत नाहीं असें पाहून त्याचा बाप तें त्याला शर्करावगुंठित करून

देतो, त्यावेळीं त्याची ही फसवणूक अन्यायाची व म्हणून शिक्षेस पात्र आहे काय ? किंवा आपला एखादा मित्र वेडाच्या किंवा निराशेच्या लहरीमध्यें आपला स्वतःचा खून करून घेईल या भीतीनें आपण त्याच्याजवळची तरवार गुपचुप किंवा जबरदस्तीनें हिराऊन घेतो, तेव्हां हें कृत्य अन्याय्य ठरेल काय ? सारांश, खोटें बोलणें, फसवणें, इत्यादि गोष्टी आपल्या मित्रमंडळीशी झालेल्या व्यवहारांतही नेहमीं पापरूप किंवा अन्याय्याच्या ठरत नाहींत. बरें, याच गोष्टीचा आपण पुढें विचार करूं लागल्यास असें आढळेल कीं, मनुष्यानें नकळत आपल्या मित्राचें अकल्याण होण्याजोगें वर्तन केलें, तरी त्याबद्दल आपण त्याला फारसा दोष देणार नाहीं. पण जर त्यानें जाणून बुजून तसें वर्तन ठेविलें, तर मात्र तो दोषास पात्र होतो.

याचप्रमाणें अन्य प्रसंगीं लोकसत्ताक राज्य म्हणजे काय, हा प्रश्न प्रथम निघाला असतां सॉक्रेटिस युथीडिमसला विचारतों कीं, लोक म्हणजे तरी कोण ? युथीडिमस म्हणतो, लोक या शब्दाचा अर्थ गरीब लोक असा आहे. यावर असा प्रश्न येतो कीं, गरीब कोणाला म्हणावें व श्रीमंत कोणाला म्हणावें ? युथीडिमसच्या मतें ज्यांच्याजवळ आपल्या गरजा भागून उरण्यासारखें साहित्यादिक असेल ते श्रीमंत व इतर गरीब. पण या उत्तरावर असा आक्षेप येतो कीं, कित्येक लोक सधन असूनही त्यांच्या वासना इतक्या विस्तृत असतात कीं त्यांना तें द्रव्य पुरत नाहीं. उलटपक्षीं कित्येक धनहीन पुरुषही समाधानवृत्तीनें असतात. मग एखाद्या राजालाही आपणास भिकारी म्हणून ठरविलें पाहिजे, व एखाद्या रंकालाही श्रीमान् म्हटलें पाहिजे.

शास्ता म्हणजे कोण, असा प्रश्न निघाल्यास त्याला सहज उत्तर असें देण्यांत येतें कीं, ज्याला हुकूम सोडण्याचा अधिकार आहे तोच शास्ता. पण जर विशिष्ट उदाहरणें घेतलीं तर जहाजाचें नेतृत्व कर्ण-

धारालाच देण्यांत येतें, व कोणी आजारी असल्यास एखाद्या भिषग्वरा-च्याच सल्ल्यानें वागावें लागतें. यावरून असें सिद्ध होतें कीं, खरें शासितृत्व हुकूम सोडण्याच्या अधिकारांत नसून तें त्या त्या प्रसंगीं उपयोगी पडणाऱ्या ज्ञानांत आहे.

युथिफ्रॉन या नांवाचा एक भविष्यवादी अथेन्समध्यें राहात असे. पावित्र्य म्हणजे काय, या विषयावर सॉक्रेटिसचा त्याजबरोबर झालेला संवाद सुप्रसिद्ध आहे. खुद्द सॉक्रेटिसवर अपवित्रपणाबद्दल फिर्याद झालेली असतां सर्व अथिनीअन लोकांच्या पावित्र्यविषयक कल्पना किती अपूर्ण व सदोष होत्या हें स्पष्ट करण्यासाठीं प्लेटोनें या संवादाची रचना केली असावी. मिलीटसच्या अर्जावरून सॉक्रेटिसवर अपवित्र विचार प्रसृत केल्याचा आरोप ठेवण्यांत आला होता. एकदां असा प्रसंग घडून आला कीं, किंग आर्कन् म्हणून जो अधिकारी असे त्याच्या कचेरीच्या दरवा-ज्याशींच साक्रेटिस व युथिफ्रॉन यांची गांठ पडली. युथिफ्रॉन हा एक फिर्याद दाखल करण्यासाठींच किंग आर्कन्कडे जात होता. त्या फिर्यादीचें स्वरूप मोठेंच चमत्कारिक होतें. नॅक्शॉस येथें कांहीं गुलाम युथिफ्रॉनच्या बापाच्या शेतावर काम करीत होते त्यांपैकीं एकानें दारूच्या अमलामध्यें दुसऱ्या एका गुलामाला ठार केलें. आतां या खुनी गुलामाला काय शिक्षा करावी, हा प्रश्न होता. युथिफ्रॉनच्या बापानें त्या खुनी गुलामाचे हातपाय बांधून त्याला एका खंदकांत टाकिलें व त्याला काय शिक्षा करावी या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं एक मनुष्य अथेन्सला पाठविला. परंतु तो मनुष्य अथेन्सहून परत येण्यापूर्वींच तो खुनी गुलाम मालकाच्या हलगर्जीपणानें मरण पावला. आतां या मृत्यूबद्दल युथी-फ्रॉनच्या बापाला जबाबदार धरून त्याला शिक्षा करावी किंवा नाहीं, हा नवीनच प्रश्न उपस्थित झाला. युथीफ्रॉनच्या कुटुंबांत इतर सर्व मंडळीचें असें म्हणणें होतें कीं, खुनी गुलामाला कांहीं मुद्दाम जिवें मारण्यांत आलें नव्हतें, व केवळ हलगर्जीपणानें तो मृत्यु पावला असला, तरी

तो स्वतः खुनीच असल्यामुळें मृत्यूच्या शिक्षेला पात्रच होता. अर्थात् त्याजबद्दल कोणाला शिक्षा करण्याचें कारण नव्हतें. स्वतः युथिफ्रॉनचें मत मात्र अगदीं भिन्न होतें. खून म्हणजे खूनच. मग तो कोणाचा असो व कसाही घडून आलेला असो. अशा अपराधाला शिक्षा ही झालीच पाहिजे. मग तो अपराधी आपला संबंधी कां असेना. खुनी गुलामाच्या मृत्युबद्दल न्याय व्हावा म्हणून युथीफ्रॉन आपल्या प्रत्यक्ष बापावर फिर्याद लावण्यास चालला होता, व कुटुंबांतील सर्व मंडळींच्या विरोधाला न जुमानतां आपण हें मोठें पवित्र कर्तव्य करीत आहों असा त्याचा समज होता. एका बाजूला पवित्र कर्तव्य कल्पनेची दिशाभूल होऊन प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्यावर फिर्याद करणारा युथिफ्रॉन, व दुसऱ्या बाजूला आपल्या प्रतिपक्षियांबद्दलही शक्यतर चांगलें विधान करूं पहाणारा महानुभाव साधुस्वभाव सॉक्रेटिस, अशांचा हा संवादयोग म्हणजे अपूर्वच प्रसंग म्हणावयाचा.

युथिफ्रॉनची एकंदर हकीगत ऐकून सॉक्रेटिसला अतिशय आश्चर्य वाटलें व त्यानें युथिफ्रॉनला असा प्रश्न केला कीं, कसेंही झालें तरी आपण स्वतःच्या बापावर फिर्याद करण्यांत कांहीं अपवित्र आचरणकरीत आहों, अशी शंका आपल्या मनांत उभी राहाते किंवा नाहीं ? युथिफ्रॉनला या बाबतींत संशयाचा लेशही नाहीं असें दिसतें. आपल्या त्रिकाळ दर्शित्वाचा व धर्मरहस्य पारंगततेचा युथिफ्रॉनला मोठाच अभिमान होता. त्यानें आपलें करणें अगदीं तंतोतंत बरोबर आहे अशी खात्री दिली. इतक्या बिकट प्रसंगींही जें ज्ञान युथिफ्रॉनला उपयोगीं पडतें व त्याला डगमगूं देत नाहीं तें ज्ञान अलौकिकच असलें पाहिजे, अशी त्याची स्तुती करून साक्रेटिस सुचवितो कीं, ज्याअर्थी त्याजवर अपवित्रपणाबद्दलच फिर्याद करण्यांत आली आहे, व ज्याअर्थीं युथिफ्रॉनची पावित्र्यकल्पना अगदीं निश्चित आहे, त्याअर्थी जर युथिफ्रॉननें आपलें ज्ञान सॉक्रेटिसला शिकविलें तर त्याचें मोठेंच कार्य होणार आहे. सॉक्रेटिसला

इतर सर्व तपशीलाची सध्याच कांहीं जरूर नाहीं. त्याचा आपला एक साधा प्रश्न आहे. पवित्रता म्हणजे काय ? किंवा पवित्र आचरण म्हणजे काय ? " मी ज्याप्रमाणें आचरण करतो त्याप्रमाणें आचरण करणें म्हणजेच पवित्रपणा " असा एक सामान्य शेरा मारून आपल्या कृतीला किती पौराणिक कथांतून आधार मिळतो हें युथिफ्रॉन दाखवितो. सॉक्रेटिसचें यावर म्हणणें इतकेंच कीं, पौराणिक कथांवर त्याचा मोठासा विश्वास नव्हता, व युथिफ्रॉनजवळून त्याचे देवतांविषयीचें सर्व ज्ञान संपादन करून घेण्यास अवकाश नव्हता, म्हणून तें भारूड बाजूला ठेऊन युथिफ्रॉननें सर्व पवित्र आचरणांना सामान्यतः पावित्र्य कशामुळें येतें तें सांगावें.

यावर युथिफ्रॉनचें उत्तर असें कीं, जें जें देवांनां आवडतें तें तें पवित्र. सॉक्रेटिसला आतां योग्यसें उत्तर मिळालें. कारण आतां त्याची पद्धतशीर छाननी सुरू झाली. जें जें देवांनां प्रिय तें तें पवित्र हें ठीक दिसतें, पण या व्याख्येचें अधिक स्पष्टीकरण करणें जरूर आहे. देवांनां प्रिय म्हणजे एकसमयावच्छेदेंकरून सर्व देवांनां प्रिय, कीं एकेका देवाला, कां कांहीं देवांनां प्रिय? कारण ज्याप्रमाणें मनुष्यांमध्यें मतभेद व रुचिभेद दृष्टीस पडतो, त्याचप्रमाणें देवांमध्येंही असावयाचेच. त्यावर युथिफ्रॉनची अशी सुधारणा आहे कीं, सर्व देवांना प्रिय तें पवित्र.

यापुढें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, आचरणाचें पवित्र्य हें देवांच्या प्रीतीचें कारण आहे कीं फळ आहे ? म्हणजे कांहींएक आचरण देवांनां आवडतें म्हणून तें पवित्र होतें; किंवा तें आचरण पवित्र असतें व म्हणूनच देवांनां आवडतें ? यावर उत्तर हेंच कीं, जें आचरण पवित्र असतें तें देवांनां आवडतें. युथिफ्रॉनच्या या म्हणण्यावरून हें स्पष्टच होतें कीं, आचरणाचें पावित्र्य ही पूर्वीच सिद्ध झालेली गोष्ट आहे. त्या पावित्र्याचा एक आनुषंगिक परिणाम म्हणजे देवांची प्रीति आहे, व या कारणास्तवच पावित्र्याची व्याख्या करणें व त्याचें स्वरूप उकलवून

दाखविणें, ही गोष्ट शिल्लकच राहिली. साक्रेटिसचा ह्या विचार विशद करण्यास एक उदाहरण घेऊं. हिरा आधीं हिरा असतो, व म्हणून संपत्तिमान लोक किंवा राजेरजवाडे त्याचा अलंकारांत उपयोग करतात. पण म्हणून श्रीमंत लोकांकडून अलंकाररूपानें उपयोगांत आणलें जाणें हें कांहीं हिऱ्याचें स्वरूप होत नाहीं. कारण जर येवढीच गोष्ट हिऱ्याला हिरेपणा देऊं शकती, तर सोनें व मोतीं यांनांही हिरा हीच संज्ञा द्यावी लागली असती. देवांनां ज्या कित्येक गोष्टीं आवडतात त्यांत पावित्र्य हीहि एक आहे. याकरितां पावित्र्याची व्याख्या कांहीं निराळ्या प्रकारानें करणें जरूर आहे. नाहींतर देवांनां प्रिय तें पवित्र व जें पवित्र तें देवांनां प्रिय, असा अन्योन्याश्रय किंवा वर्तुलाकृति भ्रमण होणार.

यावर युथिफ्रॉनला उत्तर देणें फार अवघड वाटतें, व तो कबूल करतो कीं, जी जी म्हणून व्याख्या पुढें करावी ती ती चक्राकार भ्रमणच करूं लागते. सॉक्रेटिस त्यावर असें विनोदानें म्हणतो कीं, त्याचा पूर्वज डीडलस याचे पुतळे असेच सरकत असत व ज्याअर्थीं युथिफ्रॉनच्या व्याख्या तशाच फिरतात, त्याअर्थीं त्या व्याख्यांच्या उभारणीमध्यें त्याचें डीडलससारखेंच कौतुक केलें पाहिजे. युथिफ्रॉनचें यावर असें प्रतिविनोदाचें भाषण आहे कीं, त्याच्या व्याख्या गरगर फिरतात याला कारण तो स्वतः नसून सॉक्रेटिसच आहे. डीडलस दुसऱ्यांच्या प्रतिमा फिरवीत नसे, पण सॉक्रेटिस दुसऱ्यांच्या व्याख्या फिरवितो, तेव्हां त्याची करामत जबरदस्तच म्हणावयाची. परंतु ह्या विनोद सोडून सॉक्रेटिस युथिफ्रॉनला पुनः हाताशी धरतो व आपण त्याची व्याख्या ठरविण्यास मदत करूं असें सांगून पावित्र्य व न्याय्यत्व हीं एकच आहेत काय ? असा प्रश्न करतो. यावर युथिफ्रॉनचें असें म्हणणें पडतें कीं, न्याय्यत्व हें पावित्र्यापेक्षां अधिक व्यापक आहे. न्याय्यत्वाचा संबंध मनुष्यामनुष्यांतही येऊं शकतो, परंतु पावित्र्याचा संबंध केवळ

देव व मनुष्य यांच्यामधींच आहे. " देवाविषयींच्या तत्परतेची न्याय्य बाब ती पवित्र " अशी कदाचित व्याख्या करतां येईल; पण या ठिकाणीं सॉक्रेटिस असा प्रश्न विचारतो कीं, देवाविषयीं तत्परता म्हणजे काय ? घोड्याला खरारा वगैरे करण्यांत अगर गुरें राखण्यांत जी तत्परता असते तीच तत्परता या ठिकाणीं समजावयाची काय ? परंतु असें समजावें तर मोतद्दाराचे घोड्यावर किंवा गोपालकांचे गाईवर जसे उपकार होतात, तसे आपण देवांवर उपकार करतो काय ? नाहीं. युथीफ्रॉन त्यावर अशी तोड सुचवितो कीं; गुलामाची धन्याच्या सेवेविषयीं जी तत्परता, ती कदाचित् या देवविषयक तत्परतेसारखी असूं शकेल. पण गुलाम जसा धन्याच्या उपयोगीं पडतो, तसा मनुष्य कोणत्या बाबतींत देवांच्या उपयोगी पडतो ? युथीफ्रॉन हा आतांपर्यंतच बराचसा घोटाळला; आणि या बाबतींत निःसंशय सत्य गोष्ट सांगतां येत नाहीं, अशी कबुली देऊन तो पुढें म्हणतो; ज्यावेळीं आपले शब्द, प्रार्थना, किंवा हविर्भाग देव स्वीकारतात, तेव्हां आपण पवित्र आहोंत असें समजावें, व त्यापासून आपलें व आपल्या कुटुंबाचें कल्याण होईल अशी खात्री बाळगावी. उलटपक्षीं देवांना त्याज्य वाटणाऱ्या वस्तूपासून नाशच प्राप्त व्हावयाचा. सॉक्रेटिसच्या मतें या सर्व शब्दपांडित्याचा मथितार्थ येवढाच कीं, पावित्र्य म्हणजे प्रार्थना व अवदानदान यांचें शास्त्र. बरें प्रार्थनेचें व यज्ञयागाचें शास्त्र म्हटलें म्हणजे देवांच्या व आपल्या देवघेवीच्या व्यवहाराचें शास्त्रच झालें. आतां मनुष्यांच्या गरजा देवांकडून पुरविल्या जातात, हें म्हणणें युक्त दिसतें. पण देवांच्या कोणत्या गरजा मनुष्याकडून पुरविल्या जाणें शक्य आहे ? युथीफ्रॉन म्हणतो कीं, मनुष्यांच्या देवाला देणग्या म्हणजे केवळ संभावनारूप आहेत, व म्हणूनच त्या देवांनां ग्राह्य आहेत. तर मग त्या पावित्र्याच्या देणग्या त्यांनां उपयुक्त किंवा प्रिय नाहींत काय ? हाही प्रश्न अडचणीचाच आहे. तेव्हां युथीफ्रॉनला असें म्हणावें लागतें कीं, या पावित्र्याच्या देणग्या

देवांनां अत्यंत प्रिय आहेत; पण पावित्र्याची अशी व्याख्या करणें म्हणजे थोड्या निराळ्या शब्दांनीं देवांनां जें प्रिय तें पवित्र, असें म्हणण्यासारखेंच आहे; व ही व्याख्या तर एकदां त्याज्य ठरविण्यांत आली आहे. तेव्हां पावित्र्य म्हणजे काय याची मीमांसा पुनः सुरू केली पाहिजे. युथीफ्रॉनला या बाबतींत नक्की माहिती असलीच पाहिजे. कारण जर त्याचें ज्ञान लेचेंपेचें असतें, तर आपल्या स्वतःच्या बापावर फिर्याद करण्याचें त्यानें कधींही धाष्टर्य केलें नसतें. पण तो सॉक्रेटिस जवळून मुद्दामच कांहींतरी चोरून ठेवतो, असें त्यानें करूं नये म्हणून सॉक्रेटिस त्याची विनवणी करितो. युथीफ्रॉनची आतां पुष्कळच खात्री झाली असल्यामुळें हा वाद लांबविण्याची त्याची तयारी नसणें अगदीं साहजिकच आहे, व म्हणून तो कामाची सबब सांगून निघून जातो.

लॅचेस या नांवाच्या संवादामध्यें धैर्य या गुणाची व्याख्या काय, या प्रश्नाचा असाच उहापोह केला आहे. लॅचेसनें सुचविलेल्या व्याख्यांची सदोषता वारंवार स्पष्ट करण्यांत येते. पायदळ, घोडदळ, भालाईत, पटाईत इत्यादि निरनिराळ्या प्रकारच्या योद्धांच्या लढण्याच्या पद्धति वेगवेगळ्या व म्हणून त्यांच्या धैर्याचा नमुनाही वेगवेगळा. फार काय पण आपली अघाडी बिघडूं न देणें, किंवा आपण उभे असलेलें ठिकाण न सोडणें, अशीही धैर्य या शब्दाची व्याख्या करतां येत नाहीं. कारण एखादे वेळीं आपली अघाडी मोडून पीछेहाट पत्करावयाची व शत्रूला पुष्कळसा अंगावर घेऊन मग उलट खावयाची, यांतही धैर्य असूं शकेल. त्याचप्रमाणें धैर्य हें कांहीं नेहमीं समरभूमीवरच प्रकट होणारें नाहीं. वादळ, रोगराई, किंवा सांसारिक अडचणी, यांजमध्येंही धैर्य दाखवावें लागतें. राजकारणामध्यें तर धैर्याची जरूर विशेष असते. आपले मनोविकार जिंकणें, हेंही मोठें धैर्याचेंच काम आहे. कदाचित् धैर्य म्हणजे सोशिकपणा असें म्हटलें तर कित्येक प्रसंगीं अगदीं अप्रबुद्ध लोकही सोशिक असतात, व हा त्यांचा सोशिकपणा केव्हां केव्हां त्यांच्या

हीनपणाला कारण होतो. मग धैर्य म्हणजे सोशिकपणा म्हणावें तर धैर्य हा गुण जसा श्रेष्ठ, तसाच हीन आहे, असेंच म्हणावें लागेल. पण हा वाग्विरोध अगदीं अग्राह्य आहे.

लॅचेस हा स्वतः शूर आहे व त्यानें अनेक प्रसंगीं असामान्य धैर्य दाखविलें आहे; परंतु धैर्य या शब्दाची त्याला व्याख्या मात्र करतां येत नाहीं.

लिसिस् याच्या संवादामध्यें मैत्री हा वादविषय आहे, व त्यावरही असाच पुष्कळ खल होऊन मैत्रीचें स्वरूप अनिश्चितच सोडण्यांत आलें आहे.

साक्रेटिस हा नेहमींच अशी प्रत्येक समजुतीची छाननी करीत असे, व अशा तऱ्हेनें प्रत्येक विचाराचे सूक्ष्म धागे निरनिराळे काढणें, हा त्याच्या वादपद्धतीचा दुसरा महत्वाचा भाग असे. आपल्या विचारांतील निरनिराळ्या कल्पना योग्य रीतीनें स्पष्ट व्हाव्या म्हणून तो अगदीं नित्यव्यवहारांतील गोष्टी घेई, व त्यामुळें ज्या वस्तूंच्या स्वरूपाविषयीं कोणास अपरिचय नाहीं अशा अनेक वस्तूंविषयींच्या अनुभवानें सामान्य सिद्धांताचें किंचित् दिग्दर्शन करणें त्यास सोपें पडे. सौंदर्य म्हणजे काय, असा प्रश्न निघाला असतां, सुंदर स्त्री म्हणजे काय, सुंदर घोडा कोणता, सुंदर घडा कसा असतो, या प्रश्नांचें उत्तर घेतल्यावर त्यांवरून एकंदरींत सौंदर्य कल्पनेची उभारणी करावयाची. ही पद्धति सोफिस्ट लोकांस फार अडचणीची वाटे हें खरें; कारण अगदीं साध्या प्रश्नाला अगदीं साधें उत्तर देणें म्हणजे त्यांनां अगदींच अपरिचित गोष्ट होती; व असें उत्तर देतां देतां ते अगदीं सहज चकत. परंतु अशी ही प्रश्नोत्तरमाला मांडून त्यापासून जो एक सर्वसामान्यरूप निष्कर्ष निघेल तोच खरा, व अशा भावनांची सिद्धि हाच

या वादपद्धतींतील तिसरा व सर्वांत महत्त्वाचा भाग होय. निःसंदेह अशा उदाहरणांतून निःसंशय असे सामान्य सिद्धांत काढणें, या तर्कपद्धतीला इंग्रेजी भाषेमध्यें इन्डक्शन ( Induction ) असें म्हणतात, व अशा पूर्वी सिद्ध झालेल्या सिद्धांतावरून नवीन सिद्धांत काढणें या पद्धतीला डिडक्शन ( Deduction ) असें म्हणतात. आपल्याकडील तर्कशास्त्रामध्यें व्याप्तिज्ञान हें पहिल्याप्रकारचें आहे; व अनुमान हें दुसऱ्या प्रकारचें आहे. या दोन भागांमध्यें इन्डक्शन ( Induction ) हा अधिक महत्त्वाचा भाग आहे. कारण दुसऱ्या भागाचें अस्तित्व सर्वस्वीं त्याजवरच अवलंबून आहे. आपल्या तर्कशास्त्रांतील नेहमीचें उदाहरण घेऊन याबद्दलची कल्पना थोडी स्पष्ट करूं. एखाद्या पर्वतावरून धुराचे लोट निघतांना आपण पाहिले म्हणजे आपण अनुमान करतो कीं, त्या पर्वतावर अग्नि असावा. या आपल्या निर्णयाला आधार म्हणजे दोन सिद्धांत. ज्या ज्या ठिकाणीं धूर असतो, त्या त्या ठिकाणीं अग्नि असतोच हा एक सिद्धांत; व दुसरा पर्वतावर धूर निःसंशय आहे हा सिद्धांत. या अनुमानामध्यें धूर असणें ( धूमत्त्व ) याला हेतु असें म्हणतात. वरील दोन सिद्धांतांमध्यें पर्वतावर धूर आहे हा सिद्धांत, किंवा तर्कशास्त्राच्या भाषेंत म्हणावयाचें झाल्यास हेतूची पक्षधर्मता ही प्रत्यक्ष आहे. परंतु पहिला सिद्धांत सिद्ध झाल्याशिवाय, म्हणजे हेतु व साध्य ( अग्नित्त्व ) यांची व्याप्ति निश्चित झाल्याशिवाय, या ज्ञानाचा कांहीं उपयोग नाहीं; व ही व्याप्ति ठरविणें ती केवळ Induction नेंच सिद्ध होणारी आहे. वरील उदाहरणामध्यें ज्या ज्या ठिकाणीं धूर आहे, त्या त्या ठिकाणीं अग्नि असतोच, असा जो अनेकशः अनुभव आला आहे, त्यावरून धूर व अग्नि यांची व्याप्ति ठरली. व जेथें धूर असतो, तेथें अग्नि असतोच असा सिद्धांत झाला. हा सिद्धांत ठरविण्यास काय काय खबरदारी ठेविली पाहिजे, हेतु हा काय काय गुणांनीं युक्त पाहिजे, त्याचे दोष काय व

त्याचीं आभासमय स्वरूपें कोणतीं, याचें आपल्या तर्कशास्त्रामध्यें विवरण केलें आहे. अरिस्टॉटलचें तर्कशास्त्र व आपलें तर्कशास्त्र याचें पुढें यथाकाळ सापेक्ष विवरण करण्याचा प्रसंग येईलच, त्यावेळीं याचा विस्तार करावयाचाच आहे. सध्या लक्ष्यांत ठेवावयाची गोष्ट म्हणजे इतकीच कीं, सामान्य सिद्धांत सिद्ध करण्याची Induction ची जी पद्धति, तिचा मूळ पाया सॉक्रेटिसानें घातला. त्याचीं उदाहरणें घेण्याची पद्धती कांहीं अगदीं शास्त्रीय रीतीनें ठरविली नव्हती हें खरें आहे; व त्याच्या प्रयत्नांनीं या पद्धतीचें पूर्ण स्वरूप प्रकट झालें नाहीं हेंहीं तितकेंच खरें आहे. सॉक्रेटिसनें जर कांहीं महत्त्वाचें कार्य केलें असेल, तर आपल्या पृथक्करण पद्धतीनें त्या शास्त्राला सुरवात करणें हेंच होय. सॉक्रेटिस हा फार थोर पुरुष यांत कांहींच शंका नाहीं; पण तो अतिशय श्रेष्ठ असला म्हणून त्यानें प्रत्येक शास्त्राची पूर्तताच केली असली पाहिजे असा कांहीं सिद्धांत नाहीं. ऐतिहासिक पुराव्याशिवाय असा सिद्धांत बांधणें तर अगदींच असमंजसपणाचें आहे. एखाद्या व्यक्तीचा मोठेपणा शास्त्राच्या पूर्णवाढीवर अवलंबून नसून त्यानें केलेल्या प्रगतीपर कार्यावर आहे. परंतु ही गोष्ट लक्षांत न घेतां सॉक्रेटिसला अवास्तव श्रेय देण्याचाही कित्येकांनीं प्रयत्न केला आहे. व ज्या ठिकाणीं ऐतिहासिक पुरावा पुरेसा मिळणार नाहीं, त्या ठिकाणीं केवळ आपल्या कल्पनेचे खेळ लढविले आहेत. प्रोफेसर फेरिअर (Ferrier) व एक फ्रेंच लेखक फूले (Fouillee) यांनीं याच मार्गाचा अवलंब केला आहे. प्रोफेसर फेरिअरचें असें म्हणणें आहे कीं, ऐतिहासिक सत्याचा अतिक्रम करणें हें वाईट आहे खरें; पण एखाद्या पुरातन तत्त्वज्ञाच्या मताचा त्याच्या लक्षांतही न आलेला अर्थ प्रकट करणें, हें एकाअर्थी ऐतिहासिक सत्याचें स्पष्टीकरणच आहे. *

---

* It is bad to violate the truth of history; but the truth of history is not violated, it is rather

परंतु हा मार्ग म्हणजे गूढ रहस्यमय गोष्टींनां लागू पडणारा असला तरी पूर्वग्रहांनीं अदूषित अशा तत्त्वज्ञानविषयक अभ्यासाला अगदीं निरुपयोगी आहे. सॉक्रेटिसची कामगिरी ही साधारणपणें पूर्वतयारीसारखी होती. त्याची योग्यता या गोष्टीनें कमी होते असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं.

उलटपक्षीं कित्येकांचा सॉक्रेटिसच्या पद्धतीवर असा आक्षेप आहे कीं, ती पद्धती खरोखर पहातां विधायक नसून केवळ विध्वंसक मात्र आहे. सॉक्रेटिस हा दुसऱ्यांच्या मताचा अगदीं कीस काढून त्याचा फोलपणा प्रकट करी; पण दुसऱ्याचें ज्ञान फोल ठरल्यावर आपलें स्वतःचें म्हणून सांगण्यास त्याजवळ कांहीं नव्हतें, असें या पक्षाचें म्हणणें आहे. खुद्द सिसेरोचें असें मत आहे कीं, सॉक्रेटिस आपल्या अज्ञानाची नेहमीं जी कबुली देतो, ती केवळ ज्ञानाचा असंभव दाखविण्यासाठींच. आणि ज्या प्लेटोच्या संवादामध्यें सॉक्रेटिसचें तत्त्वज्ञान प्रथित झालें आहे, त्या संवादामध्यें विधायक असें कांहींही नसून त्यामध्यें केवळ दुसऱ्याचीं मतें ऐकून घेण्याचाच प्रकार आढळतो. अलीकडील लेखकांमध्यें ग्रोट या इतिहासकाराचें मत याहून किंचित निराळें आहे. त्याच्या मतें सॉक्रेटिस व सोफिस्ट यांजमध्यें कांहीं विशेष अंतर नाहीं, व जें थोडें फार आहे तें केवळ गौणच. सोफिस्टांविषयीं ग्रोटनें जी तरफदारी केली आहे, तिजमध्यें पुष्कळ ग्राह्य अंश आहे, व अंशाचा स्वीकार करून ' सॉक्रेटिस व सोफिस्ट ' या प्रकरणामध्यें या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे, म्हणून सध्यां हा प्रश्न बाजूला ठेवूं. प्रस्तुत प्रकरणीं सांगावयाची गोष्ट म्हणजे येवढीच कीं, ग्रोटच्या मताप्रमाणें म्हणावयाचें

---

cleared up, when we evolve out of the opinions of an ancient philosopher more than the philosopher himself was consecious of these opinions containing.

( Lectures and Philosophical Remains. )

झाल्यास, प्रचलित मतांचा सदोषपणा दाखविण्यासाठीं सॉक्रेटिस जो कोटिक्रम लढवितो, तो अगदीं थेट सोफिस्टांच्या कोटिक्रमासारखाच आहे. दुसऱ्याच्या मताचा पाडाव करण्यास तो पूर्ण समर्थ आहे; परंतु ज्यावेळीं आपलें स्वतःचें मत सांगण्याचा प्रसंग येई त्यावेळीं ही पद्धत झुगारून देऊन सॉक्रेटिस आपलीं मतें केवळ अधिकाराच्या जोरावर लादावयास पहातो. सारांश, दुसऱ्याच्या मतांची परीक्षा करण्याचा व स्वमत प्रस्थापनेचा सॉक्रेटिसाचा मार्ग परस्पर भिन्न आहे; व त्यांचा एकमेकांचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. सॉक्रेटिस स्वतःचें असें कांहींच शिकवीत नाहीं, असें म्हणण्यापेक्षां तो जें शिकवतो तें शास्त्रशुद्ध रीतीनें शिकवीत नाहीं, हें म्हणणें एका दृष्टीनें जरा बरें वाटलें तरी त्यानें सॉक्रेटिसची वर्तणूक आक्षेपार्हच ठरते. म्हणून या आक्षेपांचा यथानुक्रम विचार करूं.

सॉक्रेटिस हा स्वतःचें असें कांहीं शिकवीत नसे असें जरी गृहीत धरलें, तरी त्याच्या बोलण्याचा एकंदर रोख ज्ञानाचा असंभव सिद्ध करण्यापेक्षां प्रचलित ज्ञानाची सदोषता दाखविण्याकडे होता. वर एका ठिकाणीं सांगण्यांत आलेंच आहे कीं, सोफिस्ट हे, अज्ञान हेंच तत्त्व धरून बसणार होते. सॉक्रेटिस हा अज्ञानासारखें वाईट दुसरें कांहीं नाहीं असें समजून ज्ञानाची महती गाणारा आहे. झेलरनें म्हटल्या-प्रमाणें ज्ञानलालसा ही त्याच्या सर्व कृत्यांच्या मुळाशीं होती, व त्याच्या तत्त्वज्ञानांतील मुख्य कल्पना होती. येवढी गोष्ट खरी कीं, त्याची सत्यज्ञाना-बद्दलची कल्पना इतकी गंभीर होती कीं, आपणास देखील तें ज्ञान आटोक्यांत आणतां येईल कीं नाहीं याबद्दल त्याला शंका वाटे. पण त्या ज्ञानाचा लाभ झाला तरच खरा तरणोपाय आहे, व प्रत्येक मनुष्यानें त्याच ज्ञानाची कास धरली पाहिजे, हें त्याचें अगदीं ठाम मत होतें. याशिवाय सॉक्रेटिसानें स्वतःच्या अशा उपदेशाविषयीं बेफिकीर रहण्याचें कारण असें कीं, प्रत्येक मनुष्याला ज्ञान व्हावयाचें तें त्याच्या अंतर-

प्रयत्नानेंच झालें पाहिजे, असें त्याचें मत होतें. सॉक्रेटिस सारख्याच्या संभाषणानें या अंतरप्रयत्नाला नवीन जीवन मिळालें म्हणजे झालें. आपल्या आत्मसमर्थनपर भाषणामध्यें सॉक्रेटिसनें घोडा व गांधिलमाशी यांचें दिलेलें उदाहरण मोठें मार्मिक आहे. ज्याप्रमाणें गांधिलमाशीच्या दंशानें घोडा आपला सर्व आळस झाडून भरधांव चालतो, त्याप्रमाणें सॉक्रेटिसाच्या भाषणानें श्रोत्याच्या मनाचें आलस्य झडून त्यांचें वास्तविक तेज प्रकट होण्याचा मार्ग खुला होई. घोड्याला जी शक्ती असते ती जशी गांधिलमाशीची नव्हे, त्याप्राणेंच लोकांना उपयुक्त असणारें ज्ञान आपलें नव्हें, अशी सॉक्रेटिसची समजूत होती. हीच कल्पना निराळ्या रीतीनें मांडण्याकरितां सॉक्रेटिस असें म्हणत असे कीं, आपल्या आईप्रमाणें तोही एक तऱ्हेचा सुईणीचाच धंदा करी. अडलेल्या बाईची प्रसूती सुकर करणें, हें जसें शारीरिक सुइणपणाचें काम, त्याप्रमाणें मानसिक सुईणीचें काम म्हणजे सुविचारांची प्रसूती होण्यास अडथळा करणाऱ्या गोष्टी दूर करणें हेंच आहे; व हें काम शिताफीनें कसें करावें हेंच आपण जाणतो असें सॉक्रेटिस म्हणे. विचार प्रसविण्याचें काम सॉक्रेटिसाचें नसून प्रत्येक मनुष्याचें आहे. सॉक्रेटिसाचा उपयोग तो प्रसव सुकर करण्यापुरताच.

सॉक्रेटिसाच्या संभाषणाचा श्रोतृवृंदावर कसा परिणाम होत असे, याबद्दल मेनोनें काढलेले उद्गार सुप्रसिद्धच आहेत. टॉर्पेडो या नांवाचा मांशाला स्पर्श केला असतां ज्याप्रमाणें जोराचे धक्के बसतात, त्याप्रमाणें सॉक्रेटिसच्या संभाषणानें मनाला जबरदस्त धक्के बसत. आपल्या ज्ञानाविषयींचा श्रोत्यांचा गर्व समूळ नष्ट होई व त्यांच्या ज्ञानसंशोधनास खरी सुरुवात होई. आतां ही गोष्ट खरी कीं, ज्यांची ज्ञानतृष्णा बलवत्तर नव्हती, त्यांची ज्ञानशक्ति या हल्ल्यानें जागृत होत नसे, व ते कधींही आपल्या चुका सुधारून पुनः ज्ञानसंपादनाच्या मार्गाला लागत नसत. पण हा दोष सॉक्रेटिसचा किंवा त्याच्या वादपद्धतीचा नाहीं. सॉक्रे-

टिसच्या संभाषणानें ज्यांचा ज्ञानाभिमान झाडून टाकला गेला, परंतु ज्यांची ज्ञानतृष्णा विलयाला गेली नाहीं, व जे पुढें योग्य दिशेला लागून पदवीला चढले अगर सूज्ञ झाले, अशा तरुण पुरुषांचींही उदाहरणें सांपडतील. सॉक्रेटिसच्या वादपद्धतीच्या सयुक्तिकतेचें तें पुरेंसें समर्थन आहे.

सॉक्रेटिसच्या काळीं सदोष मतांचाच विलक्षण गलबला उडाला असल्यामुळें सॉक्रेटिसला त्या मतांचा निरास करण्याच्या मार्गालाच अधिक महत्त्व द्यावें लागलें, ही गोष्ट खरी आहे; परंतु त्यानें सत्यज्ञानाच्या कसोटीला उतरणारे आपले विचार कधीं प्रकटच केले नाहींत. किंवा केले असल्यास त्यांना इतर मतांना लावावयाची कसोटी लागू केली नाहीं, हें म्हणणें अगदीं खोटें आहे. आम्हांस ही गोष्ट कबूल आहे कीं, सॉक्रेटिसनें विचारपद्धतीला लागणारें तर्कशास्त्र पूर्णत्वाला नेलें नाहीं, व त्याची Induction पद्धति अगदीं सर्वांगसुंदर किंवा शास्त्रीयदृष्ट्या पूर्ण नाहीं; परंतु म्हणून त्याची विचारपद्धति शास्त्रविरुद्ध आहे असें मुळींच नाहीं. त्या पद्धतीलाही एक प्रकारची नियमबद्धता आहे, व त्यांतून निष्पन्न झालेली कसोटी सॉक्रेटिसनें आपल्या ज्ञानालाही लावून दाखविली आहे. उदाहरणार्थ आपण झेनोफननें दिलेला एलिसचा हिपिअस व सॉक्रेटिस यांचा संवाद घेऊं. हिपिअसचें असें म्हणणें असें कीं, सॉक्रेटिस हा नेहमीं दुसऱ्याला व्याख्या द्यावयास लाऊन त्याची टर उडवितो; त्यापेक्षां त्यानेंच आधीं व्याख्या द्यावी. व्याख्येचा विषय न्याय्य म्हणजे काय हा आहे. सॉक्रेटिसचें म्हणणें असें आहे कीं, तो जरी शब्दांनीं न्याय्य वस्तूंची व्याख्या करीत नसला, तरी आपल्या प्रत्यक्ष आचरणानें तें दाखवीत आहे; व प्रत्यक्ष कृती ही शब्दां इतकीच किंबहुना जास्त विश्वसनीय आहे. सॉक्रेटिसनें कधीं कोणावर केवळ द्वेषबुद्धीनें फिर्याद केली नाहीं, मित्रामित्रांमध्यें वितुष्ट पाडलें नाहीं, किंवा शांतता भंग करणारी बंडखोरीही

प्रसृत केली नाहीं. मग त्याचें आचरण न्याय्य नाहीं काय ? जें आचरण अन्याय्य नव्हे तेंच न्याय्य, असें म्हणतां येणार नाहीं काय ?

हिपायसचें यावर असें म्हणणें आहे कीं, न्याय्य पथानें जाणारा मनुष्य काय करीत नाहीं हें सांगणें न्याय्य गोष्टींची व्याख्या करतांना गौण-भूतच मानलें पाहिजे. न्याय्यवर्गामध्यें कोणतीं भावरूप कर्में येतात याची कल्पना दिली पाहिजे. सॉक्रेटिस यावर असें उत्तर देतो कीं, कायद्याबर-हुकूम वागणें म्हणजे न्याय्य होय. याचा साहजिक अर्थ असा होतो कीं, संस्थानचे कायदे पाळणें ही न्याय्य गोष्ट आहे; पण संस्थानचे कायदे तर वेळोवेळीं बदलणारे आहेत, मग ते पाळणें न्याय्य कसें होईल? या आक्षेपा-वर सॉक्रेटिसाचें असें उत्तर आहे कीं, शांततेच्या काळीं तटबंदीचा उपयोग नाहीं, म्हणून युद्धकाळींही कोणी त्याची उपेक्षा करतो काय ? एक कायदा सुधारून दुसरा केला म्हणजे कांहीं पहिला कायदा खोटा होत नाहीं. कायद्याप्रमाणें वागणें हें मनुष्याला आपल्या सामाजिक व खासगी आयुष्यक्रमांत अतिशय सुखावह नाहीं काय ? पण कायद्याची कल्पना केवळ संस्थानांतील कायदे येवढीच नाहीं. जे कायदे कोठेंही लिहि-लेले नाहींत, पण ज्यांच्या सत्यत्वाची प्रतीति प्रतिक्षणीं आढळून येत आहे, व ज्यांचें उल्लंघन केलें असतां शिक्षा झाल्याशिवाय कधींही राहत नाहीं, असे कायदे नाहींत काय ? अगम्य गमन किंवा अपेय-पान केल्यास त्याचीं प्रतिफळें मनुष्याला येथेंच भोगावीं लागत नाहींत काय ? या अव्यक्त व स्वयंवेद्य कायद्याचें प्रतिपालन करणें म्हणजेच न्याय्य आचरण होय.

या ठिकाणीं आपणांस हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, या दैविक कायद्याचा जेवढा भाग प्रकट होतो, तेवढयाचाच मानवी कायद्यामध्यें अंतर्भाव होतो, अशी येथें कल्पना असल्यामुळें कदाचित् असा प्रसंग येणें शक्य आहे कीं, एखाद्या मनुष्याची या दैवी कायद्यांतच

इतरांपेक्षां अधिक दूरवर दृष्टी पोंचली असल्यामुळें, त्याचें वर्तन उच्च कायद्याबरहुकूम असताही तें गैरकायदा दिसेल, व तो मनुष्य कायदा मोडतो व कायदा अक्षरशः पाळतो, असें म्हणण्याचा प्रसंग येईल; व असें उदाहरण म्हणजे खुद्द सॉक्रेटिसच होय. आपल्या संस्थानचा कायदा मोडून जीव वांचविण्यासाठीं पळून जाण्याचें नाकारणारा क्रिटोंतील सॉक्रेटिस, व प्रचलित कायद्याला अमान्य असलेलीं मतें प्रसृत करतांनाहीं आपण निर्दोष असल्याबद्दल आत्मसमर्थन करणारा अपॉलॉजीमधील सॉक्रेटिस, या दोन चित्रांत कोणास कांहीं विसंगति वाटल्यास ती केवळ आभासात्मकच आहे.

अशाच रीतीनें आणखी कांहीं उदाहरणें घेऊन सॉक्रेटिसच्या वाद-पद्धतींतील विधायकता स्पष्ट करतां येईल. अरिस्टिपसबरोबर संभाषण करतांना सॉक्रेटिसनें सौंदर्य म्हणजे उपयुक्तता, अशी व्याख्या केली आहे. अरिस्टिपसनें यावर असा आक्षेप घेतला आहे कीं, नानावस्तु सुंदर म्हणून प्रसिद्ध असतात, तरीही त्या एकमेकांहून भिन्न असतात. पण यावर सॉक्रेटिसचें म्हणणें असें कीं, त्यांच्या उपयोगाची दिशा निरनिराळी असल्यामुळें त्या भिन्न भिन्न असणें अपरिहार्यच आहे. उत्तम धांवणारा, उत्तम बॉक्सिंग खेळणारा असेलच असें नाहीं. आत्मसंरक्षण करण्यास उपयोगी पडणारी ढाल शत्रूवर प्रहार करण्यास उपयोगी पडणाऱ्या भाल्यासारखी कशी असेल ? ज्या ज्या उद्दिष्ट कार्याकरितां जें जें उपयुक्त असेल, तें तें त्या कार्य-दृष्टीनें सुंदर व चांगलेंच आहे. केरकचरा वाहण्याची पाटीही सुंदर व चांगली आहे, व अगदीं सोन्याचा भाला पण तोही वाईट आहे, असें त्यांच्या उपयोग किंवा अनुपयोग यावरून म्हणतां येईल.

या ठिकाणीं दिलेली सौंदर्याची उपपत्ति बरोबर असेल किंवा नसेल, पण ती अगदींच वेडेपणाची आहे किंवा त्यांतील विचारदृष्टि अशास्त्रीय

आहे असें म्हणतां येणार नाहीं. सॉक्रेटिसच्या वादपद्धतींतील विधायकता मात्र या उदाहरणांवरून स्पष्ट होत आहे. याखेरीज सॉक्रेटिसची निरनिराळ्या विषयांवरील जीं जीं निश्चित स्वरूपाचीं मतें होतीं त्यांवरून ही विधायकता अधिकच प्रकट होणार आहे, व त्या मतांचा विचार एका स्वतंत्र प्रकरणांतच करावयाचा आहे. त्याच्या आधीं या प्रकरणामध्यें ज्यांचा अनेक वार उल्लेख आला आहे, त्या सोफिस्टांविषयीं योग्य ती माहिती नमूद करून सॉक्रेटिस व सोफिस्ट यांजमधील भिन्नपणाबद्दल विचार करूं, मग सॉक्रेटिसाच्या मतांकडे वळूं.



# प्रकरण ३ रें.

## सॉक्रेटिस व सोफिस्ट.

सॉक्रेटिसच्या चरित्रांतील जे कांहीं मोठे वादग्रस्त मुद्दे आहेत, त्यापैकींच सोफिस्ट या नांवानें प्रसिद्ध असलेल्या लोकांचा व त्याचा संबंध काय होता, हा एक आहे; व या विषयावर उपलब्ध झालेली माहिती संकलित करून या प्रश्नाचा विचार या भागामध्यें करावयाचा आहे.

इंग्रजी भाषेमध्यें सोफिस्ट हा शब्द उच्चारल्याबरोबर त्यांत कांहीं तरी निंदाव्यंजक असावें असें वाटतें. सोफिस्ट या शब्दाच्या दीर्घकाळपर्यंत रूढ झालेल्या अर्थामुळें त्याला हें निंदाव्यंजकत्व आलेलें आहे. सॉक्रेटिसाचा पट्टशिष्य प्लेटो यानें आपल्या संवादामध्यें या सोफिस्टांची जी माहिती दिली आहे, त्यावरून हे सोफिस्ट म्हणजे एक देशाचा उपद्रवच होत, व या उपद्रवानें सर्व ग्रीस देश व विशेषतः अथेन्स, ग्रस्त होण्याच्या बेतांत आलें असतां, केवळ सॉक्रेटिसच्या निःस्पृह शिकवणीनें ग्रीस देश व अथेन्स त्या संकटांतून बचावलें अशी प्लेटोची समजूत होती असें दिसतें. ही गोष्ट देशाला अगर समाजाला अत्यंत हानिकारक अशी प्लेटोची समजूत होती, त्या गोष्टींचें वर्णन करतांना त्यानें नेहमीं निंदाव्यंजक भाषा वापरावी व सोफिस्टांचा जेथें तेथें उपहास करावा, हें अगदीं साहजिक आहे. व त्याप्रमाणेंच प्लेटोच्या ग्रंथांत आपणास आढळून येईल. पेटो जर मनापासून कोणाच्या तिरस्कार करीत असेल तर तो सोफिस्ट लोकांचा व यामुळें त्याला आपल्या टीकेला ते अत्यंत पात्रच वाटत; व त्याकाळच्या परिस्थितीविषयीं माहितीकरितां केवळ प्लेटोवर अवलंबून राहणाऱ्या इतर लेखकांनीं जर

प्लेटोचीच पद्धति उचलली तर आश्चर्य कोणतें? एवढेंच नव्हे, तर ज्याप्रमाणें एखादी आश्चर्यकारक गोष्ट एकापासून दुसऱ्यास माहीत होता होतां तींतील आश्चर्याकारकतेचा भाग प्रत्येक वेळीं अधिक अधिक तिखटमीठ लाऊन सांगण्यांत आल्यामुळें सारखा वाढतच जातो, व सरतेशेवटीं त्या आश्चर्यकारकतेचें स्वरूप जवळ जवळ अशक्यतेपर्यंत जातें, त्याप्रमाणेंच या सोफिस्टच्या निंदेला प्रतिक्षणीं अधिकाधिक जोड मिळत जाऊन नुसतें सोफिस्ट हें नांव उच्चारल्याबरोबर त्या सर्व निंदेचें स्मरण होऊन सोफिस्ट ही संज्ञाच निंदाव्यंजक ठरली आहे.

परंतु सोफिस्ट या शब्दाचा केवळ धात्वर्थ जर पाहूं लागलों तर तो कुशल, चतुर, शहाणा, असा आहे. संकृत अगर मराठी भाषेमध्यें 'पंडीत' हा शब्द ज्या अर्थी वापरण्यांत येतो त्या अर्थींच हा शब्द प्रथमतः वापरण्यांत येत असे; किंवा अलीकडे इंग्रजी भाषेच्या परिचयानें मराठींत रूढ होत चाललेला शब्द 'प्रोफेसर' हा सोफिस्ट शब्दाच्या तोडीचाच आहे. प्राचीन पंडित किंवा अर्वाचीन प्रोफेसर यांजप्रमाणें लोकांनां शिकविणें हा या सोफिस्टांचा धंदा होता, व याबद्दल ते पैसेही घेत. कदाचित् हीच गोष्ट त्यांच्या निंदेला मूळ कारण झाली असेल, परंतु आपणांस त्याविषयीं पुढें विचार करावयाचा असल्यामुळें सध्या त्याजविषयी अधीक न लिहिणें हेंच बरें. वर सांगितल्याप्रमाणें सोफिस्ट म्हणजे बौद्धिक उत्कर्षामुळें प्रसिद्धीस आलेला, व कांहीं वेतन घेऊन आपल्या जवळचें ज्ञान दुसऱ्यास शिकविण्यास तयार असणारा मनुष्य असाच अर्थ त्याकाळीं ग्रीसदेश किंवा अथेन्सशहर याजमध्यें होत असे किंवा नाहीं, हें अजमावून पाहण्यास आपणांजवळ साधन आहे. सोलोन आणि पायथॅगोरॅस हे सोफिस्ट म्हणूनच प्रसिद्ध होते. थॅमीरस हा चतुर शाहीर यालाही सोफिस्ट हीच संज्ञा मिळाली होती. फार कशाला ॲरिस्टोफेनस व एश्चीनीस हे तत्कालीन नाटककार खुद्द सॉक्रेटिसाला देखील सोफिस्टच

म्हणतात. सॉक्रेटिसचे शिष्य ॲरिस्टिपस व ॲंटिस्थेनिस यांना अनुक्रमे ॲरिस्टॉटल् व झेनोफन यांनीं सोफिस्ट हेंच उपपद दिलें आहे. झेनोफननें तर एका ठिकाणीं कांहीं उपदेशपर ग्रंथांत 'जुने कवि व सोफिस्ट यांचे लेख' असा उल्लेख केला आहे. सोफिस्ट लोकांची येवढी निंदा करणारा प्लेटो याला देखील इसाक्रेटीस यानें सोफिस्ट हेंच टोंपण नांव दिलें आहे. आणि अशा रीतीनें विस्तारच करावयाचा म्हटल्यास आणखीही दहापांच तरी उल्लेख दाखवितां येतील. सारांश या सर्व आधारांवरून सोफिस्ट ही संज्ञा मूळची फार व्यापक असून त्यामध्यें खुद्द सॉक्रेटिस, प्लेटो, यांचाही अंतर्भाव होऊं शकतो, व अशा व्यापक अर्थींच ती संज्ञा त्यावेळीं वापरण्यांत येत असे असें दिसतें.

आतां प्लेटोनें सोफिस्ट लोकांची जी टिका केली आहे, त्यामध्यें हा शब्द वरील आर्थांनें तर लागू होत नाहीं. कारण तशा व्यापक अर्थानें तो घेतल्यास प्लेटो हा खुद्द आपल्या गुरूची व आपली स्वतःची देखील निंदा करून घेत आहे असें होतें; पण हें अगदीं अशक्य आहे. मनुष्य एकवेळ आपली स्वतःची निंदा करील, पण आपल्या गुरुची निंदा करण्यास तो एक मूर्ख तरी असला पाहिजे, किंवा वेडा तरी झाला पाहिजे. परंतु प्लेटो हा मूर्ख किंवा वेडा यापैकीं कोणीच नसून उलट मोठा शहाणा, व विचारी तत्त्ववेत्ता आहे. बरें सोफिस्ट या शब्दाचा हा व्यापक अर्थ प्लेटोच्या वेळीं रूढ नसून तो पुढें रूढ झाला असें मानण्यासही कांहीं आधार नाहीं. ॲरिस्टोफेनस याचें 'Clouds' किंवा 'मेघमाला' हें नाटक सॉक्रेटिसच्या द्वेषानें भरलें असेल, परंतु एश्चीनिस व सॉक्रेटिस यांचा तर असा संबंध नव्हता ना? मग तो नाटककार देखील सॉक्रेटिसला सोफिस्टच कां म्हणतो? आतां सॉक्रेटिस सोफिस्ट असून प्लेटो सोफिस्टांवर टीका करीत असेल तर तें दोन पक्षींच संभवतें. एक सॉक्रेटिस व्यापक अर्थानेंहीं सोफिस्ट नव्हता असें म्हटलें तर, किंवा प्लेटोनें सोफिस्टांची निंदा करतांना

तो शब्द संकुचित अर्थानें वापरला असला तर. यापैकीं पहिला पक्ष तर सर्वस्वी असंभवनीयच. कारण आपला स्वतःचा गुरू कोणाला कांहीं शिकवीतच नसे, हें म्हणणें परस्परविरोधी आहे. या वरून प्लेटोनें सोफिस्ट हा शब्द कांहीं संकुचित अर्थानेंच वापरला असावा हें अनुमान दृढ होतें.

प्लेटोच्या मनांतील हा संकुचित अर्थ काय असावा म्हणून पाहूं लागल्यास असें आढळेल कीं, त्यानें तो शब्द सॉक्रेटिसच्या पूर्वीच्या शिक्षकांनां किंवा पडितांनां मात्र लावला आहे. सॉक्रेटिस हा लोकशिक्षक असला तरी सोफिस्टांपासून भिन्न होता, असें दाखविण्याचा प्लेटोचा उद्देश दिसतो. एक इतर सर्व सोफिस्ट आपल्या शिवकणीबद्दल पैसे घेत असत व सॉक्रेटिस मुळींच पैसे घेत नसे; व प्लेटोच्या मताप्रमाणें दुसरा व अधिक महत्वाचा फरक म्हणजे सॉक्रेटिस जें ज्ञान शिकवी तें सत्यज्ञान होतें, आणि सोफिस्टांचें ज्ञान म्हणजे भ्रामक व असंबद्ध होतें. सॉक्रेटिसच्या सत्यज्ञानापुढें सोफिस्टांचा ज्ञानदंभ टिकणें शक्य नव्हतें, हें दाखविण्याकरितां प्लेटोनें आपल्या ‘ संवादांत ’ सॉक्रेटिस व प्रोटॅगोरस इत्यादिक सुप्रसिद्ध सोफिस्ट यांचा संवाद दिला आहे, व त्यामध्यें सॉक्रेटिसाचें वर्चस्व सिद्ध केलें आहे. अरिस्टोफेनससारखे लोक सॉक्रेटिसला सोफिस्ट म्हणत असले तरी सोफिस्ट म्हणून नांवाजलेल्या पंडितांच्या शिकवणीपेक्षां सॉक्रेटिसची शिकवण व विचारपद्धति ही किती भिन्न होती, हें दाखविण्याचा प्लेटोचा विचार असावा, व हें दाखवितांनां सोफिस्टांची निंदा करणें त्याला अर्थातच प्राप्त होतें.

स्वतः प्लेटोनें सोफिस्टांची निंदा कां केली, हें याप्रमाणें उघड आहे; परंतु या निंदेचेंच पुढील ग्रंथकारांनीं फाजील अनुकरण केल्यामुळें सोफिस्ट हें नांवच अर्वाचीन वाङ्मयांत बदू झालें आहे; व या त्याच्या बद्लौकिकाचे शितोडे कांहीं दोषरहित शिक्षकांवरही उडाले आहेत. सॉक्रेटिसची महती गात असतांनांही त्याच्या प्रतिपक्षीयांची अवास्तव

निंदा करणें हें केव्हांही योग्य होणार नाहीं. व म्हणून सोफिस्टांहून सॉक्रेटिस कसा भिन्न होता, हें दाखविण्यापूर्वी सोफिस्टाबद्दल अर्थात् प्लेटोच्या संकुचित अर्थानें—कांहीं माहिती देऊन प्लेटोनें त्यांजविरुद्ध आणलेले आक्षेप कितपत खरे आहेत, याचा उहापोह करूं. म्हणजे सॉक्रेटिसचा व यांचा काय संबंध आहे हें ठरवितां येईल. केवळ प्लेटोच्या आधारावर, सॉक्रेटिस हा सर्वस्वी सोफिस्टांहून भिन्न होता हें मत प्रचलित झाल्यानंतर त्याजविरुद्ध आपलें मत पहिल्या प्रथम हेगेलनें दिलें; व त्यापेक्षां किंचित् निराळ्या रीतीचें उत्तर किंवा विवेचन म्हणजे ग्रोट या इतिहासकाराचें. प्रस्तुत विवेचनांत पुष्कळसा भाग या ग्रंथकाराच्या इतिहासांतील हकीगतीचाच आधार घेऊन लिहिला आहे.

सॉक्रेटिसच्या आधीं व सोफीस्ट लोकांच्याही पूर्वी अथेन्स येथील शिक्षणपद्धति फार संकुचित होती. शरीर सुधारण्याकरितां कसरत व मनास शिक्षण देण्यास संगीत किंवा छंदःशास्त्र ( Music ) हेंच काय ते दोन विषय तीमध्यें येत. आतां येथें संगीत हा शब्द त्याच्या अलीकडील संकुचित अर्थानें न घेतां व्यापक अर्थानें वापरण्यांत येत असल्यामुळें हें शिक्षण प्रथमदर्शनीं वाटतें त्यापेक्षां अधीक व्यापक होत असे. भर्तृहरीच्या ‘ साहित्य-संगीत-कला ’ या त्रयींपैकीं दोन विषयांचा अंतर्भाव एका संगीत शब्दांतच केल्यास तें या शिक्षणाचें स्वरूप होईल. या संगीतविषयामध्यें, सारंगी ( lyre ) कशी वाजवावी, गाण्याला साथ कशी करावी, हेच विषय नसून, कविता कशी वाचावी, कशी टेकावी, व शब्दांचे उच्चार कसे करावे, हेही महत्वाचे भाग असत. ग्रीक भाषेंतील शब्द अधिक विस्तृत, विविधावयवी, व विविधोच्चारण असल्यामुळें हे शब्दांचे उच्चार शिकण्याचें काम महत्वाचें व कठीण असे. हल्लींच्या काळीं फक्त मराठी जाणणारा इसम इंग्रजी शिकूं लागला म्हणजे त्याला इंग्रजी शब्दांचा उच्चार शिकून तो ध्यनांत ठेवण्यास जितके श्रम पडतात, तितकेच ग्रीक लोकांनां आपल्या भाषेंतील शब्दोच्चार

शिकणें अवघड जात असे. संगीत या विषयांत आणखीही कांहीं गोष्टींचा समावेश होत असे. मनुष्यांच्या कल्पना जसजशा वाढत चालल्या तसतसे त्या कल्पना व्यक्त करण्यास नवीन नवीन शब्द उपयोगांत येऊं लागले; व हे शब्द शिकवितांना त्या कल्पना करण्याचें कामही या संगीतशिक्षकांवरच पडलें; व त्यायोगानें संगीतशिक्षकांचें ज्ञान विस्तृत झालें. असें होतां होतां खिस्तीशकापूर्वीं सुमारें पांचव्या शतकांत अथेन्स येथील संगीतशिक्षक नुसत्या शद्वरचनेच्या अगर कवितावाचनाच्या विषयांतच प्रवीण नसून त्यांनां खगोलज्ञान, भूगोलविज्ञान व पदार्थविज्ञान याविषयीं त्याकाळीं प्रचलित असलेली सर्व माहिती असे, व हे विषयही ते शिकवीत असत. आणि या शिवाय त्याकाळीं- उभ्दूत झालेल्या नवीन व महत्वाच्या सामान्य प्रश्नांचा तें उहापोह करीत तो निराळाच. या रीतीनें संगीतविज्ञान हा शब्द व्यापक असे, व संगीतशिक्षक म्हणून नांवाजलेले लोक फार विद्वान् असून त्यांचा मोठ्या, प्रसिद्ध, व राजकारणकुशल पुरुषांशी देखील संबंध असे. पायथोक्लेडीस व डेमन हे संगीतशिक्षक असून ते पेरिक्लिसचेही गुरु होते; व डेमनला तर त्याच्या व पेरिक्लीसच्या प्रतिपक्ष्यांच्या उठावणीनें हद्दपारीचाही प्रसंग सोसावा लागला होता.

या परिस्थितींत संगीतविज्ञान व इतर विषय यांतील विद्वत्तेमुळें प्रसिद्धीस आलेल्या पुरुषांसच सोफिस्ट ही संज्ञा मिळाली. हे सोफिस्टही शिक्षकाचाच धंदा करीत. या ठिकाणीं एक मुद्याची गोष्ट म्हणजे अशी कीं, हे सोफिस्ट कांहीं अंशी संगीतशिक्षकांच्याचप्रमाणें असले तरी त्यांच्या शिक्षणाची एक विशिष्ट दिशा आखलेली होती; आणि ती अथेन्समधील विशिष्ट शासनपद्धतीमुळें अस्तित्वांत आली होती. अथेन्स हें प्रजासत्ताक संस्थान होतें. या राज्यपद्धतींत प्रत्येक वयांत आलेला अथीनियन हा त्या सत्तेचा घटक असे. म्हणजे अथेन्समधील वयांत आलेला प्रत्येक इसम त्या संस्थानांतील कायदे करणाऱ्या व राज्यधोरणा

ठरविणाऱ्या सभेचा सभासद असे. यामुळें प्रत्येक मनुष्याला आपल्या गुणांवर मोठेपणा व सत्ता मिळविण्याची संधी असे व त्याप्रमाणें अगदीं गरीबींतूनही राजकीयसत्तेपर्यंत ज्यांची मजल गेली असे पुरुष अथेन्सच्या इतिहासांत आपणास सांपडतील. मोठ्या हुद्याची जागा देणें न देणें हें सर्व लोकांच्या हातांत असल्यामुळें लोकांचें मन वळविण्याची विद्या जी वक्तृत्व तिचें अशा ठिकाणीं फार महत्व असतें, व राजकीय उलाढालींत पडण्याची ज्याला इच्छा असेल त्याला तें अवश्य साधावें लागतें. अथेन्समधील प्रजासत्तेमुळें अशी उलाढाल करण्याची संधी साधारण योग्यतेच्या मनुष्यासही मिळे; व म्हणून दिवसानुदिवस वक्तृत्वकलेला अधिक मान मिळूं लागला, व विशेषतः श्रीमंत घराण्यांत तर त्याचें अतिशय स्तोम माजलें. याशिवाय या कलेला येवढें महत्व येण्याचें कारण असें कीं, त्यावेळीं कोणावर फिर्याद वगैरे झाल्यास आपला बचाव करण्यासाठीं त्याला स्वतःलाच भाषण करावें लागे. आपल्या तर्फे वकील देण्याची आधुनिक काळांतील सवड त्यावेळीं नव्हती. जर एखाद्याला नीट बोलतां येत नसेल तर एखाद्या वाकबगार वक्त्याकडून भाषण लिहून घेऊन ते कोर्टांत पाठ म्हणणें अशा प्रसंगीं अवश्य होई; आणि या योगानें वक्तृत्वांत वाकब असणाऱ्या माणसास महत्व येई. त्यांतही अथेन्स येथील विशिष्ट परिस्थितीमुळें प्रत्येकास केव्हांतरी कोर्टांत जाण्याचा प्रसंग यावायचाच; मग अशा अडल्यावेळीं एखाद्या वक्त्याची पायधरणी करण्याचा प्रसंग पत्करण्यापेक्षां आपण स्वतःच साधारण वक्तृत्वकलेची माहिती करून घेतलेली काय वाईट ? अशा विचारानें प्रत्येक मनुष्य थोडें फार वक्तृत्व संपादन करीत असे. निदान आपणास सुसंबद्धपणें बोलतां यावें अशी तरी प्रत्येकाची इच्छा असे. वक्तृत्वाला सुसंबद्धता जशी अवश्य, त्याप्रमाणेंच मोहकताही अवश्यच पाहिजे. आपलें बोलणें ऐकून बहुजनसमाज नुसता गार होऊन जावा, व त्यानें आपल्याच मतास दुजोरा द्यावा, अशी प्रत्येक मनुष्याची इच्छा असल्यामुळें

ही सुसंबद्धता व ही मोहकता आपल्या भाषणांत कशी आणावी, हा त्याकाळीं मोठ्या महत्वाचा विषय होता, आणि सोफिस्ट लोकांनीं विशेषतः हाच विषय हातीं घेतला होता. ‘ अथेन्स संस्थानांत विचार कसा करावा, बोलावें कसें, वागावें कसें, ’ हें आपण शिकवितों, असा सोफिस्ट लोक बाणा बाळगीत असत.

या विशिष्ट परिस्थितीमुळेंच इतर विषय मागे मागे पडत चालले. साधारणतः आपल्या भोंवती सृष्टींत चाललेल्या घडामोडीचें गूढ उलगडणें हा तत्त्वज्ञानाचा विषय असतो व त्याप्रमाणें ग्रीक तत्त्वज्ञांनीं आजपर्यंत विचार केला होता. सृष्टींत दिसणाऱ्या विविध वस्तूंच्या मुळाशीं पाणी हें द्रव्य असावें, असा थेल्सचा सिद्धांत होता. ही विविधता अग्नी या एका द्रव्यानें उत्पन्न झाली आहे असा हिरॅक्लिटसचा सिद्धान्त होता. जगतांतील भेद हा अभासमय आहे असें पारमिनाइडस् यानें प्रतिपादित केलें होतें. सृष्टींत चालणारी सुव्यवस्था कधीं एकतानतेच्या तत्त्वावर, तर कधीं विषमतेच्या तत्त्वावर मांडण्यांत येत होती. फार काय पण अगदीं अलीकडे अतिशय उपयोगी व सूचक ठरलेला परमाणुवादही त्यावेळीं माहीत होता; परंतु त्यावेळीं त्याला अर्वाचीन काळांतल्याप्रमाणें फलप्राप्ति मात्र झाली नाहीं. असें कां व्हावें, ही मोठी आश्चर्याची तर गोष्ट खरीच; परंतु त्याकाळीं या गोष्टींनीं मनुष्याचें मन वेधलें गेलें नाहीं येवढें खरें. सृष्टींतील कोडीं उलगडण्यांत व्यर्थ वेळ घालविण्यापेक्षां अधिक निश्चित अशा राजकारणाच्या उलाढाली करण्यांतच मनुष्यांनां अधिक हित वाटूं लागलें. सृष्टीच्या विविधतेच्या मुळाशीं पाणी असो कीं अग्नी असो; किंवा परमाणू असोत. तिच्या मुळाशीं जल आहे, या ज्ञानानें अथेन्समधील कायदे करणाऱ्या सभेचें बहुमत आपल्याबाजूचें करून घेण्यास साधन होणार होतें काय ? तर मग इसॉपच्या गोष्टींतील खगोल निरिक्षकाप्रमाणें आडांत पडून आपलें हसूं करून घेण्यांत काय अर्थ

आहे? दुर्गम व अनिश्चित विषयांचा उगाच कीस काढीत बसण्यापेक्षां राजकारणांतील सुगम व निश्चितफल देणाऱ्या प्रश्नांचाच उहापोह कां करूं नये? सारांश, मनुष्यानें उपयुक्ततेच्या दृष्टीनेंच शास्त्राचा अभ्यास करावा. आम्ही वर दर्शविलेली विचारपद्धति केवळ सोफिस्टांचीच नसून खुद्द सॉक्रेटिसचीही आहे. भूमिति किंवा खगोलविज्ञान या सारख्या शास्त्रांचा अभ्यास फार तर जमिनी मोजणें व गलबतांच्या प्रवासाची दिशा ठरविणें, याला आवश्यक तेवढाच करावा, असें सॉक्रेटिसचें मत होतें. ( The proper study of mankind is man) म्हणजे मनुष्याला अत्यंत विचारणीय असा विषय म्हणजे मनुष्यच आहे, असें सॉक्रेटिसचें मत होतें. सॉक्रेटिसच्या या विचारपद्धतीबद्दल आम्हांस अन्यत्र विवेचन करावयाचें आहे, व त्याठिकाणीं त्या विचारसरणींतील व सोफिस्टांच्या विचार-सरणींतील सूक्ष्म भेद, व त्यामुळें होणारें महत्वाचे परिणाम, हेही स्पष्ट करण्यांत येतील. सध्यां सांगण्याचा मुद्दा येवढाच कीं, ही उपयुक्त-तेची दृष्टी त्या काळीं अगदीं सामान्यच झाली होती, व त्यामुळें लोक-शिक्षणाचे विषय त्या दृष्टीनेंच निवडण्यांत येत असत. वक्तृत्व, भाषा-पटुत्व, व्यवहार नियम, हे शिकवितांना सर्वस्वीच फाटा मिळाला होता असें नाहीं, परंतु इतर विषय साधारणतः गौणच मानले जात असत.

यावरून सोफिस्ट लोक, त्याकाळीं प्रचलित असलेल्या व आवश्यक वाटणाऱ्या विषयांतील नांवाजलेले पंडित असून ते ते विषय शिकविणारे होते असें झालें; परंतु केवळ याच मुद्यावर ते अनीतिमान् होते किंवा दोषी होते असें कसें ठरेल? या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं आपण सध्याची आर्यावर्तांतील स्थिति लक्षांत आणूं. आजकाल प्रचलित अस-लेली विद्या व प्राचीन काळापासून चालत आलेलीं विद्या, यांत किती तफावत दृष्टीस पडतो? प्राचीन काळचे ते चतुर्वेदी, त्रिवेदी, मीमांसक, षट्शास्त्री कोठें गेले; मस्तकावर जटाजूट व अंगावर वल्कलें धारण

करून अमुक इष्टीमध्यें अग्निकुंडाच्या किती व कशा विटा रचाव्या, प्रत्येक प्रकारच्या यज्ञामध्यें विशिष्ट कुंडांचा आकार कसा असावा, इत्यादिक विषयांची चर्चा करणारे ऋषी, ब्रह्मविचारांतच निमग्न झालेले तापसी, व केवळ धर्माभ्यासांत निमग्न असणारे वैखानस, यांचें युग जाऊन आज कित्येक शतकेंचीं शतकें होऊन गेलीं. परंतु अगदीं अलीकडे देखील अवच्छिन्नावच्छेदकांच्या व घटपटाच्या खटपटींत चूर असणारे नैयायिक व मनोरमांत अध्ययन करून खफछटांतच निमग्न झालेले वैयाकरणी, दिवसानुदिवस मागें पडून आधुनिक पद्धतीनें तयार झालेले पदवीधर पुढें आले नाहींत काय ? न्याय व्याकरणाच्या शाळा ओस पडून इंग्रजी शाळा व कॉलेजें जिकडे तिकडे गजबजून गेलीं नाहींत काय ? सध्याच्या काळांतील जरूरीप्रमाणें शिक्षणाचे विषय किंवा दिशा पालटत गेली नाहीं काय ? आणि ती अशी पालटत गेली म्हणून अलीकडील प्रोफेसर म्हणजे अनितिमान व पूर्वीचे ऋषि तवढे नीतिमान असा सिद्धांत निघतो काय ? ऋषि मुनी हे अनेक बाबतींत अलीकडील विद्वान प्रोफेसरांपेक्षां श्रेष्ठ असतील, परंतु हें त्यांचें श्रेष्ठत्व नीतिमत्तेत नसून आत्मिक उन्नति, वैराग्य, शांति, इत्यादि गुणांवर सिद्ध होणारें आहे. मनुष्याच्या गरजा ह्या कालानुसार बदलत जातात, व त्याप्रमाणें मनुष्य आचरण करतो. असें आचरण निश्चयानें अनीतिमानच असेल असें नाहीं. सोफिस्टांचें आचरण किंवा उपदेश तसा होता किंवा नाहीं, हें अद्याप कायमचें ठरावयाचेंच आहे. सध्यां सांगावयाचें म्हणजे येवढेंच कीं, सोफिस्ट लोकांनीं मूळची पद्धती व मूळचे विषय सोडून आपली दिशा पालटली हाच केवळ त्यांचा दोष नव्हे; आणि जर कदाचित् हा त्यांचा दोष असलाच तर स्वतः सॉक्रेटिसही त्या दोषांतून मुक्त होत नाहीं. कारण त्यानें तरी लोकांपुढें निरनिराळे विषय आणून पूर्वीच्या विचारपद्धतींत क्रांति घडवून आणली नाहीं काय ?

सोफिस्टांच्या विरुद्ध प्लेटोचा एक महत्वाचा आक्षेप म्हणजे ते आपली विद्या शिकविण्याबद्दल पैसे घेत हा आहे. आणि त्यांतही अतिशय विद्वान् म्हणून ज्यांची ख्याती असे, असे सोफिस्ट लोक आपल्या शिकवणीबद्दल अधीक पैसे मागत, व त्यामुळें त्यांजजवळ शिकणें हे श्रीमंतांच्याच मुलांनां परवडे. परंतु या वस्तुस्थितीचा लोकांच्या मनावर असा भ्रामक परिणाम होत असे कीं, सोफिस्ट जितका जितका अधिक विद्वान्, तितका तितका तो श्रीमंत लोकांपुढें गोंडा घोळणारा असावयाचाच. परंतु हा समज सर्वस्वी चूक आहे. सोफिस्ट लोक कधींही श्रीमंतांच्या दारोदार भटकत फिरून त्यांचा आश्रय मागत नसत; तर उलट श्रीमंत लोकच अशा सोफिस्टांच्या टपणीवर रहात, आणि कसेंही करून वाटेल तो पैसा घेऊन त्यानें आपल्या मुलास शिकवावें अशी त्याला गळही घालीत. सोफिस्ट लोक पैसे घेतात, ही गोष्ट स्वतः श्रीमंत लोकांनां देखील चमत्कारिक किंवा लांछनास्पद तर वाटत नसेच; परंतु पैसे घेऊन कां होईना, पण हे लोक आपणास बिनमोल विद्या शिकवितात याबद्दल त्यांना उलट मोठी कृतज्ञता वाटे. यावरून जर कांहीं सिद्ध होत असेल तर ते सोफिस्ट लोकांचा हांजीपणा नसून त्यांचें अगाध ज्ञान व जनसमाजाची तें मिळविण्याची उत्कंठा. सोफिस्ट लोक आपल्या विद्वत्तेच्या जोरावर जे पैसे मिळवीत ते पाहून मत्सरग्रस्त इतर पुरुषांनीं, किंवा कमी प्राप्ती होणाऱ्या त्यांच्या व्यवसायबंधूंनीं वेळींअवेळीं त्यांची निंदा केली तर त्यांत मनुष्यस्वभावाविरुद्ध काय आहे ? आपल्याच धंद्यांत आपल्यापेक्षां वरचढ ठरणाऱ्या मनुष्याचे बारीकसारीक दोष काढून त्याचें अवंडबर माजविणें, किंवा दुसऱ्याची श्रीमंती सहन न झाल्यामुळें ती श्रीमंती वाईट मार्गानेंच मिळविली असली पाहिजे, असा सरसहा शेरा मारणें, ही मानवबुद्धीच्या क्षुद्रतेचीं उदाहरणें आहेत.

सॉक्रेटिस किंवा प्लेटो, यांनीं जरी सोफिस्टांची या मुद्यावर थोडीबहुत निंदा केली आहे, तरी ती मत्सरप्रेरित नाहीं, हें उघड आहे;

परंतु त्यांजकडून हा आक्षेप येण्याचें कारण त्यांची भिन्नदृष्टि होय. सॉक्रेटिसचें असें म्हणणें असें कीं, गुरू व शिष्य यांचें नातें म्हणजे मित्रमित्रांतील अथवा प्रणयी युगलांतील प्रेमबंधनासारखेंच आहे, व या प्रेमबंधनाला द्रव्यदृष्टीचा किंचित् स्पर्श होतांच त्याचें पावित्र्य नष्ट होतें. एकमेकांपासून होणाऱ्या आर्थिक लाभाकरितां एकमेकांवर प्रेम करणारे पुरुष ज्याप्रमाणें खरे मित्र नव्हत, किंवा पतीच्या संपत्ती-स्तवच त्यावर प्रेम करणारी स्त्री खरी पतिव्रता नव्हे, किंवा आपल्या श्वशुराकडून मिळणाऱ्या अपरंपार देणगीवरच लक्ष देऊन एखादी कन्या वरणारा पुरुष खरा प्रणयी नव्हे, त्याचप्रमाणें केवळ पैशाखातर शिष्यास विद्या देणारा मनुष्य खरा गुरूही नव्हे. गुरूनें शिष्याजवळून पैसा घेतला म्हणजे तो त्याचा मिंधा होतो, व हा मिंधेपणा म्हणजे एकप्रकारचें प्रच्छन्न दास्यच आहे. त्याच्या योगानें विशिष्ट मार्ग किंवा विशिष्ट विषय अगर विशिष्ट व्यक्ति निवडून पत्करण्याचें गुरूचें स्वातंत्र्य नष्ट होतें. शिष्य गुरूच्या तंत्रानें वागण्याचें एकीकडे राहून त्याच्या पैशानें मिंधा झालेल्या गुरूसच त्याच्या मर्जीप्रमाणें वागावें लागतें. आपलेकडील प्रसिद्ध साधुवर्य रामदासस्वामी यांनीं पैशांकरितां शिष्यांच्या मिंध्या झालेल्या गुरूंची निंदाच केली आहे. समर्थ म्हणतात "एक द्रव्याचे विकिले। एक शिष्यांचे अखिल। ऐसे दुराशेनें केले। दीनरूप ॥ २३ ॥ जे जे रुचे शिष्यांचे मनीं। तैसीच करी मनधरणी। ऐसी कामना पापिणी। पडली गळां ॥ २४ ॥ जो गुरु भीडसारू। तो अधमाहूनि अधम थोरू। चोरटा मैंद पामरू। द्रव्य भोंदू ॥ २५ ॥ (दासबोध द. ५ स. १ ) समर्थांच्या निःस्पृह वाणीचा हा कोरडा सॉक्रेटिसच्या टीके इतकाच जहाल आहे. असे भाडोत्री शिक्षक म्हणजे चोर, ठक, पामर, त्यांच्यामध्यें व यांच्यांत काय सार असणार? सोफिस्ट लोक जर पैसे घेऊन विद्या शिकविणारे, तर मग तेही त्याच पदवीला सर्वथा योग्य ठरत नाहींत काय?

या टीकेविषयीं विचार करतांनां प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, एखाद्या विशिष्ट अवस्थेपेक्षां उच्चतर अवस्था असली म्हणजे ती अवस्था कमी प्रतीची ठरली तरी अनीतियुक्त ठरत नाहीं. भाडोत्री शिक्षकांना निःस्वार्थी शिक्षकांची सर येणार नाहीं, व ते सद्गुरुपदाला नालायक आहेत, ही गोष्ट खरी असली तरी येवढ्यावरूनच ते नीतिबाह्य होत नाहींत. जगांतील सर्व गोष्टी उच्च तत्त्वज्ञानाबरहुकूम चालत नाहींत, व नीति हें व्यवहारसंबंधीं शास्त्र असल्यामुळें त्यांत व्यवहाराला अनुसरूनच निर्णय करावा लागतो. आपल्या देशबांधवांच्या सेवेसाठीं आपलें सर्व जीवित वहाणाऱ्या पुरुषाची योग्यता, देशाची अल्पस्वल्प सेवा करणाराला किंवा देशहितासाठीं थोडीशी पैशाअडक्याची झीज सोसणाऱ्या मनुष्याला येणार नाहीं हें खास; पण यावरून ते पुरुष स्वतः अनीतिमान् किंवा अनीतिप्रेरक कसे होऊं शकतील ? त्यांच्या औदार्याची प्रत कमी धरा, पण कांहीं झालें तरी तें औदार्यच. त्याला अनुदारपणा असें कांहीं खास म्हणता येणार नाहीं. याप्रमाणेंच सॉक्रेटिसासारखें जनसमाजाचे निरपेक्ष शिक्षक सोफिस्टांहून अधिक श्रेष्ठ होत, हें कोणीही कबूल करील; परंतु त्यावरून त्यांची अनीतिमत्ता किंवा अनीतिप्रवर्तकता सिद्ध होत नाहीं. आपल्यापाशीं असलेली विद्या शिकविण्याकरितां पैसा घेणें हें पापकर्म, किंवा अनीतीचें कृत्य असा निर्बंध बांधल्यास दरमहिन्यास लठ्ठ लठ्ठ पगार खाणाऱ्या आधुनिक शिक्षकांस व प्रोफेसरांस यमराजाच्या दरबारांत जबरदस्त शिक्षा झाली पाहिजे ! आणि आजच्या सुधारलेल्या काळीं त्यांची जगांतही छी थू झाली पाहिजे ! पण आजकालचा प्रकार तर त्याहून फार निराळा दिसतो. परंतु हा काय आजचाच प्रकार आहे ? विद्याप्रदानाबद्दल कांहींही मोबदला न मागणें, ही प्राचीन ऋषींची व कुलपतींची पद्धती असे खरी; परंतु विद्या संपूर्ण झाल्यानंतर गुरुदक्षिणा देणें हें शिष्याचें कर्तव्यकर्मच समजलें जात नसे काय ? आतां पुष्कळ

ठिकाणीं, केलेली सेवा मनांत आणून गुरुजन अशा दक्षिणेविषयीं फारसा आग्रह धरीत नसत, ही त्यांच्या औदार्याची व विरक्ततेची गोष्ट आहे; परंतु कोणी विशेष गुरुदक्षिणा घेतलीच तर तें पातक समजलें जात असें काय ? कालिदासाच्या रघुवंशांत वरतंतूचा शिष्य कौत्स याची हकीगत आहे, ती आपण पाहिली तर आपणांस काय आढळून येईल ? कौत्साचा विद्याभ्यास पुरा झाल्यावर घरीं जाण्यापूर्वी गुरूला दक्षिणा देऊन विद्याभ्यासाची सांगता व सफलता साधण्यासाठीं कौत्सानें आपल्या गुरूसच ' मी काय गुरुदक्षिणा देऊं ' म्हणून प्रश्न केला. वरतंतु जात्या विरक्त व शिष्यवत्सल असल्यामुळें त्यानें कौत्साच्या भक्तियुक्त शुश्रूषेचें अभिनंदन करून तीच आपणास पुरेशी दक्षिणा आहे, म्हणून वारंवार सांगितलें; पण कौत्सानें पुनः तोच प्रश्न केला. त्यावेळीं किंचित्क्रोधानें वरतंतूनें सांगितलें कीं, प्रत्येक विद्येस एक कोटि याप्रमाणें चौदा विद्यांकरितां चौदा कोटि द्रव्य आणून द्यावें, तर ती योग्य गुरुदक्षिणा होईल. ही गुरुदक्षिणेची जबर रक्कम ऐकूनही गतधैर्य न होतां कौत्स रघूकडे आला व विश्वजित् नांवाचा यज्ञ करून द्रव्यहीन बनलेल्या रघूनें त्याला आश्वासन देऊन प्रत्यक्ष कुबेरावर हल्ला करण्याची तयारी केली. त्या प्रसंगीं रघूच्या कोषांत द्रव्याचा पाऊस पडला व कौत्सानें तो द्रव्यानिधि शेंकडो सांडणी व घोडे यांजवर लादून गुरुगृहीं नेला, अशी कथा रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत आहे. आतां या गोष्टींत वरतंतूनें कौत्साजवळ जी जबरदस्त गुरुदक्षिणा मागितली, त्याबद्दल त्याजवर कोणी अनीतिमत्तेचा आरोप केला आहे काय ? ती रक्कम त्यानें केवळ रागानें मागितली म्हणून तो दोष नाहीं म्हणावें तर तेंही कठीण, कारण त्यांत तर दोन दोष येतात. एक तर क्रोध व दुसरा शिष्यद्रव्यादान. क्रोधाची एक जोड मिळाल्यामुळें दुसरा दोष नाहीं असें होईल तर क्रोधावेशांत दुसऱ्याचा खून करणें हा तरी दोष कां असावा ! सारांश, विवेकरितां

मोबदला घेणें, ही गोष्ट आपल्या देशांतही प्राचीनकाळापासून अपरिचित नाहीं, व ती पापकारकही कांहीं मानण्यांत येत नाहीं. आजकालच्या प्रोफेसरांनां अगर शिक्षकांनां त्या काळच्या ऋषींची सर येत नाहीं, याचीं पुष्कळ अन्य कारणें आहेत, त्याचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हें.

सोफिस्ट लोक द्रव्यासाठीं जिज्ञासू मनुष्यास अडवून ठेवीत असतील, व याकारणांकरितां मनुष्य आसन्नमरण झाला असतांही आपली फी पिळून काढणाऱ्या वैद्याप्रमाणें अगर डॉक्टराप्रमाणें त्यांचें करणें किळसवाणें होत असेल, असें म्हणावें तर वस्तुस्थिति यापेक्षां निराळीच दृष्टीस पडते; आणि या आमच्या म्हणण्याला आधार सोफिस्टांचा प्रतिपक्षी प्लेटो याच्याच ग्रंथांत सांपडतो. प्रोटॅगोरॅस (Protagoras) या नांवाचा एक नामांकित सोफिस्ट होता व प्लेटोच्या एका संवादाचें नांव याच सोफिस्टाच्या नांवावरून प्रोटॅगोरॅस असेंच आहे. या संवादांत विद्यार्थ्यांकडून विद्येचा मोबदला म्हणून पैसे घेण्यासंबंधीं त्यांच्या परिपाठाविषयीं तो म्हणतो "विद्या शिकविण्यापूर्वीं मी कांहींच नक्की ठराव करीत नाहीं. विद्याभ्यास पुरा झाल्यावर विद्यार्थी मला सोडून जाऊं लागला म्हणजे त्याची परिस्थिति व त्यानें विद्याभ्यासासाठीं मजजवळ घालविलेला वेळ, याचा विचार करून मला योग्य दिसेल ती रक्कम मी त्याजजवळ मागतों. माझें मागणें गैरशिस्त आहे असें त्यास वाटत असेल तर त्यानें स्वतःच मजजवळ केलेल्या विद्याभ्यासापासून त्याला, काय फायदा झाला व कोणत्या रकमेनें त्या फायद्याचा मोबदला केला जाईल, याचा विचार करवा, व आपली रक्कम ठरवावी. मी तेवढीच घेऊन स्वतः समाधान मानीन, अशी सूट ठेविली आहे. याला अट म्हणजे येवढीच कीं, त्यानें देवळांत जाऊन आपला तसा प्रामाणिक विश्वास असल्याबद्दल शपथ वहावी." या प्रोटॅगोरॅसच्या भाषणांत वर्णन केलेल्या

पद्धती इतकी उदार पद्धत क्वचितच आढळत असेल. त्यावरून त्याचा आपल्या विद्यार्थ्यांच्या प्रामाणिकपणावर व स्वतः शिकविलेल्या विद्येच्या उपयुक्ततेवर केवढा विश्वास असे हें स्पष्ट होतें; आणि आपल्या विद्यार्थ्यांनें आपणाशीं नेहमीं कृतज्ञ असलेंच पाहिजे अशी साहजिक श्रद्धा असणें, यासारखें गुरूला दुसरें काय वेतन असेल ? सॉक्रेटिसच्या दृष्टीनें तर तेंच केवळ वेतन होय; परंतु प्रोटॅगोरॅसची वरील हकीगत घेतली तरी त्यांत अनीतिमत्तेची छटा मुळींच दृष्टीस पडत नाहीं; व लोकांना अनीतिमार्गाला नेणाऱ्या पुरुषाचें त्यांत लक्षण नाहीं हेंही तितकेंच निश्चित आहे.

सोफिस्ट लोकांची शिकवण हितकारक असे कीं विपरीत असे, हें ध्यानांत येण्यासाठीं सोफिस्ट या नांवानें प्रसिद्धीस आलेल्या कांहीं व्यक्तींसंबंधी माहिती देऊं. सोफिस्ट लोक हे देखील बहुधा तोंडी शिकविण्यांतच अधिक तत्पर असल्यामुळें त्यांचे ग्रंथ विशेष नाहींत. आणि जें आहेत तेही फारच त्रोटक. त्यामुळें आपणास त्यांजविषयीं इतर ठिकाणांहून जी माहिती होते तीवरच पुष्कळदा अवलंबून राहावें लागतें.

प्रॉडीकस या नांवाचा जो एक विख्यात सोफिस्ट होऊन गेला त्याची "हरक्युलिसाची निवड" ( choice of Hercules ) या नांवाची गोष्ट प्रसिद्ध आहे. आपल्या देशांतील भीम किंवा हनुमान यांच्यासारखीं अचाट कृत्यें करणारा हा एक ग्रीक पौराणिक वीर आहे. वर सांगितलेल्या गोष्टीमध्यें अशी कल्पना केली आहे कीं, श्रम व सुख या देवता आपापल्यापरी हर्क्युलीसला उपदेश करून आपल्याकडे वळवूं पहात होत्या. एकीकडे जिवापाड परिश्रम करून अचाट शक्ती मिळविणें, व देशांतील विस्तीर्ण दलदलीचे प्रदेशही क्षणांत कोरडे ठणठणींत करून देणें, किंवा लोकांनां उपद्रव देणाऱ्या राक्षसवजा क्रूर प्राण्यांनां चुटकीसरशी गतप्राण करणें, व अशा रीतीनें लोकोत्तर शक्तीची कामें करून चिरकाल कीर्ती मिळविणें हें ध्येय होतें, तर दुसरीकडे

जिकडे पहावें तिकडे आनंदच आनंद. सुग्रास अन्न, मृदुल शय्या, मोहक रमणी, यांची या बाजूला नुसती गर्दी उडून गेली आहे. पहिल्या मार्गांत अखेरीस होणारा शक्तिपात हें न्यून, तर दुसऱ्या मार्गांत अखेरीस होणारा शक्तिपात हें न्यून. या दोन मार्गांपैकीं कोणता मार्ग पत्करावा हा हर्क्युलीस पुढें प्रश्न पडला असतां त्यानें पूर्ण विचारांतीं पहिलाच मार्ग पत्करला, व म्हणूनच तो महनीय झाला, असा या गोष्टीचा शेवट आहे. त्याप्रमाणेंच प्रत्येक मनुष्यानेंही सुखलालसा झाडून लोककल्याणाचीं कामें करण्यास अत्यंत अवश्य असें सामर्थ्य कमवावें व अखंड कीर्ति मिळवावी, हा त्यांतील उपदेश आहे. ही गोष्ट म्हणजे प्रॉडीकसच्या भाषणांतील सर्वांत लोकप्रिय भाषण असे, व तिच्या विवेचनप्रसंगीं अधिक श्रोतृवृंद लोटत असे. आज देखील आपणांस ही गोष्ट वाचून अगर ऐकून जर मोठी मौज वाटते, व त्यांतील सदुपदेश करण्याची खुबी पाहून जर आल्हाद होतो, तर हर्क्युलीसशीं ज्यांचा दृढ परिचय आहे अशा ग्रीक श्रोत्यांचीं मनें विशेषतः प्रॉडीकसच्या रसाळ वाणीनें तीच गोष्ट सविस्तर ऐकल्यावर नुसतीं रंगून जात असतील यांत काय आश्चर्य? त्यांतही गोष्टींतील मोहकते-पेक्षां त्यांतील सदुपदेश किती बिनमोल आहे, हेंच तत्त्व तत्त्ववेत्त्यांनीं आजपर्यंत पुनः पुनः प्रतिपादन केलें नाहीं काय? आम्हांस या प्रसंगीं प्रॉडीकसच्या उपदेशावरून दोन स्थळें आठवत आहेत. एक बायरन् कवींतील दोन पंक्ती व दुसरें कठोपनिषदांतील यमाचें वाक्य. लॉर्ड बायरन् लिहितोः—

I slept and found that life was beauty
I woke and found that life was duty."

"मी निद्रावश झालों व सर्व जग मला सौंदर्यमय भासलें, परंतु जागा होऊन पाहातों तों तें कर्तव्यमयच झालें."

या एका अत्यंत प्रतिभासंपन्न कवीच्या दोन पंक्तींत केवढा विस्तृत अर्थ भरला आहे! आम्हांला अधिक परिचयामुळें उपनिषदांतील उतारा

अधिकच बहारदार वाटतो. नचिकेताची परीक्षा करण्याकरितां त्याला निरनिराळ्या प्रकारचीं विलोकनें दाखवूनही तो फसत नाहीं असें पाहून यमराज मोठे खूष होतात, व त्याला शाबासकी देऊन म्हणतातः—

" श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतस्तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ।
श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते प्रेयो मंदो योगक्षेमाद्‌वृणीते ॥
स त्वं प्रियान्प्रियरूपांश्च कामानभिध्यायन्नचिकेतोऽत्यस्राक्षीः ।
नैनां सृङ्कां वित्तमयीमवाप्तो यस्यां मज्जंति बहवो मनुष्याः ॥ "

" हितकर आणि प्रियकर असे दोन्हीही पक्ष मनुष्याकडे येतात. धीर वृत्तीचा मनुष्य त्यांची योग्य छाननी करून हितकर तेंच पत्करतो, परंतु मंदबुद्धि पुरुष केवळ ऐहिक उत्कर्षापकर्षांकडे नजर देऊन प्रियकर तेंच पत्करतो. बा नचिकेता, मोहक व प्रियकर अशा वस्तूंचा, सूक्ष्म परीक्षण करून तूं त्याग केलास. वित्तमय शृंखलेमध्यें इतर लोकांसारखा तूं अडकला गेला नाहींस तेव्हां तुझी धन्य. "

येथें घेतलेली जोडी जरी श्रेयस् व प्रेयस् ही असली, व त्याचा रोख अधिक अध्यात्मपर जरी असला, तरी एकंदरींत त्यांतील पद्धती व सदुपदेश यांशीं प्रॉडीकसच्या गोष्टीची रचना मिळती येते. सुखपक्ष स्वीकारला तर सरतेशेवटीं दुर्बलता मात्र कपाळीं येते, हेंच नचिकेताचेंही म्हणणें आहे. यमाच्या देणगीचा अव्हेर करतांना तो म्हणतोः—

" श्वो भावा मर्त्यस्य यदन्तकैतत्सर्वेंद्रियाणां जरयंति तेजः । "

"हे अंतका, जगतांतील उपयोग मनुष्याचीं इंद्रियें क्षीणबलच करतात."

सारांश, " हर्क्युलिसची निवड " या गोष्टींतील उपदेशाची सत्यता व पद्धतीची मार्मिकता कोणालाही पटतील अशींच आहेत. आणि यावरूनच आधुनिक लेखक प्रॉडीकसला सोफिस्ट लोकांतील अत्यंत निरुपद्रवी सोफिस्ट असें उपपद देत असतात; सोफिस्टांमध्यें तो एक अपवादभूत आहे असें त्यांचें मत आहे. यास्तव प्रॉडीकसविषयीं अधिक कांहीं

न लिहितां आपण दुसऱ्या सोफिस्टांकडे वळूं. त्यांतील मुख्य म्हणजे वर एकदा ज्याबद्दल उल्लेख आला आहे तो प्रोटॅगोरॅस हा होय. या सोफिस्टाबद्दल जर लोकांचा प्रतिकूल पूर्वग्रह नसता तर, केवळ प्लेटोनें दिलेल्या हकीगतीवरून तो अनीतिमान् होता, किंवा नालायक शिक्षक होता असें दिसत नाहीं. प्लेटोच्या प्रोटॅगोरॅस या नांवाच्या संवादांत याला अग्रस्थान देण्यांत आलें आहे. याठिकाणीं सॉक्रेटिसशीं झालेल्या त्याच्या संवादांत, त्याची नीतिमीमांसा निश्चितस्वरूपाची नव्हती, सॉक्रेटिसनें काढलेल्या पुष्कळ संशयांचें त्याला निराकरण करतां आलें नाहीं, व सॉक्रेटिसपुढें त्याचें वादपटुत्व अगदीं लंगडें पडलें, असें दाखविण्यांत आलें आहे. आपल्या कलाकौशल्याला अगर नीत्युपदेशाला मूळाधारभूत तत्त्वें कोणतीं, याचें अज्ञान असल्यामुळें शिक्षकाला जो कमीपणा येणें संभवनीय आहे, तो कमीपणा प्रोटॅगोरसमध्यें होता ही गोष्ट कबूल केली पाहिजे. परंतु हा आरोप एकट्या प्रोटॅगोरसवर येत नसून बहुतेक शिक्षकांवरही येण्यासारखा आहे. प्लेटोसारख्या एखाद्या वादपटूनें प्राचीन व अर्वाचीन नांवाजलेल्या शिक्षकांवर जर प्रश्नांचा सारखा भडिमार चालविला, तर त्यांची प्रोटॅगोरॅस इतकीच किंवा अधिकच धांदल उडेल व त्यांचें वैगुण्य उघडकीस येईल. नीतीचीं मूलतत्त्वें आणि व्यावहारिक नीतिज्ञान किंवा साधारणतः कोणताही व्यवहार किंवा आचरण, आणि त्याला आधारभूत नीति अगर शास्त्र, या उभयतांचें ज्ञान एकवटलें तर तो शुभसंयोगच होय. अशा शुभसंयोगाचें कविजनही गोडवे गातील. त्याच्यायोगानें आपण शिकविलेला व्यवहार अगर आचरण याच्या सत्यत्वाविषयीं संशय उत्पन्न झाला तर तो फेडण्याचें साधन शिक्षकाजवळ जय्यत तयार असूं शकतें, आणि म्हणून प्रत्येक शिक्षकानें आपल्या विषयाला मूलभूत असलेलीं तत्त्वें समजून घ्यावींत, असा जो प्लेटोचा कटाक्ष आहे तो बरोबर आहे. परंतु या गोष्टींचा विचार करून एखाद्या नांवाजलेल्या शिक्षकाचें

त्रैगुण्य दाखवितांना तीन पक्ष संभवतात. ते असेः—( १ ) आपण जे नीतिसिद्धांत सांगतो त्यांच्या मुळाशीं अगदीं खोल कोणतीं तत्त्वें आहेत हें त्याला माहीत नसेल; ( २ ) किंवा त्याचा उपदेश हा खऱ्या मीमांसेनें उत्तमापैकीं ठरणार नाहीं; ( ३ ) किंवा त्याची शिकवण ही निखालस अनीतिकारक असेल. या तीन पक्षांपैकीं प्लेटोच्या दृष्टीनें प्रोटॅगोरॅस हा पहिल्या पक्षांत येतो. त्याची शिकवण कमी दर्जाची होती असें प्लेटोचें मत दिसत नाहीं, व ती अनीतिकारक होती या म्हणण्यास तर प्लेटोमध्यें कांहींच आधार नाहीं. एवढया विद्वान् व नांवाजलेल्या प्रतिपक्ष्याचे दोष दाखवितांनां त्याचे गुणही पाहिले पाहिजेत. या सज्जनपणाच्या साधारण नियमाप्रमाणें प्लेटोनें प्रोटॅगोरॅसचे कांहीं गुणही दाखविले आहेत. उदाहरणार्थ, सद्गुण शिकवून येतात किंवा नाहीं, या प्रश्नाला उत्तर देण्यासाठीं प्रोटॅगोरॅसनें एक कथा सांगितली आहे.

एकाकाळीं सृष्टीमध्यें देव मात्र होते, परंतु मर्त्य प्राण्यांची उत्पत्ति झाली नव्हती. पुढें त्यांचीही निर्मिती होण्याची वेळ आल्यावर देवांनीं पृथ्वी व अग्नी यांच्या अलौकिक संयोगानें पृथ्वीच्या गर्भांत त्यांनां निर्माण केलें; आणि त्यांनां या भूमंडळावर धाडून देण्यापूर्वीं त्यांनां त्यांचे विशिष्ट गुणधर्म देऊन कार्यक्षम करण्याचे कामावर प्रॉमीथियस व एपिमीथियस यांची नेमणूक झाली. या दोन देवांमध्यें परस्पर असा ठराव झाला कीं, एपिमीथियस यानें आधीं गुणविभागणी करावी, व मग प्रॉमीथियस यानें त्यांतील न्यूनाधिक पहावें. याप्रमाणें ठराव झाल्यावर एपिमीथियस आपल्या कामास निघाला; व प्रथमतः तो जनावरें, पक्षी, कीटक, इत्यादि प्राण्यांकडेच गेला. त्यांच्या देहादिकांची रचना लक्षांत घेऊन त्यांनां उपयोगी पडतील, परंतु दुसऱ्यास बाधक होणार नाहींत, असे गुण त्यांनां देऊन प्रसंग विशेषीं दुसऱ्यांकडून उपद्रव पोंचूं लागला तर आत्मसंरक्षण करतां यावें अशीही त्यानें व्यवस्था केली. त्याचप्रमाणें कोणाचा देह अवजड तर मन कमकुवत, कोणाचें शरीर हलकें तर

हवेवर तरंगत रहाण्याच्या शक्तीमुळें निर्भय, कोणाचें बळ कमी तर वेग जास्त, याप्रमाणें गुणांचा न्यूनाधिक भाव करून एकंदर गोळाबेरीज एकच येईल अशी त्यानें युक्ति योजिली. शीतवातादिकांपासून संरक्षण होण्यास जाड कातडीं व लोंकर, रहाण्यास कोठें खोपीं तर कोठें बिळें करण्याची करामत, भक्ष्यासाठीं कोठें फळें तर कोठें मुळें व कोठें इतर प्राणी, अशी योजना करून व आपल्या कौशल्याची मनांत मोठी तारीफ करीत एपिमीथियस पुढें चालला, व सरतेशेवटीं मनुष्याजवळ आला, आणि एकदम खजील झाला. कारण इतक्या वेळांत त्याच्या जवळील गुणांची सर्व पुंजी संपून गेली व मनुष्यास द्यावयास त्याच्या-जवळ कांहींच शिल्लक उरलें नाहीं. ही चूक लक्षांत येऊन तो अगदीं लज्जित झाला. इतक्यांत प्रॉमीथियस हा पहाणी करीत करीत तेथें येऊन पोंचला. इतर प्राण्यांची एपिमीथियस यानें केलेली व्यवस्था पसंत होती, पण मनुष्यप्राण्याची व्यवस्था करण्यास कांहींतरी तोड काढणें अवश्य झालें. कारण त्याचीही भूमंडलावर रवानगी करण्याची वेळ अगदीं नजीकच येऊन पोंचली होती. या अडचणींतून तोड काढण्याकरितां देवांची शस्त्रें वगैरे घडविणारा देव हिफेस्टस व विद्याधिष्ठात्री देवता अथिनी, यांच्या कारखान्यांतून प्रॉमीथियस यानें निरनिराळे हुन्नर व थोडासा अग्नि असा चोरून आणला; आणि तो मनुष्याच्या स्वाधीन करून, आपल्या सर्व उणीवा भरून काढण्यास त्याला समर्थ केलें, व त्याची त्यानें रवानगी करून दिली. अशा रीतीनें आपली उपजीविका करून शरीर-संरक्षण करण्यास अवश्य ती विद्या मनुष्यास प्राप्त झाली. नीतिशास्त्र किंवा अनुशासन धर्म हे मात्र झूसच्या खास ताब्यांत व जागत्या पहाऱ्यांत असल्यामुळें, प्रॉमीथियसला चोरतां आले नाहींत. म्हणून ते मात्र मनुष्यास मिळाले नाहींत. याप्रमाणें प्रॉमीथियस यानें आपली व एपिमीथियसची बाजू राखण्याचा प्रयत्न केला, परंतु एपिमीथियसच्या

आचरटपणामुळें पुढें ही गोष्ट उघडकीस आली, व प्रॉमीथियसला चोरीबद्दल शिक्षा झाली.

इकडे मनुष्याला दैविक शक्ति प्राप्त झाल्यामुळें, त्यानें आपणाशीं समान जे देव त्यांची पूजा करण्यास ठिकठिकाणीं वेदी बांधल्या व परस्परांस आपले विचार कळविण्यासाठीं भाषा शोधून काढिली; तथापि एकंदरींत त्यांची स्थिती मोठी हलाकीचीच होती. इतर प्राण्यांच्या मानानें तो अगदीं हीनबळ होता, व प्रतिक्षणी त्यांच्या जिवाला धोका होता. त्यांना अन्नापाण्याची अगर आस्तरणावरणांची कांहीं कमतरता नव्हती; परंतु दुसऱ्यापासून आपलें संरक्षण कसें करावें हें त्यांस कळेना. इतर प्राण्यांपासून आपला बचाव करावा म्हणून तें शहरांतून एकत्र राहूं लागले. परंतु तेथेंही राज्यपद्धतिज्ञानाच्या व नीतितत्त्वांच्या अभावामुळें त्यांच्यांत अनेक बखेडे पडले. तेव्हां झूसला असें भय पडलें कीं, आपण मोठ्या प्रयासानें उत्पन्न केलेली ही मनुष्यजात समूळ नष्ट होणार! ही आपत्ती टळावी म्हणून त्यानें हर्मीस या दूताला बोलावून त्याजबरोबर न्याय व आदर अथवा प्रेम हीं मृत्युलोकीं पाठविलीं. याप्रसंगीं हर्मिसनें विचारलें कीं, मी ही देणगी सर्वांना देऊं कीं कांहीं विवक्षित व्यक्तींनांच देऊं? या प्रश्नाला झूसनें असें उत्तर दिलें कीं, त्यांचा प्रसार सार्वत्रिक व्हावा; कारण असें झाल्याशिवाय मनुष्य समाजाची रचना व त्याला अवश्य अशी राहणी शक्य नाहीं. येवढेंच नव्हे तर ज्या कोणाला न्याय व प्रेम नको असेल, अगर जो त्यांचा तिरस्कार करीत असेल, तो जगांत राहाण्यास पात्र नाहीं असें समजून त्याला ठार करावें, असा कायदा करावयासही झूसनें त्याला परवानगी दिली.

या सर्व कथेचें तात्पर्य येवढेंच कीं, विविधहुन्नरांची विद्या ही केवळ चोरून आलेली होती, व म्हणून तिचा सर्वच व्यापार चोरटा. ती दुसऱ्याला शिकवून येणें दुरापास्त. पण न्याय, प्रेम, इत्यादि सद्गुण हे देवानेंच मनुष्यांकडे मुद्दाम पाठविलेले असल्यामुळें त्यांचा व्यापार राजरोसपणें

चालतो व म्हणूनच ते एकमेकांस शिकवितां येतात, व कमी जास्त प्रमाणानें ते सर्वांमध्यें आढळतात. या कारणासाठींच जर कोठें सुतार कामासारख्या हुन्नराविषयीं चर्चा चालली असेल तर तेथें भलत्यालाच मध्यें तोंड घालतां येत नाहीं. कारण हुन्नर हा थोड्यांजवळ असतो अशी कल्पना सर्वमान्य असल्यामुळें त्याविषयीं कांहीं ज्ञान नसतां वादविवादांत ढवळाढवळ करणारा मनुष्य उपहासास्पद होतो. तेंच राजकारण किंवा नीति याविषयीं पहा. त्या बाबतींत कांहीं चर्चा चालू असेल तर कोणालाही बोलावयास मुभा असते व एखाद्याचीं मतें कितीही विचित्र असलीं तरी तीं ऐकून ध्यावीं लागतात. कारण न्याय, प्रेम, इत्यादिक सद्गुण प्रत्येक मनुष्यांत थोड्याबहुत अंशानें असतातच. सद्गुण शिकवितां येतील किंवा नाहीं, या सॉक्रेटिसच्या प्रश्नाला कथारूपानें वरील उत्तर देऊन प्रोटॅगोरॅस कांहीं सामान्य मुद्यांवर त्याच गोष्टीचें समर्थन करतो. ते मुद्देही बऱ्याच अंशीं महत्वाचे असल्यामुळें त्यांचा किंचित विस्तार करूं.

सद्गुण शिकवितां येतात, हाच बहुजनसमाजाचा विश्वास आहे; आणि एखाद्याच्या अंगांत तो नाहीं असें त्याचें त्यास वाटलें, तरी तसें कबूल करून उघड उघड बोलण्याचें धारिष्ट त्याच्यानें क्वचितच करवेल. उदाहरणार्थ, वादनकला, चित्रकला, शिल्प, इत्यादि कला; व न्याय, प्रामाणिकपणा, प्रेम, इत्यादिक सद्गुण, यांविषयी विचार करूं लागलें तर आपणांस असें आढळून येईल कीं, एखाद्यानें आपणास चांगलें संगीत येत नसतांना जर त्याची बढाई मारली तर तो मूर्ख ठरतो, व त्याबद्दल त्याची कानउघाडणी होते. परंतु तेंच सद्गुणाविषयीं पहा. प्रत्येक मनुष्याला मी प्रामाणिक आहे असेंच वाटतें, व मी प्रामाणिक नाहीं असें जो म्हणेल तोच मूर्ख ठरून फजितखोर होतो. एखाद्याचा प्रामाणिकपणा कदाचित कमीजास्त प्रमाणांत असेल, पण तो अजीबात नाहींच असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. याचेंच दुसरें प्रमाण असें कीं, मनुष्याच्या हातून कांहीं नैतिक अपराध घडला असता

तर त्याला शिक्षा देण्यांत येते; व या शिक्षा देण्याचा अर्थ सद्गुण हे मनुष्यांत अभ्यासानें व उपदेशानें येणारे आहेत असाच होत नाहीं काय ? ज्याप्रमाणें एखादा पशू त्याच्या शेपटीवर कोणी पाय दिला असतां त्यास मारावयास धांवतो, तशीच केवळ मनुष्याची प्रवृत्ति दिसत नाहीं. त्याला अन्याय ही इतकी अमानुष गोष्ट वाटते कीं, ती त्याला सहन होत नाहीं. त्याचप्रमाणें ही शिक्षा देतांना नुकसानभरपाई हाही उद्देश सर्वकाळ लागू होण्यासारखा नाहीं. एखाद्या चांगल्या मनुष्याचा दुसऱ्यानें खून केला तर त्या खुनी मनुष्यास फांशी दिल्यानें तो खून परत फिरतो काय ? मग अशी शिक्षा करण्यांत नीत्युपदेशाशिवाय काय उद्देश असावा ? या शिक्षेपासून तोच खुनी मनुष्य कांहीं धडा शिकणारा नाहीं व यदा-कदाचित् शिकण्याचा संभव असला तरी कायद्यानें प्राप्त होणारी शिक्षा त्याचें आयुष्यच संपुष्टांत आणीत असल्यामुळें तें त्याला अशक्य होईल; परंतु एका खुनी मनुष्याला जबर शिक्षा झालेली पाहून इतर मनुष्यांनां वचक बसतो, व त्यामुळें खुनाचे अपराध कमी होतात. कोणाचा खून करूं नये, ही गोष्ट जर मनुष्याला समजवून समजणारी नसेल, तर हा सर्व प्रकार अनुचितच ठरेल. जसें शिक्षेचें तसेंच बक्षिसांचें. सद्गुणांनां उत्तेजन देऊन त्यांची वाढ करावी हा त्यांचा उद्देश सद्गुण शिकवून येत नसते तर विफलच झाला असता.

मनुष्य प्राण्याचें नीतिशिक्षण अगदीं बाळपणापासूनच सुरू होतें. मुलावरील वात्सल्यामुळें आईबाप किंवा वडील माणसें लहान मुलांनां अल्पस्वल्प गोष्टींत देखील तरबेज करण्याचा सारखा प्रयत्न करीत असतात. मग सद्गुणांसारख्या अत्यंत महत्वाच्या गोष्टींबद्दल त्यांच्याकडून हेळसांड होईल काय ? मुलाला बोलतां येऊं लागण्याची सुरवात, कीं, आईबाप, भाऊबहिणी, हीं त्याला अमुक चांगलें, तमुक वाईट, हें शिकवीत असतात. फार काय पण मुलाला निजवितांनां म्हटल्या

जाणाऱ्या ओव्यांत देखील असा उपदेश आढळतो. मुलाला नीतिशिक्षण देण्याच्या आस्थेबद्दलच हें स्पष्ट लक्षण नव्हे काय? मूल जरा मोठें झालें म्हणजे आईबापांना आणखी शिक्षकाचीही मदत घ्यावीशी वाटते, व हें खर्चाचें काम असतांही पत्करलें जातें. शिक्षकांच्या शिकवणीपासून कांहींच फायदा होत नसेल तर इतका पैसा खर्च करून शक्य तितका उत्तम शिक्षक मिळविण्याची पालकांनीं खटपट केली असती काय? बरें, मनुष्य वयांत आल्यावर तरी त्याचें शिक्षण संपतें काय? देशाचे कायदे त्याला शिक्षण देऊन सुधारण्याचा पत्कर घेतात, व हा कायद्याचा अमल मनुष्याच्या अगदीं मरणापर्यंत चालतो. यावरून मनुष्य हा जन्मल्यापासून मरेपर्यंत सारखा शिकतच असतो असें म्हणतां येणार नाहीं काय? व मनुष्याला शिकवून सद्गुणसंपन्न करतां येत नसतें तर हें सर्व अनाठायीं ठरल्यामुळें थोड्या अनुभवांतीं तरी बंदच पडलें नसतें काय?

येथें कदाचित् अशी शंका येईल कीं, सद्गुण जर शिकवून येणार आहेत व आईबाप व वडील माणसें ते शिकविण्यांत जर नेहमीं तत्पर असणें साहजिक आहे, तर मग चांगल्या माणसांचींही मुलें कधीं कधीं वाईट का निघतात? याला उत्तर येवढेंच कीं, त्यांत आश्चर्यकारक अथवा अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. कारण सद्गुण हा सामान्यनिधिभूत असून प्रत्येकजण आपल्या सामर्थ्याप्रमाणें त्यांतील भाग घेत असतो. आईबाप किंवा वडील माणसें हींच केवळ त्या मुलांचीं शिक्षक राहत नाहींत; कारण जगांतील सर्वच माणसें एकमेकांस सद्गुण शिकवितात किंवा निदान तसा प्रयत्न करतात. तेंच एखादें कसब घ्या, त्यामध्यें प्रत्येकजण आपल्या प्रत्यक्ष विद्यार्थ्यापासून देखील कांहींतरी लपवून ठेवावयास पाहतो. अत्यंत सद्गुणी माणसांचीं मुलें तितकींच सद्गुणी कां नसतात? याचें कारण वरील विवेचनांत आलें आहे. तथापि समजूत पटण्यास आपण एक उदाहरण घेऊं. समजा कीं, प्रत्येकाला ज्याप्रमाणें

न्याय, आदर, इत्यादि गुण नसतां समाजघटना होत नाहीं, त्याप्रमाणें आज एक नियम असा झाला कीं, प्रत्येकाला मुरली वाजविता आली तरच असा समाज बनेल. आतां या मुरली वाजविण्यासंबंधें काय प्रकार होतो पहा. प्रत्येकाला थोडीफार मुरली वाजवितां येणारच व ज्याला ती किंचित् कमी येते असें एखाद्याला वाटेल, त्याला त्याजबद्दल उपदेश करावयाला तो अगदीं एका पायावर तयारच. हल्लीं ज्याप्रमाणें कोणी कोणापासून आपला प्रामाणिकपणा लपवूं पहात नाहीं, त्याप्रमाणेंच आपली वादनकला कोणी लपविणार नाहीं. व जो तो दुसऱ्याला तेंच शिकवीत सुटेल. अशा परिस्थितीमध्यें एखाद्या मुरलीवादनांत पटाइत असलेल्या मनुष्याचा मुलगा त्याच्यासारखाच होईल असें सांगता येत नाहीं; परंतु तो त्या गुणाला अगदीं पारखा होणार नाहीं हें खास. सारांश, सद्गुणी माणसें आपल्या मुलांबाळांनां कितीही शिकवीत असलीं तरी त्यांचे स्नेहीसोबती, त्यांचे शेजारीपाजारी, त्यांचे आप्तइष्ट, हेही त्यांना उपदेश करतातच; आणि अशा उपदेशाच्या नुसत्या पुरामध्यें आपणांस सुलभ व शक्य तोच भाग मनुष्य ग्रहण करतो; व म्हणून तो आपल्या आईबापाशीं प्रसंगविशेषीं विसदृशसा भासतो, परंतु तो अगदीं सद्गुणहीन असा नसतो. कारण त्याजपेक्षांही कनिष्ठ प्रतीच्या रानटी लोकांत तो मोठाच सद्गुणी ठरेल; आणि म्हणूनच सद्गुण शिकवितां येत नाहींत हें म्हणणें खोटें आहे. उलट वर सांगितल्याप्रमाणें प्रत्येक मनुष्य दुसऱ्याला नेहमीं शिकवीतच आहे. त्यांत प्रोटॅगोरॅससारखा एखादा मनुष्य इतरापेक्षां अधिक चांगलें शिकवूं शकतो येवढेंच; व त्याकरितांच त्याचा विशेष गौरव. नित्य व्यवहारानें मुलांस समजूं लागणारी मातृभाषा अमक्यानेंच शिकविली असें म्हणतां येणार नाहीं. तथापि आपण त्या त्या भाषेतील पंडितांना ती अधिक चांगली शिकवितां येते, याबद्दल मान देत नाहीं काय ? माझी शिकवणूक उच्चतम नसेल, पण ती इतरापेक्षां बरी आहे हें

समाधानाला पुरेसें कारण आहे; आणि माझी शिकवण अधिक चांगली आहे, हे विद्यार्थ्याला स्वानुभवानें कळल्याखेरीज मी त्याजवळून एक कपर्दिकही घेत नाहीं, हें महशूरच आहे.

वरील सर्व विषय प्रोटॅगोरॅस इतक्या मोहक शब्दांनीं प्रतिपादन करीत होता कीं, त्याचे भाषण संपल्यावर देखील सॉक्रेटिसच्या कानांत तोच ध्वनी दुमदुमत होता; व मृच्छकटिकांतील चारुदत्ताप्रमाणें "यत्सत्यं विरतेजवि गीतसमये गच्छामि शृण्वन्निव" अशी त्याचें खुद्द प्लेटोच्याच ग्रंथांत वर्णन आहे. ही गोष्ट खरी कीं, वरील उपपत्ती सांगितल्यानंतर सॉक्रेटिसनें आपल्या विशिष्ट पद्धतीप्रमाणें प्रश्नांचा भडिमार सुरू केला, व त्याबरोबर प्रोटॅगोरॅस हा गोंधळून गेला. सद्गुण एक आहे कीं अनेक आहेत, ते ज्ञानस्वरूप आहेत कीं अज्ञानस्वरूप आहेत, या प्रश्नांची त्याला समाधानकारक उत्तरें देतां आलीं नाहींत; परंतु यावरून एकच गोष्ट निष्पन्न होते कीं, सॉक्रेटिस हा त्याच्यापेक्षां कोटिक्रम करण्यांत अगर सद्गुणाच्या शुद्ध स्वरूपाचें सूक्ष्म व सूक्ष्मतर विवेचन करण्यांत अधिक प्रवीण व म्हणून अधिक स्तुत्य होता. पण यावरून प्रोटॅगोरॅस एकंदरींत मूर्ख होता किंवा त्याची शिकवण अनीतिकारक होती, असा निष्कर्ष निघत नाहीं; व खुद्द प्लेटोचेंही तसें मत दिसत नाहीं.

प्रोटॅगोरॅसच्या शिक्षणाचें मुख्य स्वरूप म्हणजे आपल्या घरगुती गोष्टींत दूरदर्शीपणानें कसें वागवें आणि सर्व संस्थानाच्या हितासाठीं समाजामध्यें कसें परिणामकारक भाषण करावें व उपयुक्त कार्य घडवून आणावें, हें होतें. व्यापक व उपयुक्त अशा सामान्य शिक्षणाचें स्वरूप यापेक्षां कमी शब्दांत पण तितकेंच स्पष्ट व्यक्त करणें फार कठीण आहे; परंतु हें स्वरूप प्रोटॅगोरॅसनें आंखलें आहे म्हणूनच तें कित्येकांस दोषास्पद वाटतें. वास्तविक पहातां सॉक्रेटिस किंवा त्यानंतरचा इसॉक्रेटिस यांचा शिक्षणक्रमही याच उद्देशानें ठरविलेला असे; परंतु सोफिस्टांचें सगळेंच वाईट असा पूर्वग्रह करून घेतल्यावर प्रोटॅगोरॅसचे गुण दिसूं नयेत यांत

आश्चर्य काय? प्रोटॅगोरॅसच्या शिक्षणाचें स्वरूप तर अनीतिमान नव्हतेंच, पण त्यानें सद्गुणाविषयीं जी उपपत्ति दिली आहे, त्यांत देखील आपणांस पुष्कळ ग्राह्य भाग आढळेल. याच संवादांत सॉक्रेटिस म्हणतो कीं, सद्गुण म्हणजे आपल्या सुखदुःखांचें बरोबर मोजमाप करणें होय. परंतु केवळ व्यक्तिविषयक सुखावर सद्गुणाची इमारत रचण्यापेक्षां सर्व समाजाचेंच सुख ज्यावर अवलंबून असतें, तो सद्गुणी असें प्रतिपादन करणें कमी प्रतीचें आहे काय? प्रोटॅगोरॅसच्या उपयुक्तता-दृष्टीची टकळी करून तीच दृष्टी किंचित निराळ्या शब्दांत सॉक्रेटिस कडून व्यक्त झाल्याबरोबर तिची स्तुति करणें, हा तरी एक मनुष्याच्या प्रेमांधतेचा मासलाच म्हणावयाचा !

असो, प्रोटॅगोरॅसबद्दल येवढी माहिती पुरे आहे. आतां सोफिस्टांपैकीं तिसरा हिपियस ( एलिसचा ) याजविषयीं प्लेटोच्या ग्रंथांवरून काय माहिती मिळते ती पाहूं या. सोफिस्टाचा संबंध वरील प्रेटॅगोरॅसच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या संवादांत व " हिंमियल मोठा व धाकटा " या संवादांत आला आहे. हिपियसला आपण विविध विज्ञानांत पारंगत असल्याबद्दल मोठा गर्व असे. खगोल विज्ञान, भूमिती व गणीत, हीं तो शिकवीत असे; व याविषयांचें अध्ययन करण्याबद्दल तो विद्यार्थ्यांनां जी सक्ती करी, तिजबद्दल प्रत्यक्ष प्रोटॅगोरॅसनेंच त्याला दोष दिला आहे. तो स्वतः कवी, संगीतज्ञ व टीकाकार असे, आणि नीति व राजकारण इत्यादि गहन विषयावर व्याख्याने देऊन त्यांवर ग्रंथरचना करी, येवढी त्याची स्मरणशक्ती दांडगी असे. याशिवाय त्यानें वकिलातींतही पुष्कळ काम केलें होतें. व सर्वांत अधीक महत्त्वाचें म्हणजे तो निरनिराळीं कळाकुसरीचीं कामें देखील करूं शके हें होय. आपल्या अंगावरील सर्व कपडे व दागदागिने स्वतः तयार केल्याबद्दल तो सांगतो. सारांश, आल्या गुणबाहुल्याच्या डौलांत तो असल्यामुळें प्लेटोनें त्याची यथास्थित चेष्टा केली आहे, व सोफि-

स्टाची चेष्टा करावी तेवढी थोडी, असें म्हणणारांनींही प्लेटोनें चेष्टेचा अतिरेक केला, असें म्हणाण्याची पाळी आली आहे. एकाद्या मनुष्याला आपल्या विविधगुणांबद्दल डौल, अभिमान, गर्व, असणें संभवनीय आहे; पण पुष्कळदां असा डौली मनुष्यही समाजाच्या मोठा उपयोगी पडतो, व तो नेहमीं दुर्गुणीच असतो असें नाहीं. प्लेटोनें देखील हिपियसवर अनीतिमत्तेचा आरोप आणलेला नाहीं. उलट हिपियस तयार करीत असलेल्या एका व्याख्यानाच्या रूपरेखेचें जें प्लेटोनें वर्णन दिलें आहे, त्यावरून हिपियसच्या शिक्षणाचें चांगलें स्वरूपच पुढें येतें. ट्रॉय शहर पडल्यावर निओटॉलीमस यानें ग्रीक योध्यांतील सर्वांत शहाणा जो नेस्टर, त्याला आपण पुढें कसें वागावें म्हणून प्रश्न केला असतां नेस्टरनें त्याला काय उपदेश केला, व महत्वाकांक्षी तरुणानें आपलें आयुष्य कसें घालवावें याजविषयीं काय सामान्य नियम सांगितले, हें प्रतिपादन करणें हा हिपियसच्या व्याख्यानाचा विषय आहे. नेस्टर आणि निओटॉलीमस ह्या प्रख्यात गुरुशिष्यांच्या जोडीचें नांव ऐकल्याबरोबरच हिपियसनें त्यांच्या तोंडीं घातलेला संवाद किती उच्च कल्पनांनीं भरला असला पाहिजे हें समजतें. नेस्टरची शिकवण ही अथेन्सच्या दृष्टीनें फार उच्च किंवा अव्यवहार्य असेल, पण तेवढ्यावरून हिपियस अनीतिमान कसा ठरेल? सारांश, हिपियसचें व्याख्यान प्रॉडीकसच्या ‘ हर्क्युलीसची निवड ’ या गोष्टीच्या जोडीलाच बसण्यासारखें आहे, व हिपीयसही नीतिशिक्षक या दृष्टीनें सर्वस्वीच उपहासास पात्र नाहीं.

“ गॉर्गिअस ” या नांवाच्या प्लेटोच्या संवादांतील खुद्द गॉर्गिअस हा एक नामांकित सोफिस्ट होता; परंतु वास्तविक पाहतां त्याला ही पदवी योग्य नव्हती. त्याचा विषय म्हणजे भाषेतील अलंकार किंवा वाक्पाटव होतें; व म्हणून त्याला आलंकारिक हें नांव अधिक शोभतें. गॉर्गिअस हा सिसिलीमधील लिऑंटिनी शहराचा रहिवासी होता. ख्रिस्तापूर्वी ४२७ या वर्षीं तो आपल्या शहरातर्फे वकील म्हणून प्रथम

अथेन्स शहरीं आला; व या कारणास्तव त्याचा संबंध कालानुक्रमानें पहातां प्रोटॅगोरॅसनंतर येतो; परंतु यावरूनच त्याचें वय प्रोटॅगारॅसपेक्षां कमी होतें असें समजूं नये. त्यानें एंपिडोक्लिसच्या मतांचा अभ्यास केला होता, व आपल्या वृद्धापकाळीं देखील थेसलीमधील लॅरीसा गांवीं एकांतवास करीत असतां, तो त्या मतांचा उपदेशही करीत असे असें दिसतें. परंतु वर सांगितल्याप्रमाणें त्याची विशेष प्रसिद्धि तत्त्वज्ञ किंवा सोफिस्ट या नात्यानें नसून ती आलंकारिक या नात्यानेंच आहे. पेलॉपोनीससच्या युद्धाचा शेवट व पेरिक्लिसचा अंत, यामुळें अथेन्स येथील राजकारणांमध्यें जी गडबड उडाली होती, आणि सामान्य लोकपक्ष व श्रीमान्वर्ग यांजमध्यें जो बेबनाव सुरू झाला होता, त्यामुळें वक्तृत्व गुणाला विशेष तेजी होती, व गॉर्गिअस हा सिसिली देशांत उत्पन्न झालेल्या तत्सदृश प्रसंगीं उदयास आलेल्या वक्तृत्वकलेंत निष्णांत असल्यामुळें त्यानें ती पद्धती शिकविण्यास अथेन्स येथें सुरवात केली. त्याची दृष्टांत देण्याची शैली, त्याच्या भाषणांतील अलंकारप्रचुरता व ललितपदविन्यास, याच्या योगानें अथेन्समध्यें एक वक्तृत्वाची नवीच लोकप्रिय तऱ्हा निघाली असें म्हटल्यास हरकत नाहीं. सॉक्रेटिसचा गॉर्गिअस विरुद्ध हाच मुख्य आक्षेप आहे, व तो गॉर्गिअसप्रमाणेंच सर्व आलंकारिकांना लागू पडण्यासारखा आहे. आपल्या श्रोत्यांना सत्यज्ञान व्हावें म्हणून प्रयत्न करण्याचें बाजूस ठेऊन त्यांच्या अज्ञानाचा उलट फायदा घेऊन त्यांच्या चंचल मनोवृत्ती अधिक उचंबळवणें, किंवा तोंडदेखलें स्तुतिस्तोत्र गाऊन त्यांना हरभऱ्याच्या झाडावर चढवणें, हेंच असल्या वक्त्यांचें कसब असल्यामुळें तें उपहासास्पद आहे, असें सॉक्रेटिसचें म्हणणें आहे; तथापि येवढ्या एका गोष्टीवरूनच गॉर्गिअस हा अनीतिमान होता असें होत नाहीं. त्याची एकंदर वर्तणूक मोठी उदारपणाची व सभ्यतेची दिसते, व खुद्द साक्रेटिसही त्याजबरोबर बोलतांना आदरानेंच बोलत आहे असें वाटतें. प्लेटोनें गॉर्गिअसला इतक्या आदरबुद्धीनें

वागवावें हें पुष्कळ टीकाकारांना आश्चर्यकारक वाटतें; परंतु त्याचा शांत स्वभाव, त्याचें विद्वत्त्व व वृद्धत्व ही लक्षांत घेऊन, व त्याचें शिक्षण निराळ्या दिशेचें असलें तरी तो स्वतः अनीतिमान् नव्हता यामुळें, सॉक्रेटिसही त्याजजवळ इतका आदरानें वागला असावा यांत आश्चर्य काय?

त्याच संवादांत पोलसबरोबर भाषण सुरू झाल्याबरोबर मात्र हा सारा रंग पालटतो. पोलस हाही गॉर्गिअसप्रमाणेंच अलंकारिक लेखक व शिक्षक होता; परंतु तो एकंदरींत मोठा उर्मट असल्यामुळें त्याजबरोबर भाषण करतांना सॉक्रेटिसनेंही अतिशय तीक्ष्ण भाषा वापरली आहे. प्रस्तुत प्रसंगीं पोलसनें आपल्या स्वतःच्या, त्यावेळच्या प्रसिद्ध पुरुषांच्या, व एकंदरींत अथीनियन लोकांच्या अभिरूचीचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे, व केवळ आपल्या कोटिक्रमाच्या जोरावर सॉक्रेटिसानें आपलें स्वतःचें म्हणणें त्याला कबूल करावयास लावलें आहे. परंतु यास्थळीं या सर्वांचा विचार करण्याची जरूरी नाहीं. पोलसची अभिरुची सॉक्रेटिसच्या अभिरुचीहून निराळी होती म्हणजे कांहीं तो अनीतिमान् होता असें होत नाहीं, कारण रुचिवैचित्र्य व नीतिमत्ता यांचा कांहीं असा निश्चित संबंध नाहीं; कालिदासाचें ' भिन्नरुचिर्हि लोकः ' हें वाक्य सर्वांस अवगतच आहे.

याच संवादांतील सॉक्रेटिसचा पुढील प्रतिपक्षी जो कॅलीक्लीस त्याचीं मतें मोठीं विघ्नकारक व समाजस्थितिविघातक आहेत यांत कांहीं संशय नाहीं. कॅलीक्लीजच्या मतें सृष्टीचा कायदा व मनुष्यकृत कायदा यांत मोठा भेद आहे. येवढेंच नव्हे तर ते परस्पर विरुद्ध आहेत. सृष्टीमध्ये पाहिलें तर शारीरिक सामर्थ्य हेंच अधिकाराचें मूळ कारण आहे; ( Might is right ). परंतु समाजामध्यें पुष्कळ दुर्बळ लोक एकत्र होऊन केवळ आपल्या मतलबासाठीं एकाद्या सबळ मनुष्याला निर्बंध घालतात व तोही अज्ञानामुळें कांहीं काळपर्यंत त्या निर्बंधाला बळी पडतो हा कॅलीक्लीजच्या बोलण्याचा मथितार्थ आहे. रानटी अवस्थेमध्यें मनु-

ष्यांमध्येंही हाच नियम दृष्टोत्पत्तीसही येतो; परंतु सुधारलेल्या राष्ट्रांमध्येंही हाच नियम लागू करूं पाहणें व एकाकाळीं अधिकतम समर्थ पुरुष एखाद्या जातीचा अधिपति होत असे म्हणून आजही केवळ शरीरानें धिप्पाड व रीसासारखा क्रूर पुरुष जर देशाच्या गादीवर हक्क सांगू लागेल तर केवढा अनर्थापात होईल ! सामाजिक जीवनांतील सुख-समाधान व जीविताची शाश्वतता हीं एका क्षणांत नाहींशी होऊन मनुष्यसमाज म्हणजे हिंस्र श्वापदांचें एक मेसूर आगरच बनून जाईल, व प्रतिक्षणी जाळपोळ, मारहाण, यांचा एकच हलकल्लोळ उडेल. आजच्या सुधारलेल्या अवस्थेंतीलही एखादा सामर्थ्योन्मत्त पुरुष पुढें सरसावतो व सर्व नीतिनियम किंवा कायदेकानू धाब्यांवर बसवितो, तेव्हां केवढा अनर्थ होतो ? मग हीच पद्धति सर्वांनीं स्वीकारली व भगवद्गीतेंतील आसुरीवृत्ति हीच केवळ अस्तित्वांत राहिली, तर मग त्या अनर्थ परंपरेचा काय हिशोब सांगावा ? कॅलीक्लीसचें मत हें अतिशय अनर्थकारक व अनीतिप्रवण आहे, व त्याबद्दल सॉक्रेटिसनें त्याला फजीत केलें व त्याची खरडपट्टी काढण्यांत दयामाया ठेविली नाहीं, हें अत्यंत युक्तच होय. परंतु कॅलीक्लीसच्या मतावरून एकंदर सोफिस्टांना दूषण देणें बरोबर होणार नाहीं. कारण कॅलीक्लीस हा सोफिस्ट नव्हता व त्याचीं मतें सोफिस्ट कधींही प्रतिपादित नसत. ज्यांचें स्वतःचें अस्तित्वच संघटित समाजस्थितीवर अवलंबून आहे; त्या आपल्या श्रोतृवंदाची नाराजी करण्यापेक्षां त्यांची खुशामत साधण्याचाच ज्यांचा क्रम आहे, आणि ज्यांचा श्रोतृवृंद लोकसत्ताक राज्यपद्धतीविरुद्ध काढलेल्या अल्पस्वल्प आक्षेपांनींही चिडून जाणारा आहे, तेंच सोफिस्ट कॅलीक्लीसच्या मताचें उघड उघड प्रतिपादन करतील हें तर सर्वथा अशक्यच आहे.

प्लेटोनें आपल्या 'रिपब्लिक' नांवाच्या ग्रंथांतील पहिल्या भागांत थ्रॅसिमॅकसचीं म्हणून जीं मतें दिलीं आहेत. त्यांनांही वरील विवेचनच लागू पडतें. थ्रॅसिमॅकस हाही विशेषतः आलंकारिक या नात्यानें प्रसिद्ध

होता; व लोकांच्या आश्रयावरच त्याचेंही जीवन अवलंबून असल्या-मुळें प्लेटोनें त्याच्या नांवावर लादलेलीं मतें त्याचींच असतील, व असलीं तरी तीं तो प्रतिपादन करीत असेल हें शक्य नाहीं. थ्रॅसिमॅकसकडून उच्चारविलेलीं मतें कॅलीक्लीजच्या मतांहून किंचित् भिन्न आहेत. आहे हीच समाजस्थिति गृहीत धरून, त्यांतील कायदे किंवा नीतिनियम यांची मीमांसा करावयाची असल्यास आपणांस असें म्हणावें लागेल कीं, एखादा मनुष्य न्याय आचरण करतो तें त्याच्या स्वतःच्या फायद्याचें नसून दुसऱ्याच्या फायद्याचें असतें. आपल्या स्वतःच्याच फायद्यापुरतें पाहिलें तर मनुष्याला अन्यायाचरणच करावेसें वाटेल; परंतु केवळ दुर्बळपणानें तो अधिक सामर्थ्यवान् अशा राजसत्तेच्या अगर लोकसत्तेच्या कायद्यांनां मान वाकवतो; इत्यादिक मतें जीं या ठिकाणीं सांगण्यांत आलीं आहेत, त्यांनां जें हिडिस स्वरूप येतें तें कदाचित् त्यांचें स्वरूपभूत नसून केवळ विवेचनपद्धतीनेंही आलें असावें. हींच मतें पुनः ग्लॉकन् आणि ॲडीमँटस यांनीं पुढें आणलीं आहेत व सर्व समाजरचनेंत जबरदस्त क्रांती घडवून आणल्याशिवाय त्यांतील कित्येक दोष दूर करतां येणार नाहींत. हें मत स्वतः प्लेटोचेंही असल्यामुळें त्यालाही या मतांनां सर्वस्वीच धुडकावून लावतां येत नाहीं, हें लक्षांत घेण्या-सारखें आहे.

येथपर्यंत प्रख्यात सोफिस्टांविषयीं कांहीं माहिती देऊन त्यांच्या मतांचेंही किंचित् दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. सोफिस्टांच्या काळीं अथीनियन लोकांची नीतिमत्ता खरोखरच खालावली होती किंवा काय, याचा इतिहासाच्या साह्यानें थोडासा विचार करूं. अशी अनीतिमत्ता उत्पन्न झाली असली तरी तिचें कारण सोफिस्ट लोक नव्हेत हें वरील विवे-चनावरून स्पष्टच होणार आहे. परंतु ही अनीतिमत्ताच उत्पन्न झाली होती किंवा नाहीं, या प्रश्नाचेंही अस्तिपक्षींच उत्तर मिळेल असें नाहीं. खिस्ता-पूर्वीं ४८० वर्षांपासून तों पेलॉपोनीससच्या युद्धाचा शेवट होईपर्यंतचा

सरासरी ८० वर्षांचा इतिहास घेतला तर त्यांमध्यें आपणांस अथेन्सयेथील नीतिमत्ता खालावत गेली असें म्हणतां यावयाचें नाहीं. साधारणतः जें जुनें तें चांगलें, असा लोकांचा समज असल्यामुळें त्या काळाची नीतिमत्तेबद्दल मोठी स्तुति करण्यांत येते; परंतु यावरून वस्तुस्थिति तशीच असेल असें निश्चयात्मक सांगता येत नाहीं. सॉक्रेटिसचा समकालीन ॲरिस्टो-फेनस हा मागील काळची स्तुति गाऊन त्याचवेळीं सोफिस्टांच्या शिक-वणीमुळें लोकांची नीतिमत्ता बिघडली असें म्हणतो, व पुढें ख्रि. पू. ३५० व ३४० चे दरम्यान इसोक्रेटिस हा आपल्या वृद्धापकाळी आपल्या स्वतःच्या काळांतील लोकांची निंदा करून अरिस्टोफेनसच्या काळांतील लोकांची स्तुती करतो. या दृष्टीनें पाहिलें तर मग ग्रीस देशांतील नीतिमत्ता दर पिढीला खालावतच गेली असें म्हणावें लागेल. परंतु इतिहासाचा योग्य विचार केल्यास हा केवळ आभास आहे असेंच कबूल करावें लागेल. आपले पूर्वज चांगले या समजुतीनें त्यांचें शरीरही अतिशय धिप्पाड असावें अशी कल्पना रूढ होते, व शिवाजी महाराजांची तरवार आजच्या पिढीपैकीं कोणाला उचलणारही नाहीं, अशी समजूत पडते; पण इतिहासांत पहावें तों महाराज अंगानें बळ-कट पण ठेंगू होते असें वर्णन आढळतें; इत्यादि गोष्टी वाचकांस परिचीत असतीलच. हाच आभास नीतिमत्तेलाही लागू पडतो. ज्याप्रमाणें कांहीं पिढ्यांत वास्तविक शारीरिक ऱ्हास दृष्टीस पडतो, त्याचप्रमाणें कांहीं विशेष कारणांमुळें राष्ट्राची नीतिमत्ताही कांहीं काळपर्यंत खालावते, ही गोष्ट खरी आहे; परंतु वरील तऱ्हेच्या आभासाचा त्याग करून ऐतिहा-सिक पुराव्यांच्या सूक्ष्म अवलोकनानें या प्रश्नाचा निवाडा केला पाहिजे. साधारण कवींच्या, नाटककारांच्या, अगर वक्त्यांच्या भाषणांवरच विश्वास ठेऊन चालावयाचें नाहीं. या दृष्टीनें अथेन्स येथील वस्तुस्थितीचें अवलोकन करूं लागल्यास, आपणांस तेथील नीतिमत्ता त्या काळांत खालावलीच होती असें म्हणतां यावयाचें नाहीं. मॅरॅथॉन व थर्मापुली येथें पारसीक सैन्याचा

धुव्वा उडवणाऱ्या वीरांचा व पेलॉपोनीससच्या युद्धांत पराक्रम गाजविणाऱ्या योद्ध्यांचा काळ व परिस्थिति निराळी असली तरी, त्यांचें धैर्य, शौर्यादिक गुण सामान्यच होत. मॅरॅथॉनचा योद्धा मिल्टिॲडिस व पेलोपोनीसीयन युद्धांतील अग्रणी पेरिक्लीज यांजमध्यें तुलनाच करूं लागल्यास पेरिक्लिस हा खास कमी ठरणार नाहीं. पेलॉपोनीससच्या युद्धाच्या शेवटीं शेवटीं मेलिअन लोकांच्या कत्तलीसारखे क्रौर्यप्रसंग घडून आले, व मिल्टिॲडिसच्या वेळीं असें क्रौर्य कोठेंही दिसून आलें नाहीं, ही गोष्ट खरी; परंतु याला खरें कारण म्हणजे त्या प्रसंगीं अशा कृत्यांबद्दल मोह पडण्याचा संभवच कमी होता हें आहे. त्यावेळचे लोक अधीक सदय होते असा निष्कर्ष त्यावरून निघत नाहीं. याशिवाय उत्तरकालीन अथीनिअन लोकांचे इतर गुणही चांगले ध्यानांत घेण्यासारखे आहेत. प्रथमतः चारशें व नंतर केवळ तीस सभासदांची जुलमी सत्ता प्रस्थापित झाली असतां, त्याचा मोड करून पुनः लोकसत्तेचा उद्धार करणारे अथीनियन कांहीं कमी पाणिदार म्हणतां यावयाचे नाहींत. त्याचप्रमाणें लढाईकरितां प्रतिवर्षी जबरदस्त कर भरावा लागत असतांना देखील संस्थानांच्या कायमच्या निधीला हात न लावण्याचा संकल्प चालविण्यांत त्यांनीं दाखविलेलें आत्मसंयमन, किंवा शत्रूवर जोराची चालही न करतां, किंवा अपमान सोसून तहही न करतां त्यांना दमवून जेर करण्याची पेरिक्लीजची युक्ति यशस्वी करण्यासाठीं त्यानीं दाखविलेली चिकाटी, हीं त्यांच्या खालावलेल्या नीतिमत्तेचीं निदर्शक होऊं शकतील काय ? अर्गिनुसी येथील लढाईंत समुद्रांतील प्रेतें काढण्यांत कसूर झाल्याबद्दल सहा सैन्याधिकाऱ्यांवर फिर्याद झाली होती, तीच फिर्याद ५० वर्षांपूर्वी झाली असती तर सॉक्रेटिससारखा मुख्य न्यायाधीश असून देखील त्यांचे प्राण वाचले असते काय ? फार काय पण सॉक्रेटिससारखा मनुष्य त्या काळीं अध्यक्षस्थानीं आला, ही गोष्ट देखील त्या काळच्या चांगुलपणाचीच द्योतक आहे. पूर्वीच्या

न्यायनिवाड्याच्या पद्धतीपेक्षां पुढील काळची पद्धत अधिक चांगली झाली होती, हें निर्विवाद आहे; व न्यायनिवाड्याची पद्धत अधिक चांगली होणें हें सुधारणेचेंच द्योतक आहे. निकियसच्या गुणांबद्दल फाजील आदरभाव बाळगल्यामुळेंच सॅरॅक्यूज येथें पाठविलेल्या त्यांच्या आरमाराची व घरांतीलच राज्यकारभाराचीही वाताहत झाली नाहीं काय ? पण त्यावरूनच अथीनिअन लोक गुणांनां लुब्ध होत हें दिसत नाहीं काय ? आणि गुणलोभ हा अनीतिमत्ता वाढल्याचा द्योतक आहे काय ? सारांश, सोफिस्टांच्या वेळीं अथेन्स येथील नीतिमत्ता बिघडली होती असें म्हणतां येत नाहीं. कदाचित् हा मुद्दा वादग्रस्त म्हणून सोडून दिला तरी वर दिलेल्या प्रॉडीकस व इतर प्रमुख सोफिस्ट यांच्या हकीगतीवरून व त्यांच्या शिकवणीच्या साधारण स्वरूपावरून त्यांचा कल नीतिमत्ता कमी करण्याकडे नव्हता असें स्पष्ट दिसतें; व अथेन्स येथील नीतिमत्ता बिघडली असल्यास तिचें कारण भिन्न असलें पाहिजे हें उघड आहे.

सरतेशेवटीं सोफिस्टांच्या बाजूचा पुरावा आपणास असाही देतां येईल कीं, त्यांतील बहुतेक लोक अथेन्सचे रहिवासी नव्हते, व असें असून त्यांनीं तेथें संपत्ती व लौकिक संपादन केला, ही एक गोष्ट देखील त्यांचें शिक्षण अथेन्सच्या लोकांना आपल्या हिताविरुद्ध वाटत नसे याची साक्ष देत आहे.

सोफिस्टांच्या दृष्टीनें आपण विचार करून त्यांतील प्रमुख म्हणून नांवाजलेल्या पुरुषांची हकीगत पाहिली, व सॉक्रेटीसलाही सोफिस्ट ही संज्ञा मिळाली होती ही गोष्ट लक्षांत घेतली, म्हणजे प्लेटोने त्यांजवर येवढा कोरडा कां उडविला, किंवा खुद्द सॉक्रेटीसनेंही त्यांची फजिती करण्याचें व्रत कां पत्करलें, व त्यांच्या शिकवणींतील कोणता कमीपणा सॉक्रेटिसनें भरून काढला, हे प्रश्न आपणांपुढें उभे राहतात. सॉफिस्टांचा उपदेश सर्वस्वी ग्राह्यच असल्यास सॉक्रेटिसनें त्यांचें खंडण कर-

ण्याच्या भानगडींत न पडतां केवळ त्याच आधारावर आपला विचार पुढें कां चालविला नाहीं ? त्यांच्यामध्यें गुणावगुणांचें मिश्रण अस-ल्यामुळें अशी स्थिति झाली किंवा काय ? या विषयीं आतां क्रमाक्रमानें विचार करावयाचा आहे.

पहिल्या प्रथम असा विचार करावयाचा कीं, एखाद्या पंथांतील विशिष्ट व्यक्तीविषयीं सामान्यतः बोलणें निराळें, व त्या पंथाविषयीं सामान्यतः बोलणें निराळें. ग्रोटच्या मतें सोफिस्ट हा पंथच नव्हे. कारण त्यांतील प्रमुख प्रमुख व्यक्तींमध्यें फारच मतभेद आढळून येत असे; परंतु ग्रोटचें हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. न्यायाधिश मंडळींत कांहीं मतभेद झाला तरी त्यांचें न्यायाधीशत्व जसें अबाधितच असतें, किंवा राजकीय सुधारणांच्या साधनांच्या उत्कर्षापकर्षाविषयीं भिन्नभिन्न मतें असतांही देशभक्तत्व जसें अबाधित राहतें, त्याचप्रमाणें प्रोटॅगोरॅस, प्रॉडीकस, गॉर्गिअस, इत्यादि सोफिस्टांचा परस्परांत कितीही बेबनाव असला तरी त्यांना एका वर्गांत घालण्यांत कांहीं विशेष हरकत नाहीं. कारण त्यांच्या विषमतेपेक्षां त्यांचें साम्यच अधिक महत्वाचें आहे, आणि हें साम्य पैसे घेऊन शिकविणें, हें होय. या सोफिस्टपंथांतील प्रमुख पुरुषांविषयीं प्लेटोचें मत बहुतकरून चांगलेंच असावें. कारण त्याजबद्दलची सर्व चांगली माहिती आपणांस त्याच्या ग्रंथावरून कळते, व त्याचें असें मत असण्यास योग्य कारण होतें, हेंही वरील सर्व हकी-गतीवरूनच स्पष्ट होतें. परंतु एखाद्या पंथांतील प्रमुख लोक अक्षेप-रहित ठरले म्हणून त्यांचे अनुयायी देखील दोषमुक्त होतात काय ? प्रोटॅगोरॅस हा विद्वान असेल, वक्तृत्व कलेंत निष्णात असेल, राजकारण-पटु असेल, आणि या कारणास्तव त्यानें स्वतः पैसे घेऊन शिकविणें हें अपायकारक होत नसेल, फार काय पण पैसे देऊन त्याजजवळ शिक-ण्यासाठीं मोठमोठ्या लोकांच्या उड्या पडत असतील, पण याच्या इतर सोफिस्ट त्याच दर्जाचे असत असें दिसत नाहीं. सोफिस्टांच्या

धंद्यांतील मुख्य दोष म्हटला म्हणजे सर्वज्ञत्वाचा अभिमान हा होय. कारण ज्यानें सर्वज्ञत्वाचा अभिमान सोडला, त्याची सोफिस्टगिरी बुडालीच म्हणून समजावें. अथेन्स शहरांत विचार, उच्चार, आचार कसे ठेवावेत म्हणजे मनुष्याची नेहमीं भरभराट होईल, हें शिकविण्याचा हे सोफिस्टलोक बाणा बाळगीत, पण थोडासा विचार केला असतां हें काम त्यांच्या जिवाबाहेरचें होतें असें आढळून येईल. संस्थानाच्या वडामोडींत कोणती बाब समाविष्ट होत नाहीं ? सैन्य, नौकानयन, वसूल, न्यायनिवाडा, अनागत व्यवस्था, शिक्षण, धर्म, इत्यादि सर्व विषयांचा राजकारणी पुरुषांना अभ्यास करावा लागतो, आणि या सर्व विषयांत एकाच मनुष्याला पारंगतता संपादन करणें अशक्य असल्यामुळें नित्यप्रसंगीं एकेक मनुष्य एकच शाखा पहातो. हिंडेनबुर्ग किंवा किचनेर सारखा सेनानी आरमारावरील सत्ता चालवूं इच्छित नाहीं, व नेल्सनसारख्या आरमारी योध्याला वाटरलू जिंकतां येत नाहीं. एखाद्या मोठ्या मॅक्समुल्लरला मेअर किंवा हायकोर्ट जज्ज नेमीत नाहींत, किंवा एखादा विवेकानंद जमीन महसुलाचेंही काम करतांना आढळत नाहीं. सारांश, एखाद्या देशाच्या राज्यकारभाराच्या ज्या विशिष्ट बाबी आहेत त्यापैकीं एखाद्या विषयांतच मनुष्य निष्णात होण्याचा प्रयत्न करतो, व त्या विषयांत पारंगत होण्यांतच त्याला आपलें आयुष्य घालवावें लागतें; पण या सोफिस्टांच्या वर्तणुकीकडे पहावें तर कांहीं निराळाच प्रकार आढळून येतो. लोकसभेपुढें येणाऱ्या विविध विषयांवर चर्चा करून त्यांजवर आपली छाप कशी बसवावी, हें शिकविण्याचा ते मक्ता घेत असत, परंतु लोकसभेपुढें येणाऱ्या विषयांचें त्यांचें स्वतःचें ज्ञान अर्थातच सरासरी असणार, व आपलें अज्ञान झांकून केवळ बऱ्या दिसतील अशा दोन गप्पा झोंकूनच वेळ मारून नेण्याची त्यांची प्रवृत्ती असणार, व तीच त्यांच्या शिष्यांत दिसून येणार हें उघड आहे. एखाद्या विषयाचें साधार व सोपपत्तिक सरळ विवेचन कसें करावें, हा त्यांजपुढील मुद्दा नसून,

आपल्या ज्ञानप्रदर्शनानें लोकांस गार कसें करावें, हा त्यांचा उद्देश असे, व या उद्देशाचा परिणाम लफंगेपणांतच होई. आपल्या अज्ञानराशीवर वक्तृत्वकौशल्याची निव्वळ कल्हई करून त्याला रजतराशीच्या भावानें विकूं पहाणें, हा लफंगेपणा नव्हे तर काय ? आणि या सोफिस्टांच्या पद्धतीमुळें एका परावर मोर होऊं पहाणारे तरुण पुरुष अथेन्समध्यें पुष्कळदां सांपडत, आणि हा तरुणांचा अदूरदर्शीपणा व त्यांचे गुरु सोफिस्ट यांचें अज्ञान उघडकीस आणण्यास सॉक्रेटिस झटत असे. फार काय पण प्रसंगविशेषीं त्यांची भीडभाड न धरतां भर बाजारांत त्यांची फजीती उडवून देई, व याचकारणानें सोफिस्ट लोक त्याचा फार द्वेष करीत. सोफिस्टांच्या लंगड्या उपदेशानें दिशाभूल झालेल्या तरुणांचें उदाहरण पहावयाचें असल्यास फार दूर जावयास नको. खुद्द प्लेटोचा ग्लाको या नांवाचा एक धाकटा भाऊ होता. सोफिस्टांच्या शिकवणीमुळें तरुणांनां अधिकार मिळवून, थेमिस्टोक्लिस, पेरिक्लीज, याजसारखें नांव गाजविण्याची जी अनिवार्य इच्छा त्यास होई, त्याच इच्छेला तो बळी पडला; व त्याचें वय केवळ वीस वर्षांचें असतांही राजकारणांत शिरण्याचें जें त्याला वेड लागलें तें कांहीं केल्या जाईना. त्याच्या मित्रमंडळीला व नातेवाइकांना मोठी भीति पडली कीं, हा अननुभवी व अर्धवट पोरगा अकाळीं राजकारणांत शिरून कोठेंतरी तोंडघशीं पडेल; व प्रसंगीं त्याचा प्राणही जाण्याची पाळी येईल. ही गोष्ट सॉक्रेटिसच्या कानावर आली तेव्हां सॉक्रेटिसनें ग्लाकोला गांठून त्याची समजूत पाडण्याचा निश्चय केला. ग्लाको हा तरतरीत व चांगला सद्गुणी मुलगा होता; व त्यांतही तो प्लेटोचा भाऊ म्हणून सॉक्रेटिसची त्याजवर फार ममता असे; परंतु सोफिस्टांच्या नादीं लागल्यामुळें तो सॉक्रेटिसला फारसा भेटतच नसे. परंतु सॉक्रेटिसनें त्याला एके दिवशीं गांठलेंच. सॉक्रेटिसची भाषणकरण्याची शैलीच अशी कांहीं मोहक होती कीं, त्याचें भाषण ऐकावयास कोणी एकदा उभा राहिला कीं, त्यास त्यांत गोडी वाटावी, व

त्याचें म्हणणें तो खोडून काढी त्याला देखील प्रश्न विचारतांना सॉक्रे-टिस अशा श्लोकांत ते विचारी कीं, तो अधिक जाळ्यांतच सांपडावा. ग्लाको तरुण असून आढ्यतेस चढला आहे हें जाणून सॉक्रेटिसनें त्याजबरोबर बोलतांना प्रथम त्याची जरा स्तुति करून त्याला खुलविलें, व हळू हळू त्याचा मूर्खपणा त्याच्या नजरेस आणून दिला. सॉक्रेटिस म्हणाला, " ग्लाको अथेन्सच्या लोकसत्ताक राज्याचा कारभार आपण पहावा अशी आपली इच्छा आहे असें ऐकतो, तें खरें असेल तर मोठी आनंदाचीच गोष्ट म्हणावयाची. आपल्यासारखा सदाचरणी व तरतरीत मनुष्य राजकारणांत शिरला तर लोकांचा, आपल्या संबंध्यांचा, आपला स्वत:चा मोठा फायदा होईल यांत तर संशयच नाहीं; पण आपल्या राजकारणपटुत्वानें असा मनुष्य या ॲटिका प्रांतालाच काय पण सबंध ग्रीस देशाला किंवा त्याहीपेक्षां सबंध जगाला ललामभूत होईल यांत कांहीं संशय नाहीं. " मनुष्य हा स्वभावतःच स्तुतिप्रिय असतो आणि ग्लाको हा तर एक अननुभवी तरुण. तो सॉक्रेटिसाच्या मोहजालांत अगदीं गुरफटून गेला, व एखाद्या नादलुब्ध हरणाप्रमाणें तटस्थ झाला. पुढें सॉक्रेटिस बोलूं लागला; " ग्लाको, जर आपणास लोकसत्ताक संस्थानांत अधिकार व प्रतिष्ठा मिळवावयाची आहे, तर आपणास लोकांच्या उपयोगीं पडून त्यांचा कांहींतरी फायदा करून दिला पाहिजे नाहीं काय ? " ग्लाको म्हणाला, ' होय; ' परंतु पुढें सॉक्रेटिसनें अशी लोकपयोगाची कोणती बाब आपण प्रथम हातीं घेणार, असा प्रश्न कर-तांच तो घोटाळला; व या त्याच्या घोटाळण्याचा फायदा घेऊन सॉक्रे-टिसनेंच त्याच्या तर्फे म्हणून सुचविलें कीं, कदाचित् संस्थानच्या लोकांस गबर करण्याचा त्याचा विचार असावा. हें उत्तर अर्थातच ग्लाकोला पसंत पडलें. सॉक्रेटिस म्हणाला, तर मग या संस्थानांत कोणत्या कारणाकरितां किती खर्च होतो व त्यापैकीं कोणता खर्च कमी

करता येण्यासारखा आहे, संस्थानाच्या एकंदर उत्पन्नाच्या बाबती कोणत्या, व त्यापैकीं कोणत्या बाबतींतील उत्पन्न लोकांना अधिक बोजा न वाटतां वाढवितां येईल; एखाद्या बाजूचा खर्च कमी करता आला नाहीं तर ती तूट भरून काढण्यास कोणत्या अन्य उपायांची योजना करावी; या प्रश्नांचा आपण विचार केलाच असेल. ग्लाकोला अर्थात् आपलें अज्ञानच कबूल करावें लागलें. फार काय पण आपल्या संस्थानाचें एकंदर उत्पन्न किती व त्यांचा खर्च किती, या ठोकळ रकमा देखील त्याला ठाऊक नव्हत्या. तथापि ग्लाको हा धीर धरून म्हणाला, देशाला गबर करण्याचा दुसरा मार्ग म्हणजे शत्रूंवर स्वारी करून लूट मिळवून आणणें हा तरी त्याला मोकळाच होता. सॉक्रेटिस म्हणाला, होय, ग्लाको, हा मार्ग आपणास मोकळा आहे खरा, पण एखाद्या शत्रूबरोबर लढाई जाहीर करण्यापूर्वी आपणांस त्याचें बलाबल पाहिलें पाहिजे, व त्या लढाईपासून वास्तविक किती फायदा होण्यासारखा आहे, हेंही पाहिलें पाहिजे. आधीं अथेन्सचे शत्रू किती, त्यांत संपन्न किती, व त्यापैकीं संपन्न शत्रूंचें जमिनीवर व समुद्रावर सैन्य व आरमार किती, या सर्वांची मोजदाद झाल्याशिवाय तर आपणांस लढाई करावी किंवा नाही हें ठरवितां येणार नाहीं. मग ग्लाको, आपल्या संस्थानचें एकंदर सैन्य किती, आपलीं जहाजें किती, आपल्या शत्रूंची संपत्ती किती, व त्यांचें सैन्य व जहाजें किती, याची आपणांस बरोबर माहिती असेलच, त्यावांचून आपण राजकारणाच्या भानगडींत पडणारच नाहीं. ग्लाकोला आपलें अज्ञान कबूल करावें लागलें, व नंतर सॉक्रेटिसानें त्याच्या बुद्धीवर अशी गोष्ट ठसविली कीं, राजकारणांत अत्यंत उपयोगीं असणाऱ्या माहितीची जुळवाजुळव न करतां जे त्यांत पडतात, ते प्रतिष्ठा तर मिळवीत नाहींतच, पण केवळ उपहासाला मात्र पात्र होतात; व देशाचें अकल्याणही घडवितात. शेवटीं सॉक्रेटिस म्हणाला, ग्लाको, माझी तुझ्यावर फार ममता आहे म्हणून मी तुला

सांगतों कीं, संभाळ, भलत्याच नादाला लागून आपल्याला व आपल्या देशाला फशी पाडूं नकोस.

सॉक्रेटिसच्या या उपदेशानें ग्लाकोचें मन ताळ्यावर आलें, व पुष्कळ विषयांचा सांगोपांग अभ्यास करून नंतर तो दरबारांत वागूं लागला.

या गोष्टीवरून सोफिस्ट लोकांच्या शिकवणीनें तरुण मनुष्य कसे उच्छृ बनत हें आढळून येतें. वक्तृत्वाच्या साह्यानें पुष्कळ गोष्टी साध्य होतात, व त्यामुळें राजकारणांत वक्तृत्वाची अतिशय गरज लागते ही गोष्ट खरी, पण म्हणून वक्तृत्वकलेचे एकदोन धडे शिकले न शिकल तोंच राजकारणपटू होऊं पहाणें म्हणजे किती उपहासास्पद व किती अनर्थकारक आहे ? मनुष्यानें राजकारणांत पडूं नये असें सॉक्रेटिसचें मुळींच म्हणणें नव्हतें. तो स्वतः राजकारणांत शिरला नाहीं ही गोष्ट खरी; पण म्हणून इतरांनीं त्यांत शिरूं नये असा कांहीं तो उपदेश करीत नसे. त्याच्या उपदेशाचा मतलब येवढाच असे कीं, मनुष्यानें राजकारणांत पडावयाचेंच तर विविध विषयांची यथायोग्य माहिती मिळवून नंतर तें पत्करावें. सोफिस्टांच्या नादीं लागून अर्ध्या हळकुंडांत पिवळें होऊं नये, व हें सिद्ध करतांनां सोफिस्टांची निंदा करणें त्याला प्राप्तच होत असे, व त्याचा परिणाम सोफिस्टांचा तीव्र द्वेष हा झाला.

आपली विद्या शिकविण्याबद्दल सोफिस्ट लोक पैसे घेत यासंबंधानेंही त्यांजवर थोडासा ठपका आल्याशिवाय रहात नाहीं. प्रॉडीकस, प्रोटॅगोरॅस, इत्यादिकांची विद्वत्ता मोठी होती, म्हणून त्यांनीं पैसे घेतले तरी कोणास विशेष आक्षेप घेतां येण्यासारखा नव्हता. फार काय पण योग्य विद्या प्राप्त करून दिल्यावर तसा मोबदला घेणें अगदीं रास्त होतें. आपल्याकडील गुरुदक्षिणे-प्रमाणें त्यांत वावगें कांहींच नाहीं. आणि त्यांतही प्रोटॅगोरॅसची पैसे घेण्याची पद्धति फारच उदारतेची होती, हें कोणीही कबूल करील. शिकविण्याबद्दल पैसे घेतले येवढ्यावरूनच त्याला कोणी दोषी ठरवि-

णार नाहीं. वर विवेचन केलेल्या सर्व गोष्टी कबूल केल्या तरी सुद्धां असा प्रश्न राहातोच कीं, इतर सोफिस्ट याबाबतींत त्याचें पूर्ण अनुकरण करीत असत काय? खरी विद्वत्ता असून विद्याविनिमय केला तर गोष्ट निराळी; परंतु आपल्या तुटपुंज्या ज्ञानालाच मोठा डामडौल चढवून तें ज्ञान बाजारांत विक्रावयास काढणें, व त्याची अवाच्यासवा किंमत सांगणें, हें केव्हांही फसवेगिरींतच मोडणार; आणि उपरिनिर्दिष्ट किित्येक प्रख्यात सोफिस्टांखेरीज इतर लोक याच सदरांत येतात. " सोफिस्ट " म्हणून जो प्लेटोचा संवाद आहे, त्यामध्यें सोफिस्टाचें स्वरूप काय, याबद्दल बरीच विस्तृत चर्चा केली आहे. थिओडोरस आणि थिॲइटीटस हे नेमक्यावेळीं सॉक्रेटिसला भेटतात; त्यावेळीं त्यांज-बरोबर एक इलीशियांतील पाहुणा येतो, व तो तत्वज्ञ म्हणून नांवाज-लेला आहे, अशी त्याजविषयीं माहिती सॉक्रेटिसास मिळाल्यामुळें सॉक्र-टिस त्यास विचारतो; " आपण तत्त्वज्ञ आहांत, किंवा राजकारणी, सोफिस्ट? आपले लोक आपणांस यापैकीं एकाच कोणत्यातरी नांवानें ओळखतात, कीं तीनही नांवानीं?" या प्रश्नावरून सोफिस्ट म्हणजे कोण याची चर्चा पाहुणा व थिॲइटीटस यांच्या संवादरूपानें केली आहे. सोफिस्ट म्हणजे गळाला आमिष लावून मासे पकडणारा कोळी, किंवा गीतादिविलोकनानें हरिणांनां पाशबद्ध करणारा फासेपारधी, लोकांची खुशामत करून सद्गुणांची विक्री करणारा व्यापारी, आपला विक्रीचा माल कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें आपल्याच बुद्धींतून निर्माण करणारा हुन्नरी, वादपटु, असें ह्मणतां येईल. लोकांचे दुराग्रह दूर करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगांत आहेच असें म्हणवत नाहीं. कारण त्यांचें ज्ञान म्हणजे केवळ ज्ञानाभास आहे, आणि केवळ ज्ञानदंभानें कोणाचे संशय दूर होत नाहींत, व त्यांचे दुराग्रहही सुटत नाहींत.

वर जी सोफिस्टांच्या स्वरूपाची मीमांसा केली आहे, त्यावरून पैसा मिळविण्यासाठीं ते ज्ञानीपणाचा मोठा आव आणित हें उघड दिसतें,

आणि असा ज्ञानदंभ माजवून पैसे उकळणाऱ्या मनुष्यास कोणीही नीचच समजेल. या ज्ञानाभावाबरोबरच अनिवार द्रव्यलोभ असला म्हणजे हे सोफिस्ट श्रीमंत लोकांचे खुषमस्करेच होत असतील यांत काय आश्चर्य आहे? आपल्या ज्ञानाची बाजारांत किंमत काय येईल ह्याच सदोदित ज्यांचा विचार, त्यांच्या ठिकाणीं खरी ज्ञाननिष्ठा असेल ही अपेक्षा करणें म्हणजे आपलें रूप विकणाऱ्या वारांगनेचे ठायीं रूपवतीचें मोहक सौंदर्य असेलच, अशी आशा बाळगण्यासारखें आहे. लोकांनां खरें ज्ञान देऊन त्यांची उन्नती साधण्याची कला शिकविण्यापेक्षा त्यांनां केवळ खूष करून वश करणें, हेंच ज्याप्रमाणें सोफिस्टांच्या तालमींत तयार झालेल्या पुरुषांचें धोरण; त्याप्रमाणेंच खुद्द सोफिस्टांचीही श्रीमंतलोकांनां खरें ज्ञान शिकविण्यापेक्षां त्यांजकडून पैसा उकळण्याबरच अधिक दृष्टी. मग त्यांनीं श्रीमंत लोकांपुढें लांगूलचालनाचा प्रकार केल्यास काय नवल? प्रॉडिकस व प्रोटगोरॅस, यांनां हें लिहिणें लागू पडत नाहीं हें खरें; पण साधारण सोफिस्ट याच सदरांत येत यांत संशय नाहीं. आणि सॉक्रेटिस ज्ञानविक्रयाच्या विरुद्ध असण्याचें मुख्य कारण ही साधारण प्रवृत्तीच होय. येवढेंच नव्हे तर हा ज्ञानविक्रय कधींकधीं अगदीं अनीतिकारकही होई यांत संशय नाही. अरिस्टोफेनसच्या मतें सॉक्रेटिस हा सोफिस्टच होता, व सोफिस्टांची शिकवण कशी अनीतिकारक होती हें दाखविण्याकरितां आपल्या 'मेघमाला' (Clouds) या नाटकांत एक प्रसंग सांगितला आहे. स्ट्रेपसिअडिस या नांवाचा एक भला गृहस्थ आपल्या मुलाच्याद्वारें कर्जबाजारी झाल्यामुळें अगदीं भांबाऊन गेला होता; अशा वेळीं आपल्या कर्जदारांनां फसविण्यास काय युक्ती करावी म्हणून सल्ला घेण्यासाठीं सोफिस्ट सॉक्रेटिस याजकडे गेला, व त्याची विद्या शिकून तयार होण्यास त्याचें मठ्ठ डोकें नालायक ठरल्यावर त्यानें आपल्या मुलासच ती विद्या संपादन करण्यास पाठविलें. मुलानें ती विद्या फारच उत्तम संपादन केली. कारण त्यानें

कोर्टामध्यें आपल्या कर्जदारांनां फसविलें येवढेंच नव्हे, तर नंतर बापालाही त्याच युक्तीनें फसविलें. सोफिस्टांची विद्या त्याच्या इतकी अंगवळणीच पडली ! सॉक्रेटिस व सोफिस्ट यांच्यामध्यें असलेलें महदंतर अरिस्टोफेनच्या लक्षांत न आल्यामुळें, त्यानें येथें सॉक्रेटिसचीच सोफिस्ट म्हणून टवाळी केली ही गोष्ट निराळी; परंतु त्यावरून साधारणतः सोफिस्टांची वर्तणूक कांहीं प्रसंगीं तरी अशी होत असावी असें दिसतें. यांच्या या जीवोपजीवित्वाची चेष्टा करण्यासाठीं अरिस्टोफेनस हा आपल्या 'विहंगम' ( Birds ) नामक नाटकांत म्हणतोः—

"Along the sycofantic shore,
And where the savage tribes adore
The waters of the clepsydra,
There dwells a nation stern and strong,
Armed with an enormous tongue,
Where with they smite and slay;
With their tongues they reap and sow,
And gather all the fruits that grow,
The vintage and the grain;
Gorgias is their chief of pride,
And many more there be beside
Of mickle might and main.
Good they never teach, nor show
But how to work men harm and woe,
Unrighteousness and wrong;
And hence the custom do the arise,
When beasts are slain in sacrifiice,
We sever out the tongue."

या उताऱ्यांत गॉर्गिअसवर जे शिंतोडे उडविले आहेत ते खरे नव्हेत, हें मागें दाखविलेंच आहे; परंतु सामान्यतः सोफिस्टांचा ज्ञानविक्रय अनीतिकारकच असे यांत संशय नाहीं.

ही क्रयविक्रयाची गोष्ट बाजूस ठेविली तरी सोफिस्टांच्या शिक्षणाचें स्वरूप देखील हानिकारक होतें यांत कांहीं संशय नाहीं. प्रॉडीकसनें दिलेली हर्क्युलीसची गोष्ट, प्रोटॅगोरॅसची शिक्षणमीमांसा, हिपिअसचा नेस्टर व निओटॉलीमस मधील संवाद, इत्यादि प्रकरणें अगदीं निरुपद्रवी येवढेंच नव्हे तर उपयुक्तही वाटतात खरीं; परंतु सोफिस्टांच्या एकंदर विचारसरणीचें येथेंच पर्यवसान होत नाहीं. प्रचलित नीतिनियम, आचारविचार, धर्मसंस्था, इत्यादिकांविषयीं चर्चा करतांना त्यांची प्रवृत्ती उपकारक अगर साधक ( Constructive ) नसून ती नेहमीं विध्वंसक (Destructive) मात्र असे. त्यावेळची परिस्थिति अशी होती कीं, प्रचलित रूढींच्या अगर कायदेकानूंच्या साहाय्याशिवाय त्रिकालाबाधित नीतिसिद्धांत बांधण्या इतकी मनुष्याच्या बुद्धीची वाढ झाली नव्हती. अशा प्रसंगीं प्रत्येक मनुष्याच्या मनस्वातंत्र्याच्या मुद्यावर त्यांचें निराकरण करून दाखविणें हें मोठें अपायकारक होतें. या निराकरणानंतर जर त्रिकालाबाधित सत्याचा उपन्यास करण्याची खबरदारी घेण्यांत आली तर ठीक; परंतु सोफिस्टांची तशी कधींच प्रवृत्ती नसे व योग्यताही नसे. या कारणांमुळें जनसमाजाचा असलेला आधार तोडून टाकून नवा आधार न देतां त्यास अधांतरी लोंबकळत ठेवण्याचें पाप सोफिस्टांच्या शिरावर येतें. एखाद्या कार्यांतील दोष दाखवून त्याचा विध्वंस करणें फार सोपें आहे, परंतु तेंच कार्य अधिक चांगलें कसें करतां येईल हें दाखविण्याची शक्ति असल्याशिवाय, आहे त्या कार्याचा विध्वंस करण्यास तरी हात घालूं नये, हें शहाणपणाचें नव्हे काय ? परंतु सोफिस्टांना येवढें कुठलें धोरण ! आपल्या जिव्हाग्राच्या आघाताबरोबर केवढाले मनोरे जमीनदोस्त होत आहेत इकडेच

त्यांचें लक्ष ! हे मनोरे पडतां पडतां खुद्द आपल्या डोक्यावरील मनोराही कोसळेल, व मग आपणास स्वतःला रहावयाला जागा रहाणार नाहीं, व नवा मनोरा बांधण्याची आपणास शक्ति नाहीं, ह्या गोष्टी त्यांच्या सारख्यांच्या ध्यानांत येत्या तर काय पाहिजे होतें? पौराणिक कथांतील अगर प्रचलित कायद्यांतील नीति तुमच्या आडव्यातिडव्या प्रश्नांपुढें टिकत नसेल तर दुसरीं चिरकालिक नीतितत्त्वें शोधून काढा; पण हें जोंपर्यंत होत नाहीं तों पर्यंत जनसमाजाला समाधानास असलेला आधार काढून टाकणें हें वाईट नाहीं काय? सोफिस्टांचीं मतें समाजव्यवस्थेला कशीं बाधक असत याचें दिग्दर्शन करण्यासाठीं प्राटॅगोरॅस या विख्यात सोफिस्टाची दर्शनमीमांसा ( Theory of perception ) घेऊं. आपणांस वस्तूंचें ज्ञान होतें तें कसें? ती वस्तु आपल्या प्रतिकृतीचे तरंग चोहोंकडे पसरते, आपल्या इंद्रियांवर त्या लाटांच्या आघातानें तत्सदृश विकार उत्पन्न होतो, व त्या विकारांच्या मिश्रणानें जो कांहीं तिसराच परिणाम दृष्टीस पडतो, त्यास आपण त्या वस्तूचें दर्शन म्हणतो. यावरून वस्तुदर्शन म्हणजे आपल्या इंद्रियानुरोधानें त्या वस्तूचा होणारा आभास होय. हा आभास व्यक्तिमात्राचे ठिकाणीं इंद्रियभेदांमुळें भिन्न असणार व म्हणून सर्वसंमत वस्तुदर्शन ही मिथ्या गोष्ट आहे. ज्याला जितकें दिसतें तितकें तो पाहातो, व त्याच्यापुरतें तें खरें असतें. सारांश, सत्य हें सार्वजनिक नसून व्यक्तिविषयक आहे. मनुष्य हा सर्व वस्तूंचें प्रमाण आहे. ( Man is the measure of all things ) सत्य काय आणि असत्य काय; न्याय्य काय आणि अन्याय्य काय; याचा निवाडा करण्याचा त्यालाच अधिकार आहे.

सोफिस्टांतील प्रमुख व्यक्ती वरील मीमांसेचा दुरुपयोग करीत असतीलसें वाटत नाहीं खरें, परंतु तिच्या शेवट कशांत होतों तें पहा. जर सर्वसाधारण सत्य अगर सर्व साधारणतः न्याय असें

कांहींच नाहीं, तर मग मी माझ्या सुखासाठीं दुसऱ्याचीं वस्तू घेण्यास मागें कां पहावें ? त्याची वस्तू घेणें त्याला वाईट दिसेल, पण तें वस्तुतः तसेंच आहे याला प्रमाण काय ? जर माझें सुख त्यामुळें साधत असेल तर मी ती खुशाल घ्यावी. कायद्यानें मला शिक्षा करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. व्यक्तिविषयक सुखदुःख हेंच जर चांगल्या वाईटांचें प्रमाण, तर न्याय्य म्हणविल्या जाणाऱ्या आचरणानें सर्वच लोक सुखी होतात असें दिसत नाहीं. सदाचरणाच्या या भ्रामक समजुतीनें वागणारा पुरुष बहुधा दुःखांत आढळतो. तेव्हां ज्याला जें वाटेल तें त्यानें करावें. सत्य, न्याय, नीति, इत्यादि सब झुट आहे. कॅलीक्लीसनें 'गार्गिअस' या संवादांत हींच मतें पुढें आणलीं आहेत, व तीं किती हानिकारक आहेत हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. वरील दर्शनमीमांसेचा हाच निष्कर्ष काढून त्याप्रमाणें सोफिस्ट लोक आचरण करीत नसत व तसें करण्याची त्यांची इच्छा असली तरी छाती नव्हती, परंतु त्यांचीं मतें समाजरचनेला कशी विध्वंसक असत हें यावरून दिसतें.

वरील दर्शनमीमांसा ही समाजसंस्थेला प्रतिकूल आहे येवढेंच नव्हे; तर त्यांत मोठा दोषही आहे. प्रत्येक मनुष्याचें दर्शन निराळें असलें म्हणजे सत्य दर्शन ही कल्पनाच खोटी कशी ठरेल. एकाच वस्तूबद्दल सर्प, भूमिभेद, जलपंक्ती, इत्यादि अभास झाले म्हणून रज्जु-दर्शन हें मिथ्या ठरतें काय ? किंवा प्रत्येक पुरुषाला आपल्या आवडी-निवडीप्रमाणें एक स्त्री सुंदर अगर कुरुप दिसली म्हणून खरें सौंदर्य हीं कल्पनाच मिथ्या झाली काय ? मनुष्यांच्या विविध दर्शनांनां एकच मूळ-भूत आधार नाहीं काय ? त्याचप्रमाणें मनुष्य हा सत्यासत्याचें, न्याया-न्यायाचें, सदसदाचें आत्मपर्याय प्रमाण आहे तो कोणत्या दृष्टीनें ? त्याचा इतर सृष्टीशीं कांहीं संबंध नाहीं, इतर वस्तु त्याच्या सुखदुःखसाधनाखेरीज इतर दृष्टीनें असून नसून सारख्याच, असा कांहीं याचा अर्थ नव्हे. सोफिस्टांनीं व्यक्तिदृष्टीचा जो उपरिनिर्दिष्ट अतिरेक केला, त्याला

सॉक्रेटिसनें योग्य प्रसंगीं व योग्य दृष्टीनें आळा घातला, व मागील कायदे किंवा रूढी याजवरच अवलंबून न राहतांहि, मनुष्याला सत्य, व न्याय्य यांचें ज्ञान बुद्धिद्वारा करून घेतां येतें, हें त्यानें सिद्ध करून दाखविलें.

मागें कित्येक ठिकाणीं सॉक्रेटिसची गणना सोफिस्टांमध्येंच होई म्हणून सांगितलें; परंतु वरील विवेचनावरून त्यांचें भिन्नत्व साधारण लक्षांत येईल. सॉक्रेटिस व सोफिस्ट हे भिन्न असतांहि ते एकच भासले याचें कारण त्यांचें कांहीं बाबतींतील साम्य होय. आपल्याला इष्ट तेंच उत्तर आपल्या प्रतिपक्ष्याकडून काढून घेण्याची कोटिक्रमपद्धति, प्रचलीत गोष्टीविषयीं निर्भिडपणें टीका करण्याची तयारी, वादपटुत्व, शिक्षणव्यासंग, भाषणाची मोहकता, इत्यादि गुण दोघांनांही सामान्य होत; परंतु साक्रेटिस हा मोजके शब्द बोलणारा तर सोफिस्ट शब्दावडंबर माजविणारे. साक्रेटिसचें कार्य विधायक तर सोफिस्टांचे कार्य विध्वंसक. साक्रेटिस निस्पृह तर सोफिस्ट धनलोभी. सॉक्रेटिस साधा तर सोफिस्ट डौली. सॉक्रेटिस नम्र पण ज्ञानी, तर सोफिस्ट वास्तविक पहातां किंचिज्ज्ञ परंतु दांभिक व उर्मट इत्यादि भेदही महत्वाचे आहेत. त्यां उभयतांनां सोफिस्ट हा शब्द लावावयाचा तर तो या भेदाच्या अज्ञानानें, किंवा ते दोघेही पंडित असत, व कांहीं बाबतींत सारखे असत, याच गोष्टीवर विशेष लक्ष देऊन लावतां येईल.

सोफिस्टांची खरी योग्यता ऐतिहासिक दृष्टीची आहे. त्यांच्यामधील सर्व दोष लक्षांत घेऊन देखील, मनुष्याच्या विचारांत प्रगती घडवून आणण्यास ते कारणीभूत झाले हें आपणास कबूल केलेंच पाहिजे. प्रचलित शिक्षणाची मर्यादा सर्व बाजूंनीं वाढवून त्यांनीं लोकांना आपल्या परिस्थितीचें निरीक्षण करण्यास उत्तम साधन करून दिलें. रूढ झालेले कायदे किंवा आचारविचार जोंपर्यंत केवळ अंधश्रद्धेनें पाळण्यांत येतात, तोंपर्यंत वादविवाद, तंटेबखेडे कमी असतात खरें, पण या

अंधश्रद्धेंतच अधिक काळ गेल्यास प्रगतीचीही आशा व्यर्थ आहे. तेच कायदे व तेच आचारविचार, तीक्ष्ण कोटिक्रम, व व्यापक विचार, यांच्या भक्कम पायावर उभारले गेले म्हणजे त्यांजवरील आक्षेपनिरसन हें अगदीं सुलभ होतें; व आक्षेपांच्या तीव्र आघातांनीं तें स्वतः विरघळून न जातां, खडकाच्या प्रचंड सुळक्यावर आपटणाऱ्या लाटाप्रमाणें तेच उलट विदीर्ण होऊन जातात. या संधिकाळीं कार्याचे दोन भाग करिता येतात; एक प्रचलीत कायदे अगर आचारविचार यांच्या अंधश्रद्धामूलक स्वरूपाचें उच्चाटण, व दुसरा म्हणजे त्याचेंच भक्कम पायावर व सुधारलेल्या स्वरूपांत पुनः प्रस्थापन. यापैकीं पहिला भाग सोफिस्टांनीं उचलिला व साक्रेटिसानें दुसरा भाग संभाळून त्याच्याच कार्याची पूर्तता केली.



# प्रकरण ४ थें.

———:०:———

## साक्रेटिसचीं मतें.

सात्रेटिस व सोफिस्ट या प्रकरणामध्यें एका ठिकाणीं उल्लेख करण्यांत आलाच आहे कीं, सॉक्रेटिसच्याकाळीं पंडित लोकांची व तत्त्ववेत्त्यांची दृष्टि भौतिक शास्त्रांकडून व्यवहारविषयक शास्त्रांकडे वळली होती, व खुद्द सॉक्रेटिस त्याच विचाराचा होता. त्याच्या मतें भौतिक शास्त्रांच्या काथ्याकुटापेक्षां नीतिशास्त्राचा अभ्यासच मनुष्याला जास्त उपयोगी आहे. भौतिक विषयांमध्यें एकतर निरनिराळ्या तत्त्ववेत्त्यांचीं मतें परस्परविरोधी होतीं, व त्यामुळें कोणाचें म्हणणें खरें मानावें हें ठरविणेंच आधीं कठीण होतें. आणि यदाकदाचित् एकाच तत्त्ववेत्त्याचें म्हणणें अधिक विश्वसनीय ठरलें तरी त्यापासून जगाच्या व्यवहारामध्यें काय फरक पडणार आहे? जगाच्या मुळाशीं असलेलें तत्त्व एकरूप आहे असें समजलें असतें म्हणजे जगतांतील भेद, शत्रुमित्रभाव, संधिविग्रह, हे बंद होणार होते काय? सारांश, जगांतील व्यवहाराच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्याचा कांहींएक उपयोग नव्हता; व या कारणाकरितांच सॉक्रेटिसानें भौतिकशास्त्राभ्यासाची उपेक्षा केली. भौतिकशास्त्रविषयक कांहीं गोष्टींचा सॉक्रेटिसानें आपले ईश्वरविषयक मत सिद्ध करण्यासाठीं उपयोग केला आहे; त्याचा उल्लेख यथाक्रम येईलच. सध्यां मुद्याची गोष्ट येवढीच कीं, थेल्स, हिरॅक्लिटस्, इत्यादि तत्त्ववेत्त्यांमध्यें व सॉक्रेटिसमध्यें हा अतिशय मोठा फरक आहे कीं, पहिल्या काळांतील तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें भौतिकविषयक विचार म्हणजेच तत्त्वज्ञान, तर सॉक्रेटिसच्या मतें त्याचा उपयोग अगदींच गौण. सॉक्रेटिसनें त्याच्यापूर्वीं झालेल्या तत्त्वज्ञांच्या मतांचा अभ्यास

केला होता, परंतु त्यानें त्याचें मुळींच समाधान झालें नाहीं. सर्व गोष्टींची योग्य उपपत्ती लावण्यासाठीं त्यांनीं सुचविलेल्या कल्पना अपुऱ्या ठर-तात असा त्याचा ग्रह होता, व ॲनॅक्झॅगोरॅसच्या उपपत्तीचा आपण किती आस्थेनें अभ्यास केला, परंतु आपल्या आशेची किती निराशा झाली, याचा त्यानें स्पष्ट उल्लेखच केला आहे. सॉक्रेटिसचें असें म्हणणें असें कीं, कित्येक गोष्टी मानवी बुद्धीला अनाकलनीयच आहेत; व त्यांच्या शोधांत घालविलेला वेळ व्यर्थच जाणार; म्हणून शहाण्या माणसानें भलत्याच नादीं न लागतां, आधीं आपल्या भोंवतालीं काय चालतें तें पहावें. सर्व विश्वाला कवटाळीत बसण्यापेक्षां मानवी गोष्टीं-चाच खोल विचार करावा. आधुनिक काळांत अत्यंत महत्त्वाचें ठर-लेलें खगोलविज्ञानशास्त्र अशाच प्रकारचें शास्त्र आहे, अशी सॉक्रेटिसची समजूत होती. या शास्त्राचा अभ्यास मनुष्यानें साधारण बेताबातानें केल्यास त्याचा उपयोग आहे; कारण ताऱ्यांच्या उदयास्तावरून ऋतु-काळ लक्षांत येतात, रात्रीच्या वेळी खुष्कीनें किंवा जलमार्गानें प्रवास कर-णाऱ्यांनां दिशा समजतात; परंतु आपल्या बुद्धीचा मर्यादितपणा लक्षांत न घेतां या शास्त्रांत अनिरुद्ध संचार केला म्हणजे मनुष्य भलभलतीं मतें बनवि-ण्यांत काळाचा अपव्यय करतो. सॉक्रेटिसापूर्वीं जे तत्त्वज्ञ होऊन गेले त्यांची खगोलस्थ ज्योतिषविषयीं जीं मतें प्रथमपुष्पांत ग्रथित करण्यांत आलीं आहेत, त्यारून वरील कल्पनेची सत्यता लक्षांत येईल. आधुनिक काळीं या शास्त्राची जी वाढ झाली आहे, भविष्यकाळीं घडणाऱ्या गोष्टी अचुकपणें वर्तविल्याचे जे प्रसंग दृष्टोत्पत्तीस येत आहेत, व मनुष्याच्या बुद्धीला अनाकलनीय वाटणाऱ्या या विषयाचेंच कसें सूक्ष्म आकलन होत चाललें आहे, हें लक्षांत आणलें म्हणजे सॉक्रेटिसनें त्याच शास्त्राला इतकें निरुप-योगी ठरविलेलें पाहून आश्चर्य वाटतें. परंतु त्यावेळेपर्यंतच्या अनुभवा-प्रमाणें पाहिल्यास सॉक्रेटिसचें म्हणणें खरें होतें. भूमितिशास्त्रांचा उपयोग केवळ जमीन भोजण्यापुरताच, असें त्याचें मत होतें. या शास्त्राचा निदान

येवढा आनुषंगीक उपयोग तरी होता, परंतु तद्व्यतिरिक्त भौतिकशास्त्र म्हणजे परस्परविरुद्ध मतांचा गोंधळ व कालाचा नाश असेंच उघड होतें. याच कारणांमुळें लोकांचें लक्ष दिवसेंदिवस अधिक उपयुक्त विषयांकडे लागत होतें, व तें तसें लागावें अशाबद्दल सॉक्रेटिसचे समकालीन सोफिस्ट यांचीही खटपट होती. परंतु सॉक्रेटिस व सोफिस्ट यांची विचारसरणी येथपर्यंत एकसारखीच असली तरी त्यांचा यापुढील मार्ग भिन्न आहे. सोफिस्टांच्या दृष्टीनें चिरंतन व निरपेक्ष असे सत्यसिद्धांत अशक्य असल्यामुळें त्यांनीं शिकविलेल्या ज्ञानाचा अगर कुशल कोटिक्रमाचा सदुपयोग किंवा दुरुपयोग होणें हें सर्वस्वी व्यक्तिविषयक आवडनिवड किंवा लहर याजवरच अवलंबून राहे. उलटपक्षीं सॉक्रेटिसच्या मतें सत्यसाधन हेंच मनुष्याचें ध्येय आहे व त्याच्या नीतिविषयांना त्या सत्याचाच पाया आहे. या कारणाकरितांच, सोफिस्टांच्या मतांची वाढ झाली म्हणजे ग्रीक तत्त्वज्ञानाचा नाश ठेवलेलाच; परंतु त्याकाळीं जर कोणाजवळ तत्त्वज्ञानविषयक सुधारणेचें व नवीन जीवनाचें खरें बीज असेल तर तें फक्त सॉक्रेटिसजवळच होतें.

ज्याप्रमाणें राजकारणादिक इतर कित्येक विषयांचे शास्त्र आहे, त्याप्रमाणेंच नीतींचें शास्त्र आहे, व त्या शास्त्राच्या अनुरोधानेंच नीतीची मीमांसा करून आचाराच्या शुद्धाशुद्धतेचा निर्णय ठरविला पाहिजे, असें सॉक्रेटिसाचें मत होतें. व या नीतिशास्त्राच्या सिद्धिसाठींच सॉक्रेटिसनें आपलें सर्व आयुष्य खर्च केलें असें म्हटलें तरी चालेल. या नीतिशास्त्राचें ज्ञान मनुष्यास करून द्यावयाचें म्हणजे त्याचें मन मोठें केलें पाहिजे, व त्याजवर बुद्धीचा प्रकाश पाडला पाहिजे; या हेतूनें त्यानें आपण स्वतः अज्ञान पत्करलेसें दाखवून लोकांस सज्ञान करण्याचा प्रयत्न केला; व या प्रयत्नाला आपल्या दृढ श्रद्धेनें व्रताचें स्वरूप दिलें.

सॉक्रेटिसच्या नीतिमीमांसेचें आद्यतत्त्व म्हणजे असें आहे कीं, ज्ञान हेंच सद्गुणाचें कारण असून ज्ञान हेंच सद्गुणाचें स्वरूप आहे. ज्या मनु-

ज्याला ज्ञान प्राप्त झालें तो सद्गुणी असलाच पाहिजे, व जर कदाचित् कोणी दुर्गुणी असेलच तर त्याच्या दुर्गुणाला त्याचें अज्ञानच कारण आहे. या ठिकाणीं असा प्रश्न उपस्थित होतो कीं, ज्ञान हें नेहमीं विषयोपाधिक असल्यामुळें, तें सद्गुणाचें कारण आहे हें ठरविण्याबरोबरच तें ज्ञान कोणत्या विषयाबद्दल असलें पाहिजे, याचाहि निर्णय केला पाहिजे. सॉक्रेटिसच्या मतें सर्व ज्ञान हें एकरूपच आहे; परंतु सत्यज्ञान व आभासमय ज्ञान किंवा भ्रमरूप ज्ञान याजविषयींचा भेद दाखवून सत्यज्ञानाचें स्वरूप विशद केलेंच पाहिजे. सद्गुणाला कारण असणाऱ्या ज्ञानाचा विषय काय, या प्रश्नाला सॉक्रेटिसाचें उत्तर, ' हितकर किंवा उत्तम काय ' या विषयाचें ज्ञान सद्गुणाचें मूळ आहे, असें आहे. ज्या मनुष्याला आपणांस हितकर काय हें समजत नाहीं, तोच वाईट मार्गाला लागतो. एखाद्या व्यसनाच्या आधीन होणाऱ्या मनुष्याला आपण त्या व्यसनापासून आपल्यावर, आपल्या कुटुंबावर केवढा मोठा अनर्थ ओढून आणीत आहोंत याचें ज्ञान नसतें, म्हणूनच तो त्या फंदांत पडतो. क्षणिक सौख्योपभोगासाठीं दरवडा घालून संपत्ति मिळविणाऱ्या दरवडेखोराला खरें सुखकर किंवा हितकर काय, कोणात्या मार्गाचा अवलंब केला असतां आपणांस खऱ्या सुखाची प्राप्ती होईल, याविषयीं भ्रम पडल्यामुळेंच तो लोकांची संपत्ती चोरावयास प्रवृत्त होतो, व अखेर सुखप्राप्ति होण्याचें बाजूसच राहून त्याला जिवास मुकण्याची पाळी येते. उलट पक्षीं ज्या मनुष्याला सर्व गोष्टींचा विचार करून उत्तमाधम वस्तूंची निवड करता येते, व निरनिराळ्या वस्तूंची योग्य किंमत अजमावता येते, तो मनुष्य नेहमीं सद्गुणांकडेच प्रवृत्त होतो. या जगतामध्यें जें जें सद्गुणस्वरूप म्हणून नांवाजलेलें आहें, त्या ठिकाणीं आपणांस हेंच आढळून येईल. परमेश्वराचा व आपला संबंध काय, व त्या संबंधामुळें आपणांस काय करणें हितकर आहे हें ज्याला समजतें, तो पुरुष

धर्मनिष्ठ होतो. आपला व आपल्या देशबांधवांचा हितसंबंध कशांत आहे, हें समजल्यामुळें मनुष्याचें वर्तन न्याय्य होतें. हितकर व उदात्त वस्तुंचा वा गुणांचा संग्रह कसा करावा, व घातकर वस्तूंचा त्याग कसा करावा, हें ज्ञान असल्यास मनुष्य धोरणी व समंजस होतो. आपणांस पथ्यकर काय, हें समजल्यास मनुष्य बरा होतो व अजाणपणें कुपथ्याचें सेवन केल्यास मृत्युवश होतो. फारकाय पण आपाततः अविचारमूलक वाटणारीं धाडसाचीं कृत्येंही याच ज्ञानावर आवलंबून असतात. समरांगणावर जिवाची पर्वा न करणारा मनुष्य बेभान होऊन व विचारशक्तीला फाटा देऊनच लढतो असें कोणास सकृद्दर्शनीं वाटेल, परंतु योग्य विचारांतीं असें आढळून येईल कीं, या धाडसाच्या मुळाशींही निरनिराळ्या संकटांची योग्य किंमत ओळखून कोणचें संकट पत्करणें हितकर आहे, या विषयाचें ज्ञान हेंच आहे. चिरकाल टिकणारें यश मलीन करण्यापेक्षां, केव्हांतरी अवश्य येणारा व म्हणूनच समरांगणावर पाठ दाखविण्यासारखें लज्जास्पद कृत्य करूनही न टळणारा मृत्यु पत्करणेंच आपणास अधिक श्रेयस्कर, अशी मनाची ठाम समजूत झालेला योद्धाच शत्रूशीं निकरानें लढून दिगंत कीर्ति मिळवितो. सारांश, कोठेंही पहा, हितकर वस्तूचें ज्ञान झालें कीं त्याबरोबर सद्गुण आलाच, व तें ज्ञान नसेल तर दुर्गुण ठेवलेलाच. कोणाही मनुष्याला आपलें अहित व्हावें, आपला नाश व्हावा असें वाटत नाहीं. आपण नेहमीं थाटमाटांत व सुखासमाधानांत असावें अशी सर्वांचीच इच्छा आहे; परंतु हें सुखसमाधान खरोखर कशांत आहे याचें ज्ञान न झाल्यामुळेंच मनुष्य फशीं पडतो.

या ठिकाणीं दुसरा असा प्रश्न उद्भवतो कीं, हितकर किंवा उत्तम काय ? या प्रश्नाचें उत्तर जर त्रिकालाबाधित असेल तर आपणास अमुक एक आचरण नीतिशुद्ध आहे किंवा नीतिबाह्य आहे, याचा सहज निर्णय करतां येईल. परंतु अमुक एक गोष्ट हितकर किंवा उत्तम

हा सिद्धांत सर्वमान्य आहे काय? खुद्द सॉक्रेटिसलाच हा प्रश्न विचारला असता तर त्याला त्याचें निश्चित उत्तर देतां आलें असतें काय? आपणास एखादी चांगली वस्तु माहीत आहे काय, असा ॲरिस्टिपसचा प्रश्न आल्याबरोबर सॉक्रेटिस त्याला काय उत्तर देतो हें पाहण्यासारखें आहे. सॉक्रेटिस ॲरिस्टिपसला एका मागून एक असे प्रश्न विचारतो कीं, आपणास एखादी चांगली वस्तू माहीत आहे काय? असें विचारण्यांत त्याचा उद्देश ताप, डोळे दुखी, भूक, इत्यादि प्रसंगीं चांगलें काय हें समजवून घेण्याचा होता काय? व या प्रश्नाचें नकारात्मक उत्तर आल्यावर साक्रेटिसचें असें प्रत्युत्तर असे कीं, जी वस्तू कोणत्याच कारणप्रसंगीं चांगली नाहीं, ती कळण्यांत कांहीं अर्थही नाहीं व ती कळवून घेण्याचा त्यानें कधीं प्रयत्नही केला नाहीं.

या ठिकाणीं चांगलें किंवा हितकर म्हणजे कांहीं निश्चित स्वरूपाचें नसून तें नेहमीं सापेक्ष व म्हणूनच प्रतिप्रसंगीं निरनिराळ्या स्वरूपाचें आहे, असा निर्णय ठरतो. व ज्या हितकर वस्तूच्या ज्ञानानें मनुष्य सद्गुणी व्हावयाचा त्या हितकर वस्तूचें स्वरूपच अनिश्चित असल्यामुळें नीतिनियमांनांही निश्चितपणा येणें शक्य नाहीं असें वाटतें. मनुष्याच्या विशिष्ट परिस्थितीला अमुक एक गोष्ट हितकर हें ठरविण्यास साधन तरी काय पहावयाचें? मनुष्याचें हित पहावयाचें तें तरी कोणत्या बाबतींत? त्याच्या शरीराचें स्वास्थ्य कशानें होईल हें पहावयाचें, कीं त्याच्या मनाच्या स्वस्थतेकडे लक्ष द्यावयाचें? आणि या प्रश्नांचा निवाडा झाल्यावर नैतिक आचरणाची सर्वांत श्रेष्ठ कोटी कोणती हें पहावयास पाहिजे, व तदनुरोधानेंच साधारण कोटींचा विचार झाला पाहिजे. परिस्थितीप्रमाणें चांगलें वाईट ठरतें असें म्हटलें तरी कोणच्या उच्च ध्येयांच्या अनुरोधानें या पायऱ्या ठरवावयाच्या हें पाहिलें पाहिजे. नीतिमिमांसा हा विषय फार गहन आहे, त्यांतील अत्यंत श्रेष्ठ कसोटी प्रत्येकाला समजण्यासारखी नाहीं, व म्हणून सामान्यजनांना उपदेश

करतांना जें हितकर असेल त्याचें आचरण करण्यास सांगणें ठीक आहे; पण ज्यांचा असे विषय समजण्याचा अधिकार आहे, त्यांनां तरी कांहीं स्पष्ट उत्तर देणें आवश्यक आहे; व तसें स्पष्ट उत्तर सॉक्रेटिसाच्या संभाषणांत मिळत नाहीं. इतरांशीं बोलतांना त्यानें तसें स्पष्ट उत्तर दिलें नसतें तरी चाललें असतें; परंतु ॲरिस्टिपस-सारख्या मनुष्यापासून तें लपविण्याचें कांहीं कारण नव्हतें. ॲरिस्टिपस हा मोठा बुद्धिमान् व विचारी होता, व सॉक्रेटिसच्या अनुयायिवर्गांत त्याचा नंबर प्लेटो व युक्लिड यांच्या खालोखाल होता. मग पथ्यापथ्याचें तत्त्व इतकें गूढ आहे काय कीं तें ॲरिस्टिपस सारख्यासही कळण्याजोगें नव्हतें? तसें असेल तर इतरजनांनां त्याचा गंध तरी कोठून येणार, व त्यांची संशयनिवृत्ति तरी कशी होणार? ॲरिस्टिपसची इच्छा सॉक्रेटिसाला शब्दांत पकडण्याची होती, व म्हणून सॉक्रेटिसानें अशी उडवाउडवी केली, असा यावर कित्येकांचा अभिप्राय आहे. उदाहरणार्थ, सॉक्रेटिसानें अन्न चांगलें म्हणून म्हटलें कीं, त्याच्याच पद्धतीचा अवलंब करून, अन्न घातक कसें हें दाखवावें, असा त्याचा बेत होता, व हा बेत सॉक्रेटिसानें हाणून पाडला.

केवळ वाद जिंकण्याच्या दृष्टींनेंच पाहिलें तर सॉक्रेटिसचें करणें बरोबर दिसेल, परंतु तत्त्वसंशोधनाला ही दृष्टि अपुरी आहे. मनुष्याचें कोठल्या बाबतींत हित साधावयाचें, तें कायमचें ठरल्याखेरीज नीतिमीमांसेला निश्चित स्वरूप येणें शक्य नाहीं.

मनुष्याच्या आचरणाचें ध्येय सुख आहे, हें मत ग्रीस देशांत त्यावेळीं प्रचलित होतें, व सॉक्रेटिसनेंही कित्येक प्रसंगीं जें सुखकर तेंच चांगलें असें ठरविलें आहे. परंतु हा सॉक्रेटिसचा सुखवाद चार्वाकादिकांच्या सुखवादाहून फार भिन्न आहे. क्षणिक शारीरिक सुखासाठीं मनुष्यानें लोलुप होऊन आचरण करूं नये, असें त्याचें मत आहे. पण याला

कारणही हेंच कीं, याच्यायोगानें मनुष्याच्या सुखाचा वाटा कमी होतो. कामलोलुप पुरुष आपल्या वासना तृप्त करण्याच्या फाजील नादी लागून आपल्या शरीराची खराबी करून घेतो, व मग त्याला त्या सुखाचा आस्वाद घेणेंही अशक्य होतें. यास्तव मनुष्याला सुखाची इच्छा असेल तर त्यानें नियमितच आचरण ठेवलें पाहिजे. सॉक्रेटिसची सुख-मय अवस्थेची कल्पना ही सामान्यजनांच्या सुखकल्पनेहून फारच निराळी आहे; व त्याला सुखध्येयवादी म्हणावयाचें असेल तर त्या नांवाचा अर्थ प्रत्येकवेळीं मर्यादित करणेंच भाग आहे.

याशिवाय दुसरी अशी गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, सॉक्रे-टिस हा प्रत्येक कृतीचा मनावर अथवा आत्म्यावर काय परिणाम होतो इकडे लक्ष देऊनच तिची किंमत ठरवितो. आपल्या ध्यानींमनीं नसतां केवळ दैवाच्या अनुकूलतेमुळें एखादी चांगली गोष्ट घडून येण्यापेक्षां ती स्वकष्टानें प्राप्त करून घेण्यांतच मनुष्याचा अधिक फायदा आहे, असें त्याचें म्हणणें होतें. व हें केवळ सुख ध्येयाला फारसें अनुकूल नाहीं. सॉक्रेटिसच्या स्वतःच्या चरित्राचा व त्याच्या या सुखवादाचा अर्थ बरोबर न समजल्यामुळें, आलस्यामध्यें आकंठ बुडून गेलेल्या एपिक्यू-रिअन पंथांतील मनुष्यांच्या आयुक्रमाचा किंचित् विचार केल्यास, आप-णांस या दोन सुख कल्पनांमध्यें किती अंतर आहे हें दिसून येईल. त्याचप्रमाणें सुख हें सद्गुणाचें फळ आहे, कारण नव्हे, असें जें सॉक्रे-टिसनें कित्येक ठिकाणीं म्हटलें आहे, तेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आचरणाचा चांगुलपणा आधींच ठरलेला असतो, व त्यापासून खरी सुखप्राप्ति होते, असा या भाषणाचा मथितार्थ होतो.

यावरून एखाद्या कृत्याचा सुखकरपणा हा त्याच्या चांगुणपणाबद्दल खात्रिलायक पुरावा नाहीं. मग चांगलें म्हणजे काय ? हा प्रश्न शिल्लक राहतोच.

चांगलें म्हणजे बुद्धीला पटणारें, अशी एक व्याख्या सॉक्रेटिसच्या भाषणांतून निघते. मनुष्याचा स्वभावच असा आहे कीं, त्याला चांगलें तेंच आवडतें. मनुष्याच्या बुद्धीवर अज्ञानाचें पटल असल्यामुळें त्याला ही चांगली वस्तू दिसत नाहीं. पण त्याला एकदां सत्यज्ञान झालें म्हणजे त्याला आपल्या आचरणांतील दोष दिसतात; व कोणत्याही मनुष्याला आपण वाईट असावें असें वाटत नसल्यामुळें तो ते टाकून देतो. या कल्पनेमध्येंही अन्योन्याश्रयाचा मोठा दोष आहे. कारण सत्यज्ञान झालें तर चांगलें काय हें समजणार, व चांगलें काय हें समजणें म्हणजेच सत्यज्ञान.

याखेरीज सॉक्रेटिसच्या नीतिमीमांसेंतील दोष म्हणजे तिच्यांतील एकांगीपणा किंवा अपुरेपणा हा आहे. मनुष्याच्या हातून कांहीं विशिष्ट आचरण घडून येण्यास त्याची बुद्धि, हें एक अत्यंत महत्वाचें कारण असतें ही गोष्ट खरी; परंतु सत्यवस्तूंचें नुसतें ज्ञान झाल्याबरोबर मनुष्याच्या हातून लगेच तसें आचरण घडतेंच असें नाहीं. मनुष्याचे मनोविकार व वासना यांचा मनुष्याच्या आचरणावर जबरदस्त ताबा चालतो, व या गोष्टीची जणूकाय सॉक्रेटिस यास आठवणच नाहीं असें भासतें. सॉक्रेटिसच्या मनाची इतकी प्रगल्भावस्था झाली होती कीं, त्याला सत्यज्ञान होणें व त्याबरहुकूम आचरण घडणें, हें अगदीं एकरूपच झालें होतें. परंतु ही अवस्था येण्यास मनुष्याला जे अविश्रांत परिश्रम करावे लागतात, व त्याकाळीं बुद्धीचा व मनोविकारांचा जो भयंकर संग्राम सुरू असतो, त्याची सॉक्रेटिसच्या योजनेमध्यें कांहींच मोजदाद केलेली दिसत नाहीं. परंतु जगतांतील अत्यंत दुःखकारक प्रसंग आपणांस याच अंतःकलहाची साक्ष देत आहेत. चांगलें काय, हें उपजतबुद्धीनें म्हणा, उपदेशानें म्हणा, किंवा अन्य कारणानें म्हणा, पण समजत असूनही मनुष्य आपलें आचरण सुधारण्यास समर्थ होत नाहीं. ज्या अवस्थेला ‘ कळतें पण वळत नाहीं ’ म्हणून म्हणावयाचें, ती

अवस्था हीच. ' जाऊं नका रे विषयाटवीची वाट कठिण मोठी ' हा उपदेश मनांत येत असतांही ज्यांनां आपला कामविकार दाबतां येत नाहीं, असे प्राणी असतातच. मद्यपानापासून होणारे अनर्थ समजत असूनही मद्यपी मोहजालांत अडकतो; व अशा तऱ्हेचीं उदाहरणें पाहूं लागल्यास तीं हवीं तेवढीं सांपडतील. ही तऱ्हा केवळ जडमूढांचीच नव्हे, तर मोठमोठ्या विचारी पुरुषांचीही अशीच स्थिति झाल्याचें आढळून येतें. मोठमोठ्या ऋषीमुनींची तपश्चर्या भंग पावला त्याला कारण त्यांचें निग्रहाविषयींचें अज्ञान हेंच पुरेसें कारण नाहीं. तुमचें ज्ञान तें खरें ज्ञानच नव्हें, असा शेरा मारूनही भागावयाचें नाहीं. ' बलवानिंद्रियग्रामः विद्वांसमपि कर्षति ' या व्यासमहर्षींच्या वाक्यामध्यें अशा पुरुषांचा समावेश विद्वानांमध्येंच केला आहे. मग ज्याला चांगलें काय तें समजलें त्यांच्या हातून तें घडेलच असा कांहीं आपणास निश्चय सांगता येणार नाहीं. सॉक्रेटिसाच्या नीतिमीमांसेचा एकांगीपणा येथेंच दृष्टोत्पत्तीस येतो. मनुष्याची इच्छा सर्वस्त्री समर्थ असती तर मग जगतांत दुःखकारक प्रसंग घडूनच आले नसते. स्वतः सॉक्रेटिस हा अशा स्थितींतूनच उन्नत अवस्थेला गेला होता हें खरें; पण ज्यावेळीं त्यानें उपदेश केला, त्यावेळीं त्याची स्वतःची तयारी विलक्षण झालेली असल्यामुळें त्याला या गोष्टींचा विसर पडला असावा. मनोविकार प्रबल झाले तरी त्यांनां ताब्यांत आणण्याचा मार्ग हाही ज्ञानावलंबीच आहे, व म्हणून सॉक्रेटिसनें केलेली मीमांसा चुकीची नाहीं, हें अगदीं खरें. ती किंचित् एकांगीं आहे येवढेंही त्याबरोबरच कबूल केलें पाहिजे. प्लेटो व ॲरिस्टाटल यांनां देखील ही मीमांसा पुरेशी न वाटून त्यांनीं आपली उपपत्ति निराळ्याच तत्त्वावर मांडली.

ज्याप्रमाणें व्याकरणाचे ग्रंथ होण्यापूर्वींही मनुष्यें शुद्ध भाषण करीत हें खरें आहे, त्याचप्रमाणें नीतिमीमांसेची व्यवस्थित मांडणी होण्यापूर्वी मनुष्याचें आचरणही शुद्धावस्थेंत असणें शक्य आहे; व सॉक्रेटिस हा

अशा शुद्ध आचरणाचें जणूं मूर्तिमंत स्वरूपच आहे. त्याची मीमांसा अपुरी असली तरी महत्त्वाची व सूचक आहे, व या शास्त्राच्या प्रगतीला सॉक्रेटिसनें जें साह्य केलें तें असामान्य होतें हें कोणीही कबूल करील. सामान्य आचरणाची नियममर्यादा लावणें हें जसें त्याच्या नीत्युपदेशाचें एक प्रधान अंग, त्याप्रमाणेंच कांहीं विशिष्ट सद्गुणांचें योग्य स्वरूप पुढें मांडून तें श्रोत्याच्या मनावर ठसविणें हें त्याचें दुसरें अंग आहे; व त्याच्या उपदेशांतील हा भाग अधिक बोधप्रद व महत्त्वाचा आहे. असो, आपण त्याविषयाकडेच आतां लक्ष देऊं.

सॉक्रेटिसचा अतीशय प्रीतींतला विषय म्हणजे स्वाभिमान व आत्मसंयमन या दोन गुणांवरच व्यक्तिविषयक योग्यतेची इमारत उभारली जाते. मनुष्यानें आपण होऊन आपणाकडे अवास्तव हीनत्व पत्करूं नये; कारण त्यायोगानें आपणास्वतःविषयीं आपला आदर कमी कमी होत जाऊन आपला उत्साह नष्ट होतो. या उपदेशाचें आचरण सॉक्रेटिसाप्रमाणें इतर ठिकाणीं क्वचित्च सांपडेल. आपल्या जिवावरचा प्रसंग आला असतांहीं इतर लोकांप्रमाणें आपलीं बायकापोरें न्याय सभेंत आणून त्यांच्या दीनवाणीनें न्यायाधीशाच्या मनांत कींव उत्पन्न करण्याचा मार्ग त्यानें पत्करला नाहीं. ज्या कृत्यानें आपली मानहानी होते तें कृत्य मनुष्यानें प्राणांतीही करूं नये, हेंच या आचरणाचें तात्पर्य आहे. आपला जीव बचावणें येवढेंच ध्येय असेल तर रणभीरू मनुष्यासारखा शहाणा कोणीच नाहीं म्हणावयाचें; पण त्या रणभिरूची जगांत कोण फजीती ! आणि इतकें करूनही मनुष्याला चिरंजीव होता येतें काय ? आपणास दुसऱ्यानें मारल्याखेरीज आपण मरणारच नाहीं अशी कांहीं गोष्ट नाहीं. मग केवळ प्राण वाचविण्यासाठीं मानहानी पत्करण्यापेक्षां जीव दिलेला काय वाईट ! सारांश, मानधनत्व हें सर्व सद्गुणांना आधारभूत आहे.

या स्वाभिमानाचा अर्थ उर्मटपणा असा मात्र नव्हे. आपल्या स्वतःविषयींच्या आदाराचें उद्धटपणांत रूपांतर होऊं नये याबद्दल मनुष्यानें नेहमीं खबरदारी बाळगळी पाहिजे. व यासाठींच सॉक्रेटिसानें याच स्वाभिमानाला विनयाची व सरळ वर्तनाची जोड दिली आहे. सॉक्रेटिसवर जर कोणी असा आक्षेप घेईल कीं, त्यानें देशसेवा करण्यांत जाणून बुजून हयगय केली, तर त्याला तो मोठ्या अभिमानानें आपल्या कृत्यांची आठवण देईल. पॉटीडियाच्या रणमैदानावर गाजविलेलें शौर्य, अर्गिनुसीच्या सेनापतींवर झालेल्या अन्याय्य फिर्यादींत केवळ सत्यासाठीं, बहुमतालाही न जुमानण्यांत दाखविलेलें धैर्य, एका निरपराधी मनुष्याला पकडून आणण्याचा, तीस अंमलदारांपैकीं दोघांनीं केलेला हुकूम धाब्यावर बसविण्यांत त्यानें देशसेवेसाठीं केलेली प्राणाची बेपर्वाई, इत्यादि प्रसंगांविषयीं तो केव्हांही अभिमानपूर्वकच भाषण करी; परंतु तेंच धैर्य म्हणजे काय ? याची व्याख्या करण्याचा प्रसंग आला असतांना तो आपलें अज्ञान प्रांजळपणें कबूल करी ( Laches पहा ). वादविवादांमध्यें आपला पक्ष खोटा ठरल्यास तो टाकून देण्यासही मनुष्यानें तयार असलें पाहिजे. कारण सत्य हेंच श्रेष्ठ आहे. कांहीं कांहीं प्रसंगीं सॉक्रेटिस केवळ वाद जिंकण्याच्या भरीस पडून आपल्या मताविरुद्ध भाषण करतो असें दिसतें, परंतु त्याचें एकंदरींत वर्तन सरळपणाचेंच असे यांत कांहीं संशय नाहीं. आपण आपल्या प्रतिपक्ष्या-प्रमाणेंच सत्याचा शोध करणारे असून आपल्या विरुद्ध बाजूकडील सत्यांश उचलून घेण्यास तत्पर असल्याबद्दल त्याला अभिवचन देतां येई, व तें त्याचें अभिवचन मनापासून दिलेलें असे. सॉक्रेटिस वादविवाद करतांना आपल्याकडे कमीपणा घेई, तो नेहमींच कावेबाज-पणाचा नसे, तर विनयमूलकही असे. अपोलो देवानें त्यालाच सर्वांत शहाणा म्हणून ठरविल्यावर तो कसा बुचकळ्यांत पडला, व अखेरीस

त्यानें आपल्या शहाणपणाची काय उपपत्ती दिली, हें त्याच्या आत्मसमर्थनपर भाषणांत आलेंच आहे. परमेश्वराच्या ज्ञानापुढें मानवीज्ञान म्हणजे कःपदार्थ. आपलें अज्ञान पत्करणें हेंच अशा प्रसंगीं खरें ज्ञान, व सॉक्रेटिस ही गोष्ट ओळखतो म्हणूनच तो ज्ञानी. ज्या मनुष्याला थोडें पण खरें ज्ञान झालें त्यालाच ज्ञानाची खरी अनंतता लक्षांत येते, व तो आश्चर्यचकित होऊन आपलें ज्ञान हें कांहींच नव्हे, असें कबूल करतो. ही ज्ञानाची अगाधता लक्षांत आणूनच विख्यात तत्त्वद्रष्टा जो न्यूटन त्यानें आपणाविषयीं असे उद्गार काढले कीं, अनंत ज्ञानसागराच्या कांठावरील गारगोटयांशी खेळणारा मी एक मुलगा आहे. ज्या समुद्राच्या तळाला आजतागाइत कोणताच बुडीद न लागल्यामुळें त्याला तळ तरी आहे कीं नाहीं, हाच प्रश्न आहे, त्या अनंत सागरापुढें गारगोटीची किंमत काय ? मानवीज्ञानाची मर्यादित स्थिति लक्षांत आणून ज्या तऱ्हेनें न्यूटननें वरच्यासारखे उद्गार काढले, त्याच तऱ्हेची सॉक्रेटिसची अज्ञानाची कबुली आहे. आपणास जितकें ज्ञान झालें आहे तितक्या ज्ञानाबद्दल खात्री बाळगावी, अभिमान बाळगावा; व अशी खात्री सॉक्रेटिसलाही होती म्हणूनच त्यानें लोकांस विशिष्ट गुणांचा उपदेश केला. परंतु आपणास ज्या गोष्टी अनाकलनीय आहेत किंवा अद्यापि अज्ञात आहेत, त्याविषयीं मनुष्यानें वृथा अभिमानवश होऊन भलभलतीं विधानें करूं नयेत. सत्यशोधनासाठीं विनयाची कास धरणारा तत्त्वज्ञ व लोकांस सन्मार्गाला लावण्यासाठीं दृढ श्रद्धेनें व निश्चयपूर्वक उपदेश करणारा गुरु, असे हे सॉक्रेटिसाच्या जीवनाचे बिनसंधि भाग आहेत, असें म्हटलें तरी चालणार आहे. सारांश, मनुष्यानें विनयाचा त्याग करूं नये व आपलेपणाही सोडूं नये.

अशा स्वतंत्र बाण्यानें वागावयाचें असेल तर त्याला अत्यंत आवश्यक गुण म्हणजे निरपेक्षता हा आहे. सुखलोलुप मनुष्य हा नेहमीं परवश असल्यामुळें त्याच्या हातून कोणतेंच महत्त्वाचें कृत्य घडून येत

नाहीं. देवांची अवस्था श्रेष्ठ असण्यास कारण म्हणजे त्यांची निरपेक्षता हीच आहे, असें सॉक्रेटिसचें म्हणणें होतें. व मनुष्यानें आपल्या गरजा शक्य तेवढ्या कमी करून देवतुल्य व्हावें, हें त्याचें नेहमींच सांगणें असे. या विषयींचा थोडासा उल्लेख पहिल्या प्रकरणांत केलाच आहे. सॉक्रेटिसाइतकी साधी रहाणी फारच क्वचित् आढळून येईल, पण या साध्या रहाणीचा उद्देश त्यापासून स्वातंत्र्य मिळावें असा असे. अशी स्वतंत्र मनोवृत्ती नसतांना केवळ लोकांना भुलविण्यासाठीं एखाद्यानें लक्तरें पांघरूण मोठा डौल आणला तर त्याच्या वस्त्रांच्या फटींतून त्याचें अज्ञान मात्र दृष्टोत्पत्तीस येतें असें तो बजावीत असे. त्याच्या निरपेक्षतेच्या मुळाशीं ही स्वतंत्रवृत्तीच होती. सुख घ्यावयाचेंच तर घ्यावें, परंतु तद्वश होऊं नये हाच त्याचा कटाक्ष होता. पावित्र्यापेक्षां स्वातंत्र्य हाच त्याच्या निरपेक्षतेचा हेतू होता असें जें कित्येक लेखकांनीं म्हटलें आहे तें खरें आहे. ख्रिश्चन धर्मानंतरची पापपुण्याची व तन्मूलक शुद्धाशुद्धतेची कल्पना ग्रीक लोकांच्या कल्पनेपेक्षां फार निराळी होती. एखाद्या अन्याय्य कृत्याच्या आचरणानें होणारे आनुषंगिक परिणामच अधिक महत्वाचे वाटत व दुर्गुण म्हणजे गैरमुत्सद्देगिरीची, अपमानास्पद अवस्थेची, व परावलंबनाची जननी आहे, म्हणूनच तिचा मुख्यतः तिरस्कार होई.

मनुष्य कितीही स्वावलंबनी व निरपेक्ष झाला तरी त्याला आपलें बहुतेक आयुष्य समाजामध्येंच घालवयाचें असल्यामुळें त्याला कांहीं सामाजिक गुणांचीही अवश्यकता आहे. अशा गुणांमध्यें स्नेह किंवा मैत्री या गुणाचा पहिला अधिकार आहे असें म्हटलें तरी चालेल. या मैत्रीविषयीं सॉक्रेटिसानें केलेलें विवेचन फार बोधप्रद आहे. आपलें कुटुंब, आपलें मित्रमंडळ, आपलें संस्थान, यांजसंबंधीचें प्रेमपाश तोडून मनुष्याला आपला हेतु सिद्धीस नेतां येणार नाहीं; तर त्यांचा योग उपयोग करून, त्यांचें महत्त्व समजून वागण्यांतच त्याचें हित आहे; असें

उपदेशप्रसंग झेनोफननें अनेक वर्णिले आहेत. एकाप्रसंगीं सॉक्रेटिसचा वडील मुलगा लँप्रोक्लीज हा आपल्या आईला कांहीं दुरुत्तर बोलला. झँटिपी ही किती कर्कश स्वभावाची होती, व इतकें असूनही सॉक्रेटिस तिजबरोबर किती शांतपणानें वागे, याजविषयीं पहिल्या प्रकरणांत लिहिलेंच आहे. आपली आई आपणाशीं कितीही कठोरपणानें वागली तरी आपण कठोर होऊं नये, हा सॉक्रेटिसचा मुद्दा आहे. ज्या रम्य जगतांमध्यें आपणांस विविध मनोहर विषयांचा उपभोग घ्यावयास सांपडतो, त्या जगतांतून नाहिसें होणें म्हणजे मरणें या गोष्टीसारखी भयप्रद गोष्ट दुसरी कोणतीही नाहीं असें सामान्य मनुष्यास वाटतें. कारण या मरणशिक्षेच्या भयानेंच मनुष्याच्या तीव्र कुविचारांनांही आळा बसतो. अशा रम्य जगतांमध्यें आपलें येणें ज्या आईबापांवर अवलंबून असतें, त्यांजशीं आपण घृतघ्न होणें हें फार वाईट आहे. कोणी म्हणतील कीं, आपली वासना तृप्त करून घेण्यासाठींच मनुष्य विवाह करतो, व केवळ नाइलाज म्हणून अपत्यसंरक्षणाचें ओझें पत्करतो; परंतु हें म्हणणें अगदीं चूक आहे. कारण पशुसामान्य वासनांची तृप्ति करण्यचे दुसरे सोपे व कमी खर्चाचे मार्ग असूनहि मनुष्य जर विवाहबंधनानें आपणास जखडून घेतो, तर त्याचा उद्देश केवळ वासनातृप्तीपेक्षां अधिक असला पाहिजे. आपल्याकडील आर्यसंकृतींतच वाढलेल्या लोकांना तर सॉक्रेटिसचा हा विचार ताबडतोब पटेल. प्रजातंतूचा उच्छेद होऊं नये पितरांचें ऋण फेडण्यासाठीं व आपणास पुढें पिंडप्रदान देऊन स्वर्गद्वार मोकळें करण्यासाठीं पुत्रप्राप्ति व्हावी, याच उद्देशानें मनुष्यानें विवाहबंधनांत पडावें, केवळ कामवासनेच्या तृप्तीसाठीं नव्हे; व ही भावना ज्याची सदैव जागृत राहील तो चांगला मनुष्य होय. सारांश, ज्यांना चांगल्या वाईटाची किंवा भूतभविष्याची कांहीं कल्पनाच नाहीं, ते जडमूढ सोडून दिले तरी समंजस माणसाची विवाहप्रवृत्ती केवळ वासनातृप्तीसाठीं नाहीं.

आधीं मूल जन्मास येईपर्यंतच मातेला किती कष्ट सोसावे लागतात व नंतर त्याच्या संगोपनाची काळजीही तिलाच ठेवावी लागते. ज्यावेळीं त्याला आपले हित अहित समजत नाहीं, व सुखदुःख व्यक्त करतां येत नाहीं, त्यावेळीं आईलाच त्याची काळजी ठेवावी लागते. तो मोठा झाल्यावर त्याला योग्य शिक्षण देण्याचें काम पित्यावर येऊन पडतें, व श्रम किंवा पैसा याकडे न पाहतां शक्य असल्यास आपणा स्वतः-कडून किंवा निदान दुसऱ्या मनुष्याकडून तरी त्याला शिक्षण मिळण्याची व्यवस्था तो करतो. सारांश, अशाच सर्व बाबी आहेत कीं, ज्याच्या योगानें मनुष्य आपल्या आईबापांचा उपकारबद्ध होतो.

झँटिपी ही जात्या फार कर्कश होती व म्हणून तिचे अनंत उपकार असले तरी तिची शिवीगाळी किंवा तोंडाळपणा असह्-नीय आहे, अशी आपल्या मुलाची तक्रार ऐकून सॉक्रेटिस त्यास म्हणतो कीं, तूं देखील लहानपणीं वेळीं अवेळीं रडण्याचा कोल्हाळ करून तिला असाच त्रास देत असशील. या शिवाय असा विचार करावयास पाहिजे कीं, जरी आपले आईबाप आपणास कांहीं दुरुत्तरें बोलले, तरी त्यांनां आपलें अहित व्हावें असें कधींच वाटत नसतें. रंगभूमीवर दोघे नट एकमेकांनां अचकट विचकट बोलले तरी त्यांच्यामध्यें कांहीं खाजगी द्वेष उत्पन्न होतो काय? नाहीं. कारण त्यांनां ठाऊक असतें कीं, तें भाषण केवळ नाटकी म्हणजे दाखविण्यापुरतेंच होतें. आई-बापाच्या जाज्वल्य क्रोधाखालीं अशींच प्रीति असते. मनुष्याला आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांचीही जरूर लागते म्हणून तो थोडी फार घस सोसू-नही त्यांनां खुष ठेवण्याचा प्रयत्न करतो; मग त्यानें आईबापांस खूष करण्यास किती झटलें पाहिजे? आईबापांची अवज्ञा करण्यासारखें पाप नाहीं, व ग्रीक कायद्यानेंही त्याला मोठा दंड ठेवला आहे. कारण ज्यानें आपल्या आईबापांचा अपमान केला असेल त्याला कोठलाही मोठा अधिकार देऊं नये, असे त्यांत ठरविलें आहे. आईबापांचा अपमान

केल्यानें मनुष्य अपवित्र होतो व त्यानें केलेले यज्ञ किंवा दिलेलीं अवदानें देवाला मान्य होत नाहींत. व जर अधीकाऱ्यानें दिलेल्या अवदानांनीं देव संतुष्ट झाले नाहींत, तर देशाचें कल्याण होत नाहीं, हें लक्षांत आणूनच कायद्यानें असा निर्बंध ठेविला आहे. याप्रमाणें उपदेश करून सॉक्रेटिसनें लँप्रोक्लसला ताळ्यावर आणिलें.

कौटुंबिक आयुष्यांतील दुसरा महत्त्वाचा संबंध म्हणजे भ्रात्राभावांचा. सॉक्रेटिसच्या मतें या संबंधांत मनुष्यानें कसें वागावें हें दाखविण्यासाठीं झेनोफननें पुढील प्रसंग दाखविला आहे. सॉक्रेटिसच्या परिचयाचे कैरिफन् व कैरिक्रेटिस या नांवाचे दोघे भाऊ होते. यापैकीं कैरिफनची व वाचकांची थोडीशी ओळख आहेच. सॉक्रेटिसपेक्षां अधिक शहाणा कोणी आहे काय, म्हणून डेल्फी येथील देवाला ज्यानें कौल लाविला होता तोच कैरिफन् हा असावा. या दोन भावांचे परस्पर वितुष्ट आल्याबद्दल सॉक्रेटिसनें ऐकलें होतें. एके दिवशीं सॉक्रेटिस व कैरिक्रेटिस यांची रस्त्यांत गांठ पडली, व सॉक्रेटिसचें संभाषण सुरू झालें. सॉक्रेटिसच्या म्हणण्याचा मुद्दा असा होता कीं, जगांतील इतर मनुष्यांची संपत्ती आपणास मिळत नाहीं म्हणून त्यांचा हेवा किंवा द्वेष करण्याऐवजीं आपल्या वाट्यास जी कांहीं दौलत आली असेल तीच समाजाच्या बंधनामुळें शांततेंत उपभोगावयास सांपडते यांतच आनंद मानतो, मग आपण आपल्या भ्रात्राचाच मत्सर कां करावा ? आपला भाऊच नसता तर त्याची संपत्ती आपणास मिळाली असती, असा नीच विचार आपल्या मनांत यावा काय ? आपल्याला भाऊ असणें हीच एका तऱ्हेची संपत्ती नाहीं काय ? आपणास कोणी पाठिराखा आहे, या कारणानें आपणास आपल्या संपत्तीचा उपभोग अधिक निर्धास्तपणें घेतां येत नाहीं काय ? ज्या मनुष्याला भाऊ आहे त्याचा अपमान करण्यास देखील लोक सहसा धजत नाहींत.

कैरिक्रेटिसला हें सर्व कबूल आहे, परंतु जर आपला भाऊ सर्व जगाशीं चांगला वागत असून आपल्याशींच ताठ्यानें वागूं लागला, तर आपण तरी काय करणार ? असा त्याचा प्रश्न आहे. सॉक्रेटिस आपल्या नेहमीच्या पद्धतीला अनुसरून म्हणतो, कीं असें समजा, की आपणाजवळ एक कुत्रा आहे, शेळ्यामेंढयांचें राखण करण्यांत तो मोठा पटाईत आहे, आपल्याबरोबर येणाऱ्या धनगराशीं तो मोठ्या लडिवाळपणानें नाचतो, बागडतो हेंही आपण पहातो, परंतु आपण स्वतः त्याजजवळून जावयास लागलों तर तो गुरगुरतो, फुसकारतो व जवळही येत नाहीं. तर आपण अशा कुत्र्याला हुसकून देऊं कां ? किंवा त्याला आपलीच ओळख पटावी, त्यानें आपणाजवळही लडिवाळपणानें यावें, असा प्रयत्न करूं ? आपल्या भावाला खुष करण्यासाठीं कैरिक्रेटिसला कांहीं मोठी विद्याच अवगत करावयास नको. ही गोष्ट अगदीं साधी आहे. ज्या मित्रानें हव्यकव्यप्रसंगीं आपणास जेवावयास बोलवावें अशी आपली इच्छा असते, त्याला आपण आधीं आपल्या घरीं तशा प्रसंगीं बोलावावयाचा प्रघात पाडतो. साराश, दुसऱ्यानें आपणास जसें वागवावें अशी आपली इच्छा असेल, त्याप्रमाणें आपण त्याच्याशीं वर्तणूक ठेविली पाहिजे. आपणच आपल्या भावाशीं मोठ्या स्नेहानें वागलों, तर तो तरी ताठयानें कसा वागेल ? कैरिक्रेटिसला आपण सुरुवात करण्यांत संकोच वाटत असला तरी तो त्यानें टाकून दिला पाहिजे. पशुजातीमध्यें देखील एका [illegible] प्राणी अधिक प्रेमानें वाग[illegible] मनुष्यांनीं त्याजपेक्षांही [illegible] व्हावें काय ? ज्यांचा उपयोग [illegible] परस्पर सहाय्य हा आहे, त्यांचा एकमेकांना आडकाठी करा[illegible] दुरुपयोग व्हावा काय ? [illegible] भावानें दुसऱ्या [illegible] आडवावें हे [illegible] कोणाच्याही फायद्याचें नाही. परमेश्वरानें आपणास जसे दोन डोळे [illegible], दोन पाय, इत्यादि [illegible] अनुरूप अवयव दिल्यामुळें आप[illegible] मोठा कार्यभाग होतो, व [illegible] अवयवांकडून एकट्यानें जें

काम झालें नसतें त्याच्याहून कितीतरी पट काम होतें, त्याप्रमाणेंच एका भावास दुसऱ्या भावाचें साह्य झाल्यास घडेल. फार काय, पण या अवयवांच्या जोडीपेक्षांहि भावाभावांची जोडी अधिक कार्यक्षम होईल. कारण दोन डोळ्यांनां, दोन हातांनां, दोन पायांनां परस्परांपासून भिन्न-स्थळीं राहूनहि सहकारिता साधतां येत नाहीं. पण स्नेहपाशांनीं बद्ध झालेल्या भावांमध्यें कितीही अंतर असलें तरी त्यांच्या सहकारितेच्या तो आड येऊं शकत नाहीं.

आपल्या स्वतःच्या कुटुंबापेक्षां अधिक विस्तृत कार्यक्षेत्रांत उपयोगीं पडणारी महत्वाची गोष्ट म्हणजे मैत्री किंवा स्नेह हा होय. या विषया-संबंधीचें आपले विचार सॉक्रेटिसनें निरनिराळ्या प्रसंगीं व्यक्त केले आहेत. ज्याप्रमाणें प्यारमिडीस व लॅचेस या संवादांत अनुक्रमें नियमित-पणा व धैर्य यांच्या स्वरूपाविषयीं प्रश्न सुरू होऊन अखेर कांहीं एक निर्णय न होतांहि त्या त्या गुणांविषयीं सूचक विचार मात्र प्रदर्शित करण्यांत आले आहेत, त्याचप्रमाणें लिसिस ( Lysis ) या संवादांत मैत्री किंवा स्नेह म्हणजे काय, या प्रश्नाचा खल होऊन अनिश्चयांतच त्याचा अंत होत आहे. मैत्रीविषयीं कांहीं सूचक कल्पना मात्र यांतही आहेत. फीड्रस व सिंपोसियम् या संवादांत पुनः ह्याच विषय किंचित निराळ्या स्वरूपानें पुढें आला आहे. परंतु या संवादांतील विचारांत सॉक्रेटिसपेक्षां प्लेटोचीं मतेंच अधिक दिग्दर्शित झालीं आहेत असें साधारणः वाटतें; व म्हणून या ठिकाणीं वरील संवादावर फारसा आधार ठेवतां येत नाहीं. झेनोफनच्या पुस्तकांत या विषयांवर त्यानें तीन स्फुट लेख लिहिले आहेत, त्यांतील विचार प्रस्तुत विवेच-नाला विशेष आधारभूत आहे.

पायथॅगोरसच्या पंथाची हकीगत लिहितांनां त्यांतील पुरुषांच्या मतै-क्यामुळें किंवा साधारणतः बौद्धिक परिश्रमांच्या साम्यामुळें कसे दृढ स्नेहसंबंध जुळून येत, व पायथॅगोरसचा पंथ दिवसेंदिवस आपआपल्यांत

किती दृढबद्ध व इतर समाजापासून किती अलग होई हें दाखविलेंच आहे. सॉक्रेटिसच्या भोंवतीही अनुयायांची नेहमीं गर्दी असे, व त्यांजबरोबर संभाषण करतांनां सॉक्रेटिस फारच प्रेमळपणानें वागे. सॉक्रेटिस आपल्या अनुयायांनां कधींही आपले शिष्य म्हणवीत नसे, तर तो त्यांच्या साह्यानें सत्यशोधन करण्याचा प्रयत्न करीत आहे, असें म्हणे, व त्याप्रमाणें त्याची वागणूकही असे. त्याचप्रमाणें एखाद्या महंताच्या आढयतेला शोभण्यासारखें प्रवचन करण्याचा त्याचा प्रघात नसून बरोबरीची मित्रमंडळीं एकमेकांशी मोकळया मनानें गप्पा गोष्टी सांगतात त्याप्रमाणें केवळ संभाषण करीत असतां असतांच तत्त्वविषयक प्रश्नांची चर्चा होई. ही विशेष रीत परस्परांच्या स्नेहपोषणाला विशेषच अनुकूल असे. सॉक्रेटिस हा विशेष प्रेमळ असल्यामुळें त्याला ही पद्धति पसंत पडली, किंवा त्या पद्धतींतील इतर गुणांवरूनच ती पसंत पडून तिचा अनुषंगिक परिणाम या स्नेहप्रवृत्तींत झाला हें सांगणें मोठें कठीण आहे. सॉक्रेटिसचा वर्तनांत तत्त्ववेत्ता व मित्र यांचें बेमालूम मिश्रण झालें आहे येवढें खरें; कारण अतीशय उच्च अशा तत्वांचा अभ्यास करतांना त्याला आपल्या मित्रांची संगती सुटत नसे, व स्नेहयुक्त संभाषणांत तत्त्वविचारांवाचून दुसरा विचार होत नसे.*

---

*The question can hardly be asked, which came first with him, which afterwards; whether friendship-needs made the philosophy of Socrates take the form of continuous dialogue, or the need of common inquiry drew him towards all who felt the same want. It is his peculiarity and this it is which makes him the philosophic lover drawn by Plato-that he could neither in research dispense with association with others, nor in friendly intercourse dispense with research.

Zeller: Socrates and the Socratic schools.

ज्याची नैसर्गिक स्नेहप्रवृत्तीहि इतकी जबरदस्त, त्यानें त्या गुणांबद्दल मोठ्या आदरानें बोलणें अगदींच साहजिक, आणि त्यांतही त्या गुणाची सहजसुंदरता त्यांतच मिळाली. प्रेमळ मित्र म्हणजे एक अपूर्व ठेवा आहे, व त्यासाठीं आपण वाटेल ती चीज सोसण्यास तयार असलें पाहिजे, पण इतकें असूनही कित्येक लोक आपल्या मित्राची पर्वा करीत नाहींत हें खरोखरच आश्चर्य नव्हें काय ? लोक आपल्या गुलामांनांही अधिक चांगल्या रीतीनें वागवतात, व प्रत्यक्ष मित्रांविषयी उदासीनता पत्करतात, हें केवढें अज्ञान ! त्यांच्या जमिनी पुष्कळ असल्या तरी त्यांची त्यांनां तपशीलवार आठवण रहाते, पण त्यांचे मित्र हातांबोटांवर मोजण्याइतकेच असून देखील त्यांना त्यांची विस्मृति होते, याला काय म्हणावें ? कवी म्हणतात त्याप्रमाणें परमेश्वरच योग्य मित्रांची गांठ घालीत असला पाहिजे. कारण मित्रप्रेमामध्यें असेंच कांहीं दैविक तेज आहे; परंतु मनुष्य मात्र आपल्या अज्ञानानें त्याची ओळख धरीत नाहीं.

मित्रस्नेहाचा महिमा वर्णन करून चांगला मित्र कसा असावा याचेंही त्यानें विवरण केलें आहे. मित्रस्नेहाचा उद्देश म्हणजे उभयतांचें नैतिक हित, हाच असल्यामुळें त्या स्नेहाचें साधन सद्गुणी वर्तणूक, दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्याची इच्छा व त्याजविषयीं आदर, हें आहे. जर आपणांस आपलें हित साधावयाचें आहे, तर मैत्री संपादन करावयाची ती उत्तम माणसाचीच संपादिली पाहिजे. आणि त्याला उपाय म्हणजे आपण त्याच्यासारखे होण्याचा प्रयत्न करावयाचा. 'समानशीलव्यसनेषु सख्यं' हें सुभाषित सुप्रसिद्धच आहे. पेरिक्लीजसारख्या पुरुषाला लोकांचें प्रेम संपादन करतां आलें तें कशामुळें ? लोककल्याणाचीं कामें करण्यास, लोकसेवेचे कष्ट उचलण्यास, आपण अगदीं एका पायावर तयार आहोंत, हें त्यानें सिद्ध करून दाखविलें, व जो मनुष्य आपल्या हितासाठीं झटत आहे असें आपल्या प्रत्ययास येतें, तो मनुष्य आपणास सहजच प्रिय होतो. त्याचप्रमाणें दुसऱ्याची मैत्री संपादन करतांना आपण

त्याच्याजवळ नेहमीं आदरपूर्वक भाषण करावें. सायरिन्स नांवाच्या जल-देवतांनां युलाइसिसला थांबवावयाचें होतें; त्यावेळीं त्यांनीं जें भाषण केलें म्हणून होमर कवि म्हणतो, तें असें:–देवता म्हणाल्या "Oh, stay! oh pride of Greece, Ulysses, stay" आपण दुसऱ्याशीं आदरानें बोललों म्हणजे त्याला आपणाविषयीं संशय रहात नाहीं; व आपण त्याची फजीती उडवूं इच्छित नाहीं अशी खात्री झाल्यामुळें तोही आपल्याशीं मोकळेपणानें वागतो. खुद्द सॉक्रेटि-सच्या संभाषणांत दुसऱ्यास खुष करून त्याला आपल्या मताकडे हळू-हळू वळविल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. परंतु दुसऱ्याशीं आदरानें वागावयाचें याचा अर्थ त्याच्या अंगीं नसते गुण लादावयाचे असें नाहीं. आपल्या मित्राची देखील अवास्तव स्तुती करणें अगदीं अयोग्य आहे, असेंच सॉक्रेटिसचें म्हणणें आहे. तो क्रिटोब्यूलसला म्हणतो कीं, मला तुझी व दुसऱ्या कोणाची मैत्री जोडावयाची असली तरी मी तुझ्या अंगीं नसलेले गूण तुजमध्यें आहेत असें कधींही म्हणणारा नाहीं. समजा कीं, क्रिटोब्यूलसच्या अंगीं नाव चालविण्याचें कसब मुळींच नाहीं, तथापि तें आहे अशी सॉक्रेटिसनें त्याची अवास्तव स्तुती केली, व ती ऐकून एखाद्यानें खरोखरच क्रिटोब्यूलसच्या ताब्यांत आपल्या जहाजाचें सुकाणूं दिलें, तर केवढा अनर्थ गुजरेल? राजका-रणांत तर याजपेक्षांही मोठा अनर्थ होईल. सारांश, दुसऱ्याचे योग्य गुण ओळखून त्याचे कौतुक करावें व दुर्गुणाबद्दल कानउघाडणी करावयाची तीही मोठ्या खुबीनें करावी, हाच सॉक्रेटिसच्या म्हणण्याचा मथितार्थ.

चांगला मित्र म्हणजे तोच कीं, जो केवळ स्वार्थपरायण न होतां आपल्या मित्राचें हित पाहतो, प्रसंग पडल्यास आपल्या मालमत्तेकडेही पहात नाहीं, व आपल्या मित्राच्या अभ्युदयामध्येंच आनंद मानतो.

तत्त्वज्ञानाची जशीजशी वाढ झाली त्यात्याप्रमाणें मैत्रीसारख्या प्रश्नांना फार गौण स्थान आलें, परंतु सॉक्रेटिसच्या काळीं हा विषय

फार महत्वाचा समजला जात असे. त्याकाळीं तरुण व सुंदर मुलांवर प्रीति करण्याची एक टूमच निघाली होती. सॉक्रेटिसला या पद्धतींतील कांहीं दोषांचा फारच तिटकारा असे, परंतु एकंदरींत त्याचें वर्तन व मत त्याला अनुकूलच होतें.

सॉक्रेटिसच्या स्नेहसंबंधीच्या विवेचनांत हा एक मोठा दोष आहे कीं, तें हितानहिताच्या अगदीं हिशोबावर उभारल्यामुळें अगदींच बाजारी प्रेमासारखें भासतें. सुखदुःखाच्या, हितानहिताच्या, फायद्यातोट्याच्या केवळ बाह्यउपाधींवरच प्रेम अवलंबून नाहीं, असा अनुभव काय कमी प्रसंगीं येतो ? भवभूतीनें म्हटल्याप्रमाणें 'व्यतिषजति पदार्थान्नान्तरःकोऽपि हेतुः। न खलु बहिरुपाधी प्रीतयः संश्रयन्ते ' हेंच खरें नव्हे काय ? परस्पर विरुद्ध पक्षाच्या मताचे, आचारविचारांचे पुरुषही कित्येक प्रसंगीं अनिवार्य व अलक्ष्य अशा बंधनांनीं एकत्र ओढले जातात, यांतील इंगित काय ? इत्यादि विचार मनांमध्यें उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहींत. मनुष्यांच्या मनांमध्यें जें साहजिक प्रेम दिसून येतें, त्याला उपयुक्ततेच्या, शीलसाम्याच्या, किंवा अनुषंगिक लाभाच्या योगानें पुष्कळदां मदत होते ही गोष्ट खरी; परंतु हीच कांहीं स्नेहसंबंधाची पूर्ण उपपत्ति नव्हे. त्याचप्रमाणें मैत्री असावयाची ती भिन्नलिंगीयांमध्यें विवाहविचारांशिवाय कोठपर्यंत जाऊं शकेल ? स्नेहसंबंधाचें मूळ स्वारस्य लुप्त झालें तरी तो तसाच राखावा कीं तोडावा, व तोडावयाचा असल्यास कितपत तोडावा ? स्नेहसंबंध कायम रहाणारा आहे कीं भंगुर आहे ? तो सारख्यांतच जुळतो कीं परस्पर विरुद्धभूमिकाही एकत्र करतो, इत्यादि प्रश्नांचा सॉक्रेटिसनें मुळींच उहापोह केला नाहीं. तत्त्वज्ञानाच्या परिपक्व स्थितीमध्यें या विषयाला गौण भाग आला तरी सामाजिकदृष्ट्या वरील प्रश्नांना बरेंच महत्त्व असल्यामुळें त्यांजवरील सॉक्रेटिसाचे विचार फार बोधप्रद झाले असते.

समाजांत स्त्रियांचा दर्जा काय असावा, याबद्दलचे सॉक्रेटिसचे विचार त्याच्या वेळीं प्रचलित असलेल्या मतांशीं ताडून पाहतां प्रागतिकच वाटतात; परंतु सध्याच्या सुधारणामय युगांत ते अनुदार आहेत असेंहि कोणास वाटण्याचा संभव आहे. स्त्रियानां बौद्धिक किंवा शारीरिक शिक्षण देऊं नये असा कांहीं त्याचा आग्रह नव्हता. उलट तें देण्याविषयीं तो फार अनुकूल होता. व स्त्रियांची बुद्धिमत्ता अगदींच अल्प नसते, व प्रसंगविशेषीं त्यांजपासूनही शिकण्यासारखें पुष्कळ असतें, हें त्यानें आपण स्वतः ॲस्पॉशिया, डायोटिमा, वगैरे स्त्रियांजवळही संवाद करून दाखविलें; परंतु एकंदरींत स्त्रियांची विशेष कामगिरी म्हणजे अपत्योत्पत्ति व अपत्यसंगोपन हीच समजली पाहिजे, असें त्याचें म्हणणें आहे. यावरूनच झेलरनें असे उद्गार काढले आहेत कीं, विवाहाविषयीं बोलतांना सॉक्रेटिस हा ॲस्पॉशियाचा मित्र म्हणून भाषण न करता झँटिपीचा नवरा, या नात्यानेंच बोलत आहे असें वाटतें.* परंतु एकंदर स्त्रीसमाजाविषयीं विचार करतांनां सॉक्रेटिसनें केवळ पूर्वग्रहावरूनच मत दिलें असेल हें संभवनीय दिसत नाहीं. झँटिपीची गोष्ट अगदीं अपवाद म्हणून बाजूस ठेऊनहि सॉक्रेटिसचें वरीलप्रमाणें मत होणें अशक्य नाहीं. आपल्या देशामध्येंहि हेंच मत थोड्या फार भेदांनीं प्रचलित होतें, व अद्यापिही आहे. या मताविषयीं औचित्यविचार करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें, त्याविषयीं विशेष चर्चा न करतां आपण सॉक्रेटिसच्या दुसऱ्या मताकडे वळूं.

आपलें कुटुंब किंवा मित्रमंडळ याजपेक्षांही समाज ही अधिक व्यापक संस्था असल्यामुळें, त्याजविषयींचे विचारही अधिक महत्वाचे आहेत;

* Ce still speaks of married life in terms more in keeping with the husband of Xanthippe, than with the friend of Aspcia.

( Zeller: Socrates and the Socratic Schools. )

व समाजाचें शासन कोणत्या रीतीनें व्हावें, हा त्यातील मुख्य प्रश्न आहे. जर मनुष्याला संघटित समाजामध्यें रहावयाचें असेल, तर त्याला शासित किंवा शास्ता या दोन वर्गांपैकीं कोठल्यातरी एका वर्गांत राहिलेंच पाहिजे. यापैकीं शासितवर्गांतील लोकांचें पहिलें कर्तव्य म्हणजे आपल्या संस्थानांतील कायदे पाळणें हें आहे. संस्थानांचे कायदे पाळण्याचें इतकें महत्त्व आहे कीं, न्याय्य काय, याचा विचार सुरू असतांना सॉक्रेटिसानें कायद्यास धरून असलेलें वर्तन न्याय्य, असा निर्णय दिला असल्याचें मागील एका प्रकरणांत सांगितलें आहे. स्वतः सॉक्रेटिसकडे कायद्याप्रमाणें जीं जीं कामें आलीं, तीं तीं त्यानें चोख रीतीनें बजावलीं व अखेर त्याच्या जिवावर बेतली असतांही केवळ कायदा पाळण्याच्या हेतूनें तुरुंगांतून पळून जाण्याचे त्यानें नाकारलें. या ठिकाणीं येवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, स्वतः सॉक्रेटिसनें कायदा पाळल्याचीं जितकीं महत्वाचीं उदाहरणें आहेत, तितकींच तीं मोडल्याचींहि दाखवितां येतील. आपल्या देशांतील अधिकारी, आपण उपदेश करणें बंद ठेवावें म्हणून हुकूम करीत असतां, तो आपण मान्य करणार नाहीं, असें त्यानें त्यांच्या तोंडावर सांगितलें; व अशा अटींवर आपलें जीवितसंरक्षण करण्यास आपण तयार नसल्याचें कळविलें. या परस्पर विरुद्ध दिसणाऱ्या आचरणांतील एक तत्त्व हेंच कीं, ज्या ठिकाणीं आपली सदसद्विवेकबुद्धि अगर ईश्वरी प्रेरणा आपणास अमूक एक कायदा अयोग्य आहे असें सांगेल, ज्या ठिकाणीं मानवी कायदा हा दैवी कायद्याचा विरोधी होईल, त्या ठिकाणीं मानवी कायदा सोडून दैवी कायद्यासाठीं मनुष्यानें वाटेल ती झीज सोसण्यास तयार झालें पाहिजे; पण अशा प्रसंगींही केवळ शरीरसौख्याकडे पाहून मानवी कायदा टाळण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां धैर्यानें त्याला तोंड दिलें पाहिजे. अशा रीतीनें अथेन्सपेक्षां कोणी अधिक

श्रेष्ठ असेल तर तो देवच, हा की सर्वांपेक्षां अथेन्स व त्याचे कायदे हाच काय तो मुख्य आधार.

ज्यांकडे नेहमी 'शासित' या वर्गांतच राहण्याचें काम आलें आहे त्यांनां हा नियम झाला, परंतु शासनासंबंधींही आपणास तसाच विचार केला पाहिजे. पहिल्या प्रथम लोकांचा शास्ता होण्याचा अधिकार कोणाला आहे, याचा निर्णय झाला पाहिजे. सर्व सद्गुणांचें मूळ ज्याप्रमाणें ज्ञानांत आहे, त्याप्रमाणें राजकारणांतील कर्तबगारीचें मूळही ज्ञानांत आहे. ज्या मनुष्याला खरोखर राजकीय विषयांचें खरें ज्ञान आहे, तोच सत्ता चालविण्यास योग्य आहे. त्यावेळीं अथेन्समध्यें लोकसत्तात्मक राजपद्धति होती व लोकांनीं निवडून दिलेल्या अधिकाऱ्यांकडे सर्व सत्ता असे, परंतु सॉक्रेटिसच्या मतें ही पद्धती अगदीं चुकलेली आहे. लोकांनीं एखाद्या मनुष्याला आपण होऊन निवडून दिला किंवा त्यानें लांचलुचपत देऊन आपणास निवडवून घेतलें, तर त्याला राजकारणांतील ज्ञान नसल्यामुळें त्याची निवडणूक ही देशाच्या फायद्याची न होतां उलट विघातक मात्र होणार. जर एखाद्या नावेला कर्णधार पाहिजे असेल किंवा एखाद्या रोग्याला औषध-योजना करावयास वैद्य हवा असेल, तर आपण तें काम करण्यास कोणाची बहुमतानें निवड करतो ? उलटपक्षीं ज्याला नौकानयन किंवा औषधि यांचें ज्ञान असेल तोच मनुष्य अशा वेळीं पुढें होऊन त्याचें म्हणणें इतरांनीं मान्य करावें हाच योग्य मार्ग नाहीं काय ? मग जी गोष्ट नौकानयनाची किंवा रोगचिकित्सेची, तीच राजकारणाचीहि आहे. अमुक एक मनुष्य अधिकारावर निवडून आला, येवढ्यावरच कांहीं त्याची योग्यता ठरत नाहीं.

सॉक्रेटिसचें हें सर्व म्हणणें ठीक आहे, परंतु पुढें प्रश्न असा येतो कीं, सॉक्रेटिस ज्या माणसांच्या हातीं सत्ता असावी असें म्हणतो, त्या माणसांच्याच हातांत ती यावी अशाबद्दल त्याची काय योजना होती ? सॉक्रेटिसनें अशी कांहींच योजना सुचविली नसल्यामुळें त्याच्या वरील

मतांत सत्यांश असूनही त्यामुळें अतिशय गैरसमज मात्र होतो. सॉक्रेटिस हा एक बौद्धिक अभिजनसत्तेचा (Intellectual Aristocracy) पुरस्कर्ता आहे, व या बुद्धिमत्सत्तेची स्थापना इतर विशिष्ट पक्षाच्या सत्तेप्रमाणें केवळ जुलुम जबरदस्तीवरच होणार असा साहाजिक समज होतो. अथेन्समध्यें तीस अंमलदारांच्या सत्तेपारखी जी सत्ता कांहीं प्रसंगीं निर्माण झाली होती, त्याप्रमाणेंच ही एक निराळ्या नांवाची पण सारख्याच अनर्थाची एक शासनपद्धति आहे असा लोकांचा समज होणें अपरिहार्य आहे. सॉक्रेटिसच्या विरुद्ध जी फिर्याद झाली तिच्या मुळाशी असा कांहींतरी गैरसमजच असावा असें अनुमान करण्यास कांहीही हरकत नाहीं. सॉक्रेटिस हा त्याच्या दृष्टीनें अनधिकारी पुरुषांनां राजकारणांत न शिरण्याविषयीं उपदेश करी, व उलट त्याच्या मित्रांपैकीं कित्येकांना त्याच राजकारणांत शिरण्याबद्दल आग्रहहि करी. यावरून लोकांचा सहजच असा समज होई की, सॉक्रेटिसला सर्व सत्ता एका विवक्षित पक्षाच्याच हातीं असावी असें वाटतें व त्याच दृष्टीनें त्याच्या अनेक खटपटी सुरू आहेत.

बुद्धिविशिष्ट पुरुषांकडे श्रेष्ठत्व देण्याविषयीं किंवा तें बुद्धिविशिष्ट पुरुषांनीं आपणाकडे घेण्याविषयीं सोफिस्टांचा कटाक्ष होता, पण या ठिकाणींही सॉक्रेटिस व सोफिस्ट यांच्या धोरणांत फार अंतर आहे. त्याच्या मतें राजकीयसत्तेचें ध्येय व्यक्तिविषयक उत्कर्ष नसून समाजहित हें आहे, तदनुरूप शिक्षण म्हणजे कौशल्य नसून सत्यज्ञान आहे, आणि आपल्या ध्येयसिद्धीचें साधन मोहक भाषण नसून सत्यज्ञानाची मिमांसा हें आहे. सॉक्रेटिसला ज्ञान हवें तें राज्य सुधारण्याचें परंतु सोफिस्टांचा सर्व डोळा त्याच्या अधिकार सूत्रांवर! *

*For him, the aim of politics was not the power of the individual, but the well-being of the community; the object of training was not to acquire personal

सॉक्रेटिसच्या मतांमध्यें सृष्टिविषयक प्रश्नांच्या उहापोहाला विशेष महत्व नाहीं. त्याचा मुख्य भर नैतिक प्रश्नांवरच असे, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. परंतु भौतिक सृष्टीविषयीचा सॉक्रेटिसनें एका विशिष्ट दृष्टीनें मात्र विचार केलेला आढळतो. प्रथम पुष्पांतील माध्यमिक पंथाचा ॲनॅक्झॅगोरॅस, याजविषयीं लिहितांना त्यानें बुद्धिमत्कर्तृत्वादाचा ( किंवा teleology चा) पाया घातला म्हणून म्हटलें आहे, परंतु ॲनॅक्झॅगोरॅसच्या मतामध्यें सृष्टिविषयक विविधविचारांची इतकी खिचडी झाली आहे कीं, त्यांमध्यें याच मताला प्रामुख्य आलेलें दिसत नाहीं. व या कारणामुळेंच प्रस्तुत मताच्या जनकत्वाचा मान सॉक्रेटिसकडे देण्यांत येतो. प्रत्येक वस्तूविषयीं विचार करतांना त्या वस्तूचा मनुष्याला उपयोग काय, या प्रश्नाची चर्चा करण्याचा सॉक्रेटिसचा अभ्यासच असल्यामुळें सृष्टीविषयीं विचार करतांनाही तिचा मनुष्याच्या हिताशी संबंध काय, याच प्रश्नाचा सॉक्रेटिसनें प्रमुखत्वानें विचार केला आहे; व तिची अत्यंत उपयुक्तता दाखवून, ज्याअर्थीं मनुष्य कोठचेंही उपयुक्त काम बुद्धिशिवाय करूं शकत नाहीं, त्याअर्थी हा सृष्टिरूप उपयुक्त व्यापारही कोणातरी बुद्धिविशिष्ट पुरुषाकडूनच होत असला पाहिजे, असें अनुमान काढलें आहे. सृष्टीची सर्व रचना केवळ मनुष्याच्या हिताकडे नजर देऊन केली आहे असें दाखविण्यासाठीं सॉक्रेटिसनें पुष्कळ गोष्टी पुढें आणिल्या आहेत. मनुष्याला हवा, पाणी, उजेड, उष्णता, यांची किती जरूरी आहे, व हे पाहून त्यांचा विपुल संग्रह मनुष्याला अगदीं

---

dexterity, but to attain truth; the means of culture was not the art of persuation but the science of what is. Socrates aimed at a knowledge by means of which the state might be reformed, the Sophists at one by which it might be governed.

Zeller: Socrates and the Socratic Schools

फुकट देण्यांत आला आहे. मनुष्याला कदाचित् हा दिवसाचा प्रकाश पुरेसा होणार नाहीं, त्याला रात्रींही थोडाफार तरी उजेड असावा म्हणून चंद्र व तारे यांची किती उत्कृष्ट सोय करण्यांत आली आहे. आपलें पोषणच नव्हे तर आपली अगदीं चैन चालावी म्हणून पृथ्वीमध्यें किती विविध पदार्थांनां उत्पन्न करण्याची शक्ति ठेविली आहे ? ही नाना तऱ्हेचीं फळें व धान्यें पिकावीं म्हणून ऋतूंची रचना तरी किती खुबीनें साधली आहे ? हिवाळ्यांत फुलणारीं फुलें, व पिकणारीं फळें, आपणास मिळावीं म्हणून सूर्य दक्षिणीकडे झुकत जातो, पण जर तो अगदींच दक्षिणेच्या टोकाला निघून जाईल तर उत्तरप्रदेशांतील आपणासारखे लोक थंडीनें मरून जातील; म्हणून तो पुनः उत्तरेकडे परत फिरतो, व वसंतादिक ऋतूंच्या फलपुष्पांनीं आपणास सुखी केल्यावर, आपणास त्याच्या उष्णतेची बाधा होऊं नये म्हणून पुनः दक्षिणेकडे वळतो. केवळ जमीनीपासून उत्पन्न होणारे पदार्थ मनुष्याच्या सुखाला कमी पडतील असें वाटून इतर प्राण्याची देखील मनुष्याच्या सुखासाठीं योजना करण्यांत आली आहे. गाई, म्हशी, इत्यादि प्राण्यांपासून त्याला दूध मिळतें व एका दुधापासूनच कितीतरी पदार्थ बनतात. घोड्यासारखा प्राणी मनुष्याला स्वार होऊन इकडे तिकडे फिरावयाला, गाड्या ओढण्याला व लढाईलाही उपयोगी पडतो. अशी यादच देऊं लागलें तर कोठवर तरी लांबेल.

या जगांत पुष्कळ सुखकारक वस्तु असल्या, परंतु त्यांचा उपभोग घेण्यास मनुष्याला जर साधनच नसतें तर काय फायदा ? पण मनुष्याला उत्कृष्ट व उपभोगक्षम अशीं इंद्रियें कशीं देण्यांत आलीं आहेत व त्याची शरीररचना तरी किती शिताफीनें केली आहे ? जगांत सुखदर्शक अशा अनंत वस्तू असूनही आपणांस त्या पाहाण्यास डोळेच नसते तर त्यांचा काय उपयोग होता ? आणि या डोळ्यांची रचना तरी किती कौशल्याची आहे ? हें इंद्रिय फार नाजूक आहे, व

त्याचें नीट जतन व्हावें म्हणून केवढी व्यवस्था ! त्याचें रक्षण व्हावें म्हणून त्याच्यापुढें पापण्यांचे जाड पडदे लावले, व त्याच्या व्यापाराला त्यानें प्रतिबंध होऊं नये म्हणून डोळा उपयोगांत यावयाचा असेल त्यावेळींच त्या वर जाव्या व झोपेच्यावेळीं किंवा डोळ्यांस विश्रांति हवी असेल त्यावेळीं त्या मिटाव्या, अशी योजना झाली. डोळ्यांत धूळ जाऊन तो बिघडूं नये म्हणून त्याला पापण्यांच्या केसांची जाळी लावली व कपाळावरील घाम एकदम डोळ्यांत शिरेल या भीतीनें भुवईचा सुंदर बांध बांधला. सुखदर्शन वस्तूंच्या दर्शनलाभासाठीं जशी डोळ्यांची रचना तशीच रसोपभोगासाठीं जिव्हेचीही तरतूद करण्यांत आली. श्रवण-सुखासाठीं कान केले, आणि त्यांची किती सुबक रचना केली, सुगंध घेण्यास घ्राणेंद्रिय सज्ज करून ठेविलें. ही व अशीच सर्व अवयवाचीहि गोष्ट आहे पहा. त्यांतही या अवयवांची ठेवणही किती कुशलतेची आहे. आपण जें खाणार तें आपल्या डोळ्यांना दिसावें, व नाकाला त्याचा वास यावा, व अशा रीतीनें आपणांस त्या अन्नांतील गुणदोष स्पष्टपणें दिसून त्याची ग्राह्याग्राह्यता ठरावी, व तें अन्न अग्राह्य असल्यास वेळींच त्याचा प्रतिकार व्हावा म्हणूनच तोंडाची जागा नाक व डोळे यांच्याखालीं नेमण्यांत आली. पशूंनां दोन पायांवर चालतां येत नाही, पण मनुष्यांना येते, व त्यामुळें त्यांचा केवढा तरी फायदा होतो ! या रीतीनें त्यांची उंची वाढल्यामुळें त्यांनां दूरच्या वस्तु दिसतात, आपलें संरक्षण अधिक चांगलें करतां येतें, व याच योजनेमुळें पुढील दोन पायांऐवजी दोन हात झाल्यामुळें केवढी तरी अचाट कामें सहज सिद्ध होतात. इतकेंही असून जर मनुष्याला बुद्धीच नसती तर काय उपयोग होणार होता ? पण ही उणीव दूर करावी म्हणून त्यानेंच मनुष्याला बुद्धिसंपन्न केलें, त्याच्यामध्यें अपत्यप्रेमासारखे चिरस्थायी कोमल मनोविकार उत्पन्न केले, आणि त्यांनां भाषा उत्पन्न करून ती वापरण्याची कल्पकता दिली. असेंच

वर्णन करून सांगू लागल्यास त्याचा अंतच लागणार नाहीं. इतकें झाल्यावरही मनुष्याच्या सुखयोजनेंत कांहीं कमतरता राहील तर, त्याला भर म्हणून पुढें काय होणार, हें देवतासंचारानें आधींच कळावयाचीही सोय झाली.

या जगतांतील कुशलतेची व उपयुक्ततेची ही सर्व व्यवस्था पाहून दोनच गोष्टी सिद्ध होतात. एकतर या जगताचा कोणी तरी मोठा बुद्धिमान् जनक व पालक असला पाहिजे; व दुसरी गोष्ट अशी कीं, या जगत्कर्त्याचें मनुष्यप्राण्यांवर अतिशय प्रेम असलें पाहिजे. या सर्व मतांतील सॉक्रेटिसची विचारसरणी शास्त्रशुद्ध तर्कावर रचलेली नाहीं ही गोष्ट खरी, परंतु ज्याप्रमाणें त्याच्या नीतिमिमांसेंत कांहीं दोष असूनही त्याला त्या शास्त्राचा पाया घालण्याचा मोठा मान मिळाला, त्याप्रमाणेंच या बुद्धिकर्तृकवादांतही त्याचें नांव अग्रस्थानीं पडलें आहे; व तत्त्वज्ञानाच्या उत्कर्षानंतरही या मतामध्यें किती तरी ग्राह्यांश भरलेला आहे. ज्या मतानें सॉक्रेटिसपासून मिलपर्यंत सरासरी दोन हजार वर्षेपर्यंत लोकांच्या मनावर परिणाम केला, तें मत महत्वाचेंच असलें पाहिजे हें कोणासही सकृद्दर्शनींच समजण्यासारखें आहे. केवळ तर्कास प्रतितर्क व उदाहरणास प्रत्युदाहरण दाखवूं लागल्यास सॉक्रेटिसच्या या मताशीं पुष्कळच वितंडवाद घालतां येईल. उदाहरणार्थ एखादा वादी असें म्हणूं शकेल कीं, जर आकाशांतील तारे बुद्धिमत्कर्तृक असते तर त्यांची अशी बेडौल मांडणी न होतां कांहीं तरी विवक्षित आकारांत किंवा नक्षींतच त्यांची ठेवण व्हावयास पाहिजे होती; व मनुष्यप्राण्याच्या सुखाकरितांच सर्व गोष्टी व्हावयाच्या असत्या तर त्याला अतिशय त्रास देणारे व प्रसंगविशेषीं प्राणांतक होणारे प्राणीच जन्मास आले नसते. अशाच रीतीनें दुसऱ्या बाजूकडेही तर्क व उदाहरणें यांचा संग्रह होईल. या दोन्ही पक्षांतील सबल निर्बल कोणता हें ठरविण्याचें प्रकृतस्थळ नव्हे. सध्यां आपणास सॉक्रेटिसच्या मतांचीच विशेष ओळख

करून घ्यावयाची आहे. खुद्द सॉक्रेटिसला हें जगत् सुव्यवस्थित व सुखावह आहे असेंच वाटलें, व त्यावरून त्यानें त्याचें कर्तृत्व बुद्धियुक्त व परम दयाळू अशा परमेश्वराकडेच आहे असें ठरविलें. या मतांतील दुसरा मोठा दोष म्हणजे मनुष्याला सर्व सृष्टीच्या मध्य स्थानीं मानणें हा आहे आपली पृथ्वी स्थिर असून तिच्या भोंवतीं शुक्रादिक ग्रह, सूर्यादि ज्योतिर्गण, व अनंत तारकापुंज नियमितपणें प्रदक्षिणा घालीत जात आहेत, हें ज्योतिःशास्त्रांतील प्राचीन मत ज्याप्रमाणें सर्व सृष्टींत केवळ उपेक्षयश्या ठरणाऱ्या एकाच गोलाला अवास्तव महत्व देऊन पुढें मांडण्यांत आलें, त्याचप्रमाणें सॉक्रेटिसच्या या मतांत अनंत सृष्टीमध्यें एखाद्या क्षुद्र कीटकाप्रमाणें वावरणाऱ्या मनुष्यप्राण्याला अवास्तव महत्त्व देऊन सर्व सृष्टी जणूकाय त्याचीच मनधरणी करावयासाठीं उत्पन्न झाली आहे असें दाखविण्यांत आलें आहे. जगतांतील मनुष्यांची आजची स्थिती पाहिली तर सर्व जग केवळ त्याच्या सुखाकरितां आहे हें म्हणणें आत्मप्रत्ययाच्या विरुद्ध आहे. सृष्टींत मनुष्य इतका क्षुद्र भासत असून त्याला असामान्य महत्त्व आहे, कारण त्याजमध्यें अत्युच्च शक्ति बीजरूपानें वास करीत असून तिचा विकास झाल्यास तो जगताच्या चालकाशीं एकरूप होतो, ‘ पशुकीं होत पन्हय्या, नरका कच्छु नहि होय। नर करनी करे तो नरका नारायण होय, ’ या मतांत व सॉक्रेटिसच्या विचारसरणींत फार अंतर आहे. तथापि हा प्रश्न सध्यां बाजूला सारून आपण सॉक्रेटिसच्या मताकडेच वळूं.

हें जगत् इतकें सुव्यवस्थित आहे, त्याअर्थी त्याचा कर्ता ईश्वर हा बुद्धिगुणोपेत असला पाहिजे; व ही सृष्टिव्यवस्था मनुष्याला इतकी सुखकर आहे त्याअर्थीं तो मोठा दयाळू असला पाहिजे. येवढें अनुमान झाल्यावर पुढें असा प्रश्न येतो कीं, हा देव एकच आहे कीं असे अनेक देव असून ज्याप्रमाणें पुष्कळ बुद्धिमान् लोक एकत्र होऊन एखादें उपयुक्त कार्य करतात, त्याप्रमाणें त्यांनीं ही सृष्टी उत्पन्न

केली आहे ? सॉक्रेटिस हा भिन्न भिन्न प्रसंगीं एकेश्वर व अनेकेश्वर मतांना अनुकूल अशी भाषा वापरतो. ज्या ज्या प्रसंगीं त्यानें अनेक देवांचा उल्लेख केला आहे, त्या त्या प्रसंगीं त्याच्या मनांत प्रचलित अनेक देवांविषयीं बोलावयाचें असावें असें वाटतें. आपल्या देशांमध्यें ज्याप्रमाणें अगदीं वेदकालांपासून आजपर्यंत इंद्रचंद्रवरुणादिक अनेक देवता रूढ आहेत, त्याप्रमाणेंच सॉक्रेटिसच्याकाळीं अनेक देवता रूढ असून त्यांची पूजाअर्चा होत असे. सॉक्रेटिस कांहीं ठिकाणीं एकाच ईश्वराविषयीं उल्लेख करीत असला तरी तदंशभूत किंवा त्याचें प्रतिनिधिभूत म्हणून इतर देवांविषयीं आदर व भक्ति बाळगणें हें कांहीं वावगें नाहीं. या बाबतींत हिंदूधर्म व ग्रीकधर्म यांचें फार साम्य आहे. निरनिराळ्या देवता प्रचलित असतांही त्यांचे एकत्व दाखविणारी वाक्यें वेदांतूनही आढळतात. एकाच सद्वस्तूला विप्र म्हणजे ज्ञातेपुरुष निरनिराळीं नांवें देतात, एकाच अग्निला यम, मातरिश्वा, अशीं नांवें देतात, असें वचन ऋग्वेदांतही आहे. सॉक्रेटिसच्या मतांतही एकदेववाद व बहुदेववाद यांचा असाच बेमालुम मिलाफ झालेला आहे. देवाच्या निरनिराळ्या विभूतीचेंच वर्णन करावयाचें असल्यास सॉक्रेटिस त्यावेळच्याच रूढ कल्पनांप्रमाणें वागे, परंतु अत्यंत श्रेष्ठ अशा एकाच ईश्वराचें स्वरूप सांगावयाचें झाल्यास तो या जगताच्या बुद्धिस्थानीं अगर आत्मस्थानीं आहे असें तो म्हणे; व याच स्वरूपलक्षणांवरून तो परमेश्वराविषयींच्या आणखी कांहीं कल्पना कशा सिद्ध होतात हें दाखवी. देव आहे, तर तो आम्हांस दिसत कां नाहीं ? असा कोणी आक्षेप घेतल्यास, त्याला सॉक्रेटिसचें असें उत्तर होतें कीं, ज्याप्रमाणें आपणांस मनुष्याचा आत्मा किंवा बुद्धि दिसत नाहीं, परंतु ती बुद्धि किंवा तो आत्मा आहे असेंच आपणांस म्हणावें लागतें, त्याप्रमाणेंच परमेश्वर दिसला नाहीं तरी तो आहे असेंच म्हटलें पाहिजे. सर्व विश्व हें शरीर असून परमेश्वर किंवा ब्रह्म, शरीरीं अगर आत्मा आहे, हा

विचार आपल्या शास्त्रासही पसंत असून त्यावरूनच ब्रम्हमीमांसेलाच शारीरिकमीमांसा ही संज्ञा पडली आहे. असो. ज्याप्रमाणें आत्मा अदृश्य आहे, त्याप्रमाणेंच परमात्माही अदृश्यच आहे. ज्याप्रमाणें आत्मा हा सर्व शरीरांत भरलेला आहे, त्याप्रमाणेंच देवही या विश्वांत सर्वत्र भरलेला आहे. आत्म्याची हुकमत शरीरावर चालते; परमेश्वर सर्व विश्वावर सत्ता चालवतो. आत्म्याला शरीरबंधनासारखी तीव्र उपाधी असतांही जर त्याला भूतभविष्यवर्तमान गोष्टींचा विचार करतां येतो, नानाविध वस्तूंविषयीं तर्क बांधता येतो, व अचाट कार्यें करतां येतात; तर परमेश्वराचें ज्ञान, परमेश्वराचें कर्तृत्व, अगाध, अनंत, असावें हें साहजिकच आहे. ज्याप्रमाणें वारा अदृश्य असूनही त्याचें कार्य दिसतें, त्याप्रमाणें देव अदृश्य असूनही आपणावरील त्याच्या प्रेमाचा व अगाध ज्ञानाचा थोडासा प्रत्यय आपणास प्रसंगविशेषीं येतो. जो बिकट प्रश्न आपणास सुटत नाहीं, तो प्रश्न डेल्फिच्या देवाला कौल लावून आपणास सोडवून घेता येतो, व असा हा देवतासंचार म्हणजे देवाच्या अस्तित्वाबद्दल व दयाशीलत्वाबद्दल अल्पसा पुरावाच आहे, असें सॉक्रेटिसचें मत होतें.

आपल्या व्यक्तिविषयक अनुभवाच्या दृष्टीनें सॉक्रेटिस कधींकधीं आपणास वेळोवेळीं होणाऱ्या दृष्टांताचाही उल्लेख करतो. अगदीं लहानपणापासून डेमनचा साक्षात्कार होत असे, या गोष्टीचा उल्लेख सॉक्रेटिसबरोबर संभाषण करतांना इतरांच्या व त्याच्या स्वतःच्याही भाषणांत येतो. हा डेमन कोण, त्याचें स्वरूप काय, इत्यादि प्रश्न सॉक्रेटिसच्या चरित्रांत महत्वाचे आहेत, व याच ठिकाणीं त्यांचा थोडासा विचार करणें जरूर आहे. कित्येकांच्या मतें हा डेमन व त्यांची सूचना म्हणजे केवळ सदसद्विवेकबुद्धि व तिचा व्यापार होय. ज्या ठिकाणीं एखादी गोष्ट चांगली अगर वाईट आहे असें आपल्या अंतस्थबुद्धीस वाटते, परंतु त्याबद्दल योग्य कारणें देतां येत नाहींत, त्याठिकाणीं आपणांस याच सदसद्विवेकबुद्धीच्या अस्फुट व्यापारावर हवाला द्यावा लागतो. सॉक्रेटिसचा

डेमन व त्याची सूचना अशाच प्रकारची आहे, असा त्यांच्या मताचा निष्कर्ष आहे. ही उपपत्ती साधारण बरी दिसते, परंतु ती खरी धरून चालण्यास अशी एक अडचण आहे कीं, सॉक्रेटिस इतरांचे ठिकाणीं या प्रकाराची शक्यता मानताना आढळत नाहीं. जर डेमन व त्याची सूचना म्हणजे सदसद्विवेकबुद्धि व तिची सूचना असेल, तर प्रत्येक मनुष्याला या द्वारानें आपल्या पुढील बिकट प्रश्नाचा निर्णय करतां येईल; परंतु सॉक्रेटिस आपल्या मित्रांना अशा प्रसंगीं देवाचा कौल लावण्याचा उपदेश करीत असे, व आपण स्वतः मात्र केवळ याच सूचनेवर अवलंबून राही. यावरून हा प्रकार सर्वमान्य बुद्धीचा नसून विशेष साक्षात्काराचाच असला पाहिजे हें दिसतें.

कित्येक लेखक म्हणतात कीं, हा साक्षात्कार म्हणजे एक तऱ्हेचा वेडाचा झटका किंवा वायूची लहरच होता. परंतु सॉक्रेटिस हा अगदीं पूर्णपणें भानावर असताना व अत्यंत महत्वाच्या बाबींत ज्या गोष्टीवर अवलंबून असे, त्या गोष्टीला वेडाची अगर वायूची लहर म्हणणें म्हणजे मोठेंच चमत्कारिक आहे. सॉक्रेटिसच्या चरित्राचें किंचित् अवलोन केलें तरी आपणास त्याचा धीमेपणा व विचारीपणा चांगला प्रत्ययाला येतो. असा पुरुष केवळ वेडाच्या लहरीवर अवलंबून राही हें म्हणणें शोभण्यासारखें तरी आहे काय ? मग ही वेडाची अगर वाताची लहर सॉक्रेटिसकडे जात नसून या लेखकावरच कृपाप्रसाद करीत असल्यास नकळे !

या साक्षात्काराविषयीं बोलताना सॉक्रेटिस नेहमीं गंभीरपणा पत्करीत नाहीं ही गोष्ट खरी, तथापि हा साक्षात्कार म्हणजे एक दैविक स्फूर्ति असल्याबद्दल त्याची स्वतःची खात्री होती, व त्याप्रमाणेंच तो आपलें आचरण करण्यास कधींही चुकत नसे, ही गोष्ट अगदीं खरी आहे. हा साक्षात्कार त्याला अगदीं अल्पस्वल्प बाबतींतही होई हेंहि खरें; परंतु तो अत्यंत महत्त्वाच्या बाबतींतही होई, व तितक्याच दृढश्रद्धेनें पाळला जाई, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आपल्या फिर्यादीच्या वेळेस

अगोदरपासून भाषण तयार न करण्यास त्यानें या साक्षात्कारांचाच हवाला दिला आहे. हा साक्षात्कार विधायक नसून निषेधक असे; परंतु जेथें निषेध नसेल तेथें त्याची अनुकूलता आहे, असेंच धरून चालण्यास हरकत नव्हती. परमेश्वरीय साक्षात्काराचा हा अनुभव सॉक्रेटिसला येत असून आपणांस येत नाहीं, असें कोणी म्हटल्यास सॉक्रेटिस डेल्फीच्या देवासारख्या देवांच्या साक्षात्कारावर हवाला देई. यावरून हा डेमनचा साक्षात्कार म्हणजे आपल्या अगदीं बाल्यापासून आपणावर देवाची मर्जी असल्याची खूण आहे, असेंच सॉक्रेटिसला वाटत असावें असें सिद्ध होतें.

वर दर्शविलेल्या अनेक विचारांनीं सॉक्रेटिस परमेश्वराचें अस्तित्व कसें सिद्ध करी, व त्याचें अदृश्यत्व, सर्वसमर्थत्व, सर्वस्थानवर्तित्व, दयाळुत्व, इत्यादिकांविषयीं कशीं अनुमानें बसवी, याचें दिग्दर्शन होईल. यापुढील दुसरा प्रश्न म्हणजे परमेश्वराच्या उपासनेविषयीं होय. ज्याअर्थीं परमेश्वर आपणावर येवढी दया करतो, व आपल्या हितासाठीं येवढी योजना करतो, त्याअर्थीं आपणासही आपली कृतज्ञता व्यक्त केलीच पाहिजे; कारण अकृतज्ञतेसारखें दुसरें निंद्य कांहींच नाहीं. ही कृतज्ञता व्यक्त करण्याचा मार्ग म्हणजे उपासना, प्रार्थना, यज्ञयाग वगैरे होत, असें सॉक्रेटिस म्हणतो. ही उपासना करताना आपापल्या देशाच्या रूढीला अनुसरून मनुष्यानें वागावें व देशांतील कायद्यांनीं किंवा रूढींनीं जीं जीं धार्मिक कर्में आपणास प्राप्त आहेत तीं तीं चोख रीतीनें बजावावीं. अशा नियमबद्ध वर्तनाचें उत्कृष्ट उदाहरण खुद्द सॉक्रेटिसनेंच घालून दिलें होतें, व अथीनियन कायद्याप्रमाणें व रूढीप्रमाणें प्राप्त होणारीं सर्व कर्में तो योग्यरीतीनें करीत असे. अगदीं मरतां मरतां देखील तो या विधींना विसरला नाहीं, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

परमेश्वराची प्रार्थना करून त्याजजवळ आपण कांहीं विशिष्ट वस्तूची याचना करूं नये, बाह्य सुखोपभोगांची तर मुळींच याचना

करूं नये; तर आपलें कल्याण ज्यांत असेल तेंच देवानें द्यावें असें मोघमच मागणें मागावें, असें सॉक्रेटिसचें मत होतें. आपलें खरें कल्याण कशांत आहे हें आपणापेक्षां देवालाच अधिक चांगलें समजतें; म्हणून आपण आपलें हित त्याजवरच सोपवावें. आपल्या भ्रांतिरूप ज्ञानानें आपण अहितकर वस्तूंची याचना करून फशी पडण्याचाच संभव अधीक म्हणून देवावरच विश्वास टाकावा. आम्हांस या ठिकाणीं कौषीतकि ब्राह्मणोपनिषदांतील प्रतर्दनाच्या आचरणाची आठवण झाल्याखेरीज रहात नाहीं. यालोकीं असामान्य पराक्रम गाजविल्यामुळें ज्यावेळीं प्रतर्दन इंद्रलोकांत गेला, त्यावेळीं इंद्रानें त्याला ‘ वर माग ’ असें म्हणताच त्यानें इंद्रावरच सर्व हवाला दिला, व ‘ महाराज, आपणांस जो वर मनुष्याला अत्यंत हितकर आहे असें वाटत असेल, तोच वर मला द्यावा. ’ असें भाषण केलें, व त्यामुळेंच त्याला इंद्राकडून सत्यज्ञानाचा उपदेश मिळाला.

हिंदुधर्मांतील विचारांशीं अगदीं तंतोतंत जुळणारा सॉक्रेटिसचा दुसरा विचार म्हणजे, यज्ञयागाच्या अगर अन्नदानादिकांच्या सापेक्ष योग्यतेविषयींचा एखाद्या यज्ञाची अगर दानाची किंमत यजमानाच्या अगर दात्याच्या अंतःकरणस्थ श्रद्धेवर अवलंबून आहे; बाह्यसाधनसामग्री भरपूर असूनही एखाद्या यज्ञाची किंमत अगदीं हलकी ठरेल, व अगदीं अल्प सामग्रींत केलेली पूजाही श्रद्धेच्या व भक्तीच्या उत्कर्षामुळें बिनमोल ठरेल. हें तत्त्व दाखविण्यासाठीं आपल्या वाङ्मयांमध्यें कितीतरी सुप्रसिद्ध पौराणिक गोष्टी आहेत. विदुराच्या कण्या, सुदाम्याचे पोहे, द्रौपदीच्या स्थालींतील एकच भाजीचें पान, या गोष्टी आपल्याकडील आबालवृद्धांना ठाऊकच आहेत, व त्यांतील तत्त्वच सॉक्रेटिसनेंही मान्य करून पुढें मांडलें आहे. मनुष्यानें दृढ श्रद्धेनें व उत्कट भक्तीनें, आपल्या अनुकूलतेप्रमाणें परमेश्वराची सेवा करावी, म्हणजे त्यांतच परमेश्वराची प्रसन्नता आहे.

मनुष्याच्या आत्म्यामध्यें दैवी शक्ति आहे, अशी सॉक्रेटिसची दृढ भावना होती. हा जीवात्मा अमर आहे किंवा नाहीं, याविषयीं सॉक्रेटिसचें काय मत होतें तें पाहूं. मनुष्य मेल्यावरही त्याचा आत्मा परलोकीं असतो अशाबद्दल ग्रीक लोकांमध्यें फार जुन्या काळापासून समजूत चालू होती. मृतांकरितां यज्ञ करणें, गवतावर रक्त ओतणें, मृताला दिलेले बळी जाळणे, इत्यादि गोष्टींविषयीं होमर कवीच्या काव्यांत उल्लेख नाहीत; तथापि ग्रीक लोकांमध्यें या चाली रूढ होत्या असें सुप्रसिद्ध मॅक्समुल्लर यांचें म्हणणें आहे. होमरनंतरचे कवी पिंडर, इस्किलस, सोफोक्लीज यांच्या ग्रंथांमध्ये या समजुतीचा अधिक स्पष्ट उल्लेख आहे. मरणानंतरही आत्म्याला परलोकांत अस्तित्व असून त्याला आपल्या कृतकर्मांचीं सुखदुःखात्मक फळें तेथें भोगावीं लागतात, आपल्या पूर्वीच्या शत्रुमित्रांविषयींचे त्याचे रागद्वेषादि विकार तेथेंही कायम असतात, इत्यादि मताचा त्या त्या ग्रंथकाराच्या वेळीं ग्रीक जनसमाजामध्यें बराच प्रसार झाला असावा असें वाटतें. सारांश, सॉक्रेटिसच्या पूर्वी व त्याच्या काळीं लोकांमध्यें परलोकाविषयींच्या कांहीं कल्पना रूढ होत्या; परंतु त्यांना बुद्धीच्या किंवा तर्कशास्त्राच्या जोरावर प्रस्थापित करण्याचा अद्यापि प्रयत्न झाला नव्हता.

या प्रश्नाविषयीं खुद्द सॉक्रेटिसचे मत काय होतें हें निःसंशय सांगणें मोठें कठीण काम आहे. या विषयाचा विशेष उहापोह प्लेटोच्या फीडो नामक संवादांत आहे; परंतु या अप्रतिम संवादांतील कोणता भाग प्लेटोचा व कोणता खुद्द सॉक्रेटिसाचा, हें ठरविणें फार कठीण आहे. प्लेटोच्या संवादामध्यें अमुक एक संवाद किंवा संवादांश सॉक्रेटिसचीच मतें दाखविणारे व बाकीचे भाग प्लेटोचीं मतें देणारे, असा कायमचा निकाल करणें दुरापास्त आहे. सॉक्रेटिसचा स्वतःचा असा एकही ग्रंथ नाहीं कीं ज्यांतील प्रमेयांशीं प्लेटोच्या संवादांतील प्रमेये ताडून पहातां येतील, आणि त्यावरून त्यांचा असॉक्रेटिक व सॉक्रेटिक असा स्पष्ट

भेद पाडतां येईल. अशा प्रसंगीं प्लेटोच्या माहितीची सत्यासत्यता ठरविण्यास झेनोफनचा ग्रंथ उपयोगी पडतो; परंतु आत्म्याच्या अमरत्वाविषयीं झेनोफननें कोठेही विवेचन केलेलें आढळत नाहीं. त्याच्या सायरस नामक कथानकांत सायरस यानें आपल्या पुत्रांस मरतें वेळीं जो उपदेश केला आहे, त्यामध्यें मात्र आत्म्याच्या अमरत्वाविषयीं विचार प्रकट केले आहेत व ते विचार प्लेटोच्या 'फीडो'तील विचारांशीं जुळतात. या ठिकाणीं असा प्रश्न उपस्थित होतो कीं, सॉक्रेटिसचा चांगुलपणा दाखवून त्याची निर्दोषता सिद्ध करण्यासाठीं झेनोफेननें सॉक्रेटिसचे विविध उपयुक्त विषयांवरील जें संस्मरणीय विचार एकत्र केले, त्यांमध्यें अमरत्वाविषयीं कांहांही विचार न करता एका कल्पित कादंबरीच्या कथानकांतच ते गुंफले. सॉक्रेटिसची आत्म्याच्या अमरत्वाविषयींची कल्पना झेनोफनला अज्ञात असून ती त्याला अन्य मार्गानें अगर स्वतःच्या बुद्धीनेंच कळली होती म्हणून ती त्यानें आपल्या कथानकांत गोविली काय? पण तसेंच असेल तर प्लेटोच्या विचारांशीं त्याचे विचार इतके जुळतात ही आश्चर्याचीच गोष्ट नव्हे काय? प्लेटोशीं किंवा सॉक्रेटिसशीं ज्याचा कांहांही संबंध पोंचत नाहीं अशा एखाद्या लेखकाच्या ग्रंथांत हे विचार सापडले, किंवा भारतीय उपनिषदासारख्या प्राचीन ग्रंथात तत्सदृश विचार दिसले तर गोष्ट निराळी, पण एकाच गुरूच्या दोन शिष्यांत जेव्हां इतकें विचारसाम्य आढळतें, त्यावेळीं त्या साम्याचें बीज त्यांच्या साहाध्यायीपणांत व त्यांच्या गुरूच्याच विचारांत असावें असें वाटणें अगदीं अपरिहार्य आहे. झेनोफननें या प्रश्नाचा 'सॉक्रेटिसच्या आठवणी' (Memorabilia) मध्यें उल्लेख न करण्याचें कारण असें देतां येईल कीं, हा विषय सामान्य लोकांच्या दृष्टीनें गहन आहे, व म्हणून सॉक्रेटिसचा निरुपद्रवीपणा सिद्ध करण्यास त्याचा फारसा उपयोग नाहीं. एखादा मनुष्य आत्म्याच्या अमरत्वावर विश्वास ठेवीत असला म्हणजे तो अन्याय्य उपदेश करणारच नाहीं असें कांहीं सिद्ध होत नाहीं. त्याचा निरुपद्रवीपणा दाखवि-

ण्यास त्याच्या उपदेशांतील सामान्य नीतीचा भागच अधिक स्पष्टपणें पुढें आणिला पाहिजे. या कारणासाठीं झेनोफननें या प्रश्नावरील विचारांची उपेक्षाच केली असेल, परंतु हे विचार त्याच्यासारख्या तत्त्ववेत्त्याला अत्यंत महत्वाचे असल्यामुळें मनांत सारख घोळणें अगदीं साहजिक होतें; व त्याचा परिणाम सायरसनें मरणसमयीं आपल्या पुत्रांस केलेला उपदेश हा असावा. उलटपक्षीं प्लेटोचा उद्देश सॉक्रेटिसचें तत्त्वज्ञान ग्रथित करण्याचाच असल्यामुळें त्याला कोणताच प्रश्न सोडता येण्याजोगा नव्हता.

याच गोष्टीची दुसरी उपपत्ती अशी लावता येईल कीं, सॉक्रेटिसची आत्म्याच्या अमरत्वाविषयीची कल्पना झेनोफनला तिच्या परिणत स्वरूपांत कधींही ऐकावयासच सांपडली नसेल. सॉक्रेटिसच्या अंतकाळापूर्वीच झेनोफन हा धाकट्या सायरसबरोबरच्या सैन्यांत सामील होऊन पारसिक देशांतील मोहिमेवर गेला होता, व तो सॉक्रेटिसच्या मृत्यूनंतर अथेन्सला आला, व तेथील परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें जो एकदा अथेन्स सोडून गेला तो कित्येक वर्षेंपर्यंत कधींही परत आला नाहीं. त्याला झालेली हद्दपारीची शिक्षा मागाहून रद्द करण्यांत आली होती, पण या बदलेल्या परिस्थितीचाही त्यानें उपयोग केल्याचें दिसत नाहीं. सॉक्रेटिसचें अमरत्वाविषयींचे विचार जर त्याच्या मरणकालींच अधिक परिणत झाले असतील तर झेनोफनचें व प्लेटोचें वर्णन यांत विरोधच नाहीं असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

सॉक्रेटिसचे कांहीं विचार अपरिणत असून त्यांचाच परिपोष करून प्लेटोनें फीडो या संवादाची रचना केली असेल हें शक्य आहे; परंतु हा परिपोष करतानाही प्लेटोनें सॉक्रेटिसच्या विचारांची मूळ रूपरेषा अगदींच टाकली असण्याचा संभव नाहीं. जे विचार खुद्द प्लेटोचेच असा विद्वज्जनांचा अभिप्राय झाला आहे, ते विचार मूळ आधार धरून फीडोंतील विचारसरणी आंखली आहे; परंतु या संवादांत आपणास शुद्ध सॉक्रेटिसचे विचार न दिसतां ते प्लेटोच्या बुद्धिरूपी विशिष्ट वर्ण-

गोलकांतून संक्रांत स्वरूपांत दिसत आहेत, ही एक सावधगिरीची कल्पना बाळगून फीडोचा विचार केला, व अशा रीतीनें गाळून आलेलीं प्रमेयें दुसऱ्या सॉक्रेटिस म्हणून ठरलेल्या संवादांशीं ताडून पाहिलीं, म्हणजे आपणांस खुद्द सॉक्रेटिसचें मत पुष्कळ अंशीं बरोबर रीतीनें समजलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

वरील फीडो या संवादांत ग्रीककवि इव्हेनस ( Evenus ) याजवरून भाषण सुरू होऊन सॉक्रेटिसनें असा सिद्धांत सांगितला कीं, खरा तत्त्वज्ञानी हा नेहमीं मरणाला तयार असतो, परंतु तो आत्महत्त्या मात्र करीत नाहीं. कारण तसें करणें अन्यायाचें आहे. आत्महत्त्या न करून घेण्याचें कारण असें कीं, ज्याप्रमाणें एखाद्या कैद्याला तुरुंगाचें दार फोडून जाण्याचा अधिकार नाहीं, त्याचप्रमाणें परमेश्वरानें आपणास ज्या देहरूपी कारागृहांत टाकलें आहे, त्याचा बलात्कारानें त्याग करणें हा एक गुन्हा आहे. दुसरें कारण असें कीं, मनुष्य परमेश्वरनिर्मित असल्यामुळें त्याचा आहे, व आत्महत्या करणें म्हणजे परमेश्वरी सत्ता झुगारून देण्यासारखें आहे. या ठिकाणीं कोणी असा प्रश्न विचारील कीं, जर आपण देवांच्या अधिकाराखालीं आहों तर तत्त्वज्ञान्यानें मरणाची इच्छा तरी कां करावी, किंवा तयारी तरी कां ठेवावी? सॉक्रेटिस यावर उत्तर देतो कीं, मरणानें मनुष्य एका देवापेक्षां अधिक चांगले असे दुसरे देव व एका मित्रमंडळापेक्षां अधिक प्रेमळ मित्रमंडळ ज्या ठिकाणीं असतें त्या ठिकाणीं जातो म्हणून त्याला वाईट वाटण्याचें कारण नसतें. शिवाय सत्यज्ञानाला शरीर हें एक मोठी अडचण असल्यामुळें आत्म्याला निःशरीर होणें आवडतें. तत्त्वज्ञाचा आत्मा त्याच्या जीवितकाळीं देखील शरीराकडे दुर्लक्ष करून आपला व त्याचा संबंध शिथिल करूं पाहातो, मग तोच अनिष्ट संबंध कायमचाच तुटत असेल तर त्याला दुःख वाटण्यापेक्षां आनंद वाटावा हें साहजिकच आहे.

या ठिकाणीं असा प्रश्न येतो कीं, शरीराचा परित्याग केल्या-बरोबर आत्मा हा धुरासारखा हवेंत मिसळून जाऊन नाहींसा होणार नाहीं म्हणून कशावरून ? या प्रश्नाला उत्तर म्हणून सॉक्रेटिस प्रथमतः जुन्या ऑर्फिक मताचा हवाला देतो. या ऑर्फिक मताविषयींचें दिग्दर्शन पहिल्या पुष्पांतील पहिल्या प्रकरणामध्यें केलें आहे. मेलेल्या मनुष्यांचे आत्मे पाताळामध्यें जातात, व सध्या जीवमान असलेल्यांचे आत्मे तेथूनच येतात, असा त्या मताचा इत्यर्थ आहे. याच मताला पोषक असा सामान्य सिद्धांत हाच कीं, परस्परविरुद्ध गोष्टींची एकमेकां-पासूनच उत्पत्ति होत असते. जागृतींतून सुषुप्ति व सुषुप्तीतून जागृति. मोठेपणांतून लहानपण व तसेच उलट लहानपणांतून मोठेपण व त्याचप्रमाणें जननांतून मरण व मरणातून जनन हाच उत्पतिमार्ग ठरलेला आहे. सध्याचे जीवमान प्राणी मृत्युविषयांतून येऊन शेवटीं पुनः मृत्यूमध्यें प्रवेश करतील, तरच सृष्टिचक्राचा एक फेरा बरोबर पुरा होईल.

आत्म्याच्या पूर्वकालीन अस्तित्वाविषयीं दुसरें प्रमाण म्हणजे ज्ञानाची स्मृतिरूपता हें होय. मनुष्याचें सर्व ज्ञान हें स्मृतिरूप आहे. त्याला कांहीं शिकविणें म्हणजे त्याच्या ज्ञानावर आलेलें विस्मृतीचे पटल दूर करणें इतकेंच. व ज्या अर्थीं अशी स्मृति ज्ञानमूलक आहे. त्या अर्थीं तें ज्ञान ज्याकाळीं संपादन झालें त्याकाळीं आत्मा असलाच पाहिजे. यावरून आत्म्याचें पूर्वकालीन अस्तित्व सिद्धच झालें. या जन्मीं आपण ज्याविषयाचा कधींही अभ्यास केला नाहीं, त्याविषयांचेंही आपणांस कांहींसें ज्ञान असतें याचें एक प्रमाण, मेनो व फीडो या संवादांत सारखेंच दिलें आहे. एखाद्या अगदीं नीरक्षर माणसापुढें आपण एखादी भूमितीची आकृति धरली. तर त्याला त्या विषयांतील थोडेसें अस्पष्ट, संदिग्ध ज्ञान आहे असें आपणास आढळून येईल. याशिवाय मनुष्याच्या मतामध्यें ज्या कांहीं शुद्ध कल्पना असतात त्यांवरूनही या पूर्वकालीन

ज्ञानाचें अनुमान करतां येतें. आपणास अगदीं सारखे असे दोन पदार्थ कधींही आढळत नाहींत. तथापि त्या दोन पदार्थांच्या सारखेपणाची कल्पना याच विशुद्ध साम्यकल्पनेवर अवलंबून आहे; व ज्याप्रमाणें वस्तूच्या परिमितत्वापूर्वीं परिमाण अस्तित्वांत असावें लागतें, त्याप्रमाणेंच ज्या साम्य कल्पनेनें हें सापेक्ष्य साम्य मोजावयाचें, तिजविषयींही आपणास पूर्वींच ज्ञान पाहिजे, व ही कल्पना सध्यांच कोणी दिली नसल्यामुळें पूर्वकालीन असावी.

वरील मुद्यांवर आत्म्याचें प्रागस्तित्व कबूल केलें तरी त्याचें उत्तर-कालीन अस्तित्व संदिग्धच राहतें. मरणानंतर आत्मा धुरासारखा नाहींसा होत नसेल कशावरून? त्यांतही मरणकालीं जर मोठा वारा सुटला असेल तर हा संभव अधिकच. या वादाला प्रत्युत्तर म्हणजे पूर्वीं एकदां दिलेलें—विरुद्धजनन पद्धति हें होय. त्याप्रमाणें मृत्यूमागून पुनः जीवन असलेंच पाहिजे. मृत्युकाळीं कांहीं विनाश पावत असलेंच तर तें मर्त्य शरीर; पण आत्मा दैविक अंशाचा असल्यामुळें नाश पावत नाहीं. हें मर्त्य शरीर देखील मसाल्यांत ठेविलें तर कितीतरी दिवस टिकतें, मग दैविक अंशाचा आत्मा त्याजपेक्षां अधिक टिकूं नये काय? शरी-राच्या उपाधीमुळें जो आत्मा इंद्रियविषयक वस्तूंमध्येंच गुरफटला, तो कदाचित् हीन जातीच्या प्राण्यामध्यें प्रवेश करीत असेल; व ज्यांनीं उच्च तत्त्वज्ञान न समजतां पण नीतिशुद्ध वर्तन ठेवलें, ते बऱ्या प्राण्यांच्या जन्माला जात असतील; पण ज्या मनुष्याला खऱ्या तत्त्वज्ञानाचा लाभ झाला, त्या मनुष्याचा आत्मा मनोविकाराच्या तमःपटलांतून व या शरीरांत त्याला खिळवून टाकणाऱ्या सुखदुःखकल्पनांतून मोकळा झाला.

सॉक्रेटिसच्या ऐहिक आयुष्यांतील आज शेवटाचाच दिवस आहे, व विषाचा पेला देण्याची वेळ जवळ जवळ येत चालली आहे. अशा वेळीं त्याजबरोबर जास्त वाद करण्याची कोणास इच्छा होऊ नये हें साहजि-कच आहे. पण या शंकांबद्दल सॉक्रेटिसला मोठें आश्चर्य वाटतें. तो

मरावयाचा असला तरी त्याची इच्छा राजहंसासारखी शेवटपर्यंत सुस्वर गायन गात गात मरण्याची आहे. ज्यानें आपलें सर्व आयुष्य तत्त्वविचारांत घालविलें, त्याचा अंतकाळ तत्त्वविचार करीत असता असतांच व्हावा हें अत्यंत उचित. या बाबतींत आपणांस निःसंशय असा निर्णय लावता आला नाहीं तरी निदान बुद्धीला सर्वांत अधिक ग्राह्य कोणतें मत पटतें हें तरी आपणांस सांगतां येईलच.

सॉक्रेटिसच्या या भाषणानें जरा धीर येऊन सिमियस आणि सीब्स हे आपआपल्या शंका पुढें मांडतात व सॉक्रेटिस त्यांचें निवारण करतो. सिमियसचें म्हणणें असें कीं, आत्मा अमूर्त व अशरीर आहे म्हणून तो मूर्त शरीराच्या नाशामुळें नाश पावत नाहीं असें सांगण्यांत आलें आहे; परंतु आत्मा म्हणजे शरीराची एकतानता ( Harmony ) नव्हे काय ? आणि ज्याप्रमाणें सारंगीची एकतानता अमूर्त असूनही सारंगी नंतर विनाश पावते त्याप्रमाणेंच शरीरनाशानंतर आत्माही नष्ट होईल.

यावर सॉक्रेटिसचें असें उत्तर आहे कीं, आत्म्याला या शरीराची एकतानता म्हणणें चुकीचें आहे. कारण एकतानता ही सारंगीनंतर येणारी आहे, परंतु आत्मा हा शरीरानंतर येणारा नाहीं. कारण आत्म्याचें पूर्वकालीन अस्तित्त्व विशुद्ध कल्पनादिकांवरून वर दाखविलेंच आहे. याशिवाय दुसरें असें कीं, आत्मा हा शरीराची एकतानता असती तर जड मनोविकार एकीकडे ओढतात, व आत्मा दुसरीकडे ओढतो, असा प्रकारच आढळला नसता.

सीब्सचें म्हणणें असे कीं, एका शरीरापेक्षां किंवा कित्येक शरीरांपेक्षां आत्मा जास्त टिकणारा आहे असें कबूल केलें तरी तेवढ्यानेंच भागत नाहीं. जितकी म्हणून शरीरें शक्य असतील तितक्यांच्या नाशानंतरही आत्मा शिल्लकच राहतो असें दाखविलें पाहिजे, नाहींतर

आजपर्यंतच्या अनेक शरीरांचा नाश झाला तरी कायम राहिलेला आत्मा प्रस्तुत शरीराचा नाश होण्यापूर्वीच मरणार नाहीं म्हणून कशावरून? उदाहरणार्थ एखादा कोष्टी एका अगर अनेक वस्त्रांचा विनाश झाला तरी नाश पावत नाहीं ही गोष्ट खरी, पण सरते शेवटीं त्यानेंच विणलेलें एखादें वस्त्र फाटून जाण्यापूर्वीच त्याचा अंत झालेला आपण पाहत नाहीं काय? मग प्रस्तुतच्या शरीरविनाशाबरोबर किंवा त्याच्याही पूर्वी आत्मा मरणार नाहींच म्हणून कशावरून?

एकंदरीत हा प्रश्न मोठा बिकट आहे यांत कांहीं संशय नाहीं. तथापि त्याचें थोडक्यांत असें उत्तर देतां येईल कीं, परस्परविरोधी गुण एकत्र राहूं शकत नाहींत. पूर्वीं परस्परविरुद्ध गुणधर्माच्या पदार्थांची एकमेकांपासून उत्पत्ति होत असल्याबद्दल सांगितलें; पण सध्याचें हें तत्त्व गुणयुक्त विशिष्टांबद्दलचें नसून त्या गुणांबद्दल व त्या गुणांशीं अयुतसिद्ध पदार्थांविषयीचें आहे हें लक्षांत ठेवावें. उष्णता आणि शैत्य हीं एकत्र राहूं शकत नाहींत, एवढेंच नव्हे तर उष्णतेपासून कधींही विभक्त न होणारा अग्नि व शैत्यापासून असंविभक्त जळ यांचेंही एका ठिकाणीं अस्तित्त्व असणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणे जीवन व मरण हें एकत्र राहूं शकत नाहीं; व एखाद्या अनिष्ट मनुष्यास टाळावयासाठीं आपण दुसरीकडे निघून जातों, त्याप्रमाणेंच मरण आलें असें पहातांच आत्मा एक शरीर सोडून दुसऱ्या शरीरांत जात असावा हें संभवनीय दिसतें.

प्लेटोच्या काचेंतून दिसणारें सॉक्रेटिसचें विचारबिंब वरील तऱ्हेचें आहे. यांत सॉक्रेटिसचें कांहीं बीजभूत विचार प्लेटोनें आपल्या विशिष्ट मतांनीं खुलवून लिहिले असावेत. विशुद्धकल्पनांचें अस्तित्व, सर्वज्ञानाचें स्मृतिरूपत्व इत्यादि कल्पना सॉक्रेटिसाच्या इतर ठिकाणच्या भाषणांत अत्यंत अस्फुट आहेत. आत्म्याच्या अमरत्वाविषयीं बोलतांनाही अन्यत्र

ठिकाणीं सॉक्रेटिस फारच सावधगिरीनें व संदिग्धपणें बोलतो असें आपणांस आढळतें. खुद्द प्लेटोनेंच लिहिलेल्या दुसऱ्या संवादांतील उतारे आपणास हा संदिग्धपणा चांगला प्रत्ययास आणून देतात. सॉक्रेटिसवरील फिर्यादीचा प्रतिकूल निकाल लागल्यावर सॉक्रेटिसनें जें शेवटीं भाषण केलें आहे, त्यांत मरण हें कदाचित् स्वप्नशून्य निद्रेसारखें असेल, कदाचित् पूर्वकालीन महानमहान पुरुषांनीं गजबजलेल्या परलोकांत प्रवेश करण्यासारखें असेल, व या दोहोंपैकीं कांहीही असलें तरी श्रेयस्करच आहे असें दाखविलें आहे. सदर प्रसंगीं सॉक्रेटिसनें आपले कांहीं विचार मुद्दाम दडपून ठेवणें अगदींच अशक्य आहे, व त्यावरून सॉक्रेटिसचें आत्म्याच्या अमरत्वाविषयीचें मत बुद्धीच्या कसोटीस उतरलेलें नसून केवळ श्रद्धारूप असावें, व हा प्रश्न मानवबुद्धीला अगम्य अशा क्षेत्रांतील आहे, अशीच सॉक्रेटिसची समजूत असावी. झेनोफनने मरणोन्मुख सायरसच्या भाषणांत असाच कांहींसा संदिग्धपणा धरला आहे. * खुद्द फीडोमध्येंही स्वर्गनरकादिकांचें

* In Plato's Apology, at a moment when the suppression of his beliefs can leant be supposed, he expressed himself on this question with much doubt and caution. Herewith agrees so well the language used by the dying cyrus in Xenophon, that we may safely assume that Socrates considered the soul's existence after death to be indeed probable, without however pretending to any certain knowlege on the point. It was accepted by him as an aricle of faith, the intellechual ground for which belonged to those problems which surpass man's capacities.

( Zeller: Socrates and the Socratic schools. )

वर्णन करून त्याजविषयीं फारसा आग्रह न दाखवितां असेंच कांहींतरी खरें असावें असा जो सॉक्रेटिसच्या भाषणांत शेरा आहे त्यांतही याच संदिग्धपणाची छटा आहे.

आत्म्याच्या अमरत्वाविषयींचा प्रश्न अतिशय महत्वाचा आहे, व त्याजविषयीं निरनिराळ्या तत्त्वज्ञांविषयीची हकीगत लिहितांना थोडें फार विवेचन करावें लागेल. या प्रश्नाच्या उत्तराची जी परंपरा दृष्टीस पडते तीमध्यें मनुष्याच्या विचारांचा विकास कसकसा झाला हें दृष्टोत्पत्तीस येतें. हिंदूतत्त्वज्ञानामध्यें आत्म्याच्या अमरत्वाविषयीं पुष्कळ ठिकाणीं विवरण केलें आहे; त्याची व पाश्चात्य तत्त्वज्ञांच्या विचारसरणीची तुलना केल्यास तीही मोठी मनोरंजक होईल, परंतु सध्यांच त्या विषयांत न शिरतां सॉक्रेटिसच्या मतदिग्दर्शनाचें हें प्रकरण येथेंच आटोपून त्याच्या चरित्र-नाटकांतील शेवटच्या अंकाकडे वळूं.



# प्रकरण ५ वें.

---:०:---

## फिर्याद्

आपल्या देशबांधवांचें अज्ञान दूर करण्याचें व्रत पत्करल्यापासून सॉक्रेटिसनें आमरण त्याप्रमाणेंच आचरण केलें. ॲरिस्टोफेनसचें नाटक खि. पू. ४२३ ह्या वर्षीं लिहिलें गेलें. त्यावेळीं सॉक्रेटिस चांगलाच प्रसिद्धीस आला होता; व त्यावरून आपल्या मरणापूर्वीं सॉक्रेटिस हा कमीतकमी तीस वर्षेंपर्यंत तरी उघडपणें लोकांस उपदेश करीत असे, असें सिद्ध होतें. इतक्या दीर्घ कालपर्यंत त्याचा क्रम अव्याहत व उघडपणें सुरू असतां अगदीं त्याच्या वृद्धापकाळीं त्याजवर एकदम गहजब गुद-रावा, व त्याला देहांत शासनाची शिक्षा व्हावी, हें मोठें चमत्कारिक वाटतें. अथेन्समध्यें निरनिराळ्या पक्षांची चुरस सुरू असतां सॉक्रेटिस हा त्यापासून अगदीं अलिप्त होता; देशांतील प्रचलित कायद्याप्रमाणें त्याच्या वाटणीस येणारीं कामें त्यानें वेळोवेळीं योग्य रीतीनें बजाविलीं होतीं, व या शेवटच्या गहजबापूर्वीं त्याजवर कोर्टाची पायरी चढण्याचा कधींच प्रसंग आला नव्हता. आपल्या देशबांधवांच्या कल्याणासाठीं येवढी मेहनत घेणारा साधुवृत्तिपुरुष, अशा दुष्ट शिक्षेला पात्र व्हावा ही मोठी विलक्षणच गोष्ट होय; पण सकृद्दर्शनीं विलक्षण वाटणारी ही गोष्ट अथेन्समध्यें प्रत्यक्ष घडून आली. या प्रसंगाची उपपत्ती लागून, त्या-वेळच्या सॉक्रेटिसच्या बाणेदार वर्तनाचें वर्णन करणें हा प्रस्तुत प्रकर-णाचा विषय आहे.

सॉक्रेटिसच्या वादपद्धतीचा विचार केला असतां आपल्या सहजच लक्षांत येतें कीं, या पद्धतीनें लोकांचें प्रेम संपादन होण्यापेक्षां दृढमूल द्वेषच अस्तित्वांत येणें, अधिक स्वाभाविक आहे. आपल्या प्रतिपक्षाला

त्याचें अज्ञान कबूल करावयाला लावणें, हा सॉक्रेटिसचा सर्वांत महत्वाचा मुद्दा; व तो सिद्ध करण्यासाठीं सॉक्रेटिस कोणाचीही भीड-मर्यादा धरीत नसे. आपल्याशीं बोलणारा इसम मोठा पंडित म्हणून नांवाजलेला आहे, किंवा तो कवि आहे, अधिकारी आहे, राजकारणी आहे, असें पाहून कांहीं गम खाणें तर दूरच राहिलें; परंतु याच कारणांकरितां त्यांचें अज्ञान प्रथम उघड केलें पाहिजे, व इतर जनांच्या मनांतील त्यांजविषयींचा भ्रामक आदर दूर केला पाहिजे, व त्यांनांही जागें केलें पाहिजे, या विचारानें सॉक्रेटिस त्यांजवर हल्ला करी. सत्याच्याच दृष्टीनें पाहिलें तर सॉक्रेटिसचें हें करणें अत्यंत योग्य होतें. व ज्या कांहीं पुरुषांनीं आपलें अज्ञान पाहून पुनः सत्यज्ञानप्राप्तीसाठीं प्रयत्न करून त्यांत यश मिळविलें असेल असे पुरुष सॉक्रेटिसच्या या भ्रमनिरसनाबद्दल त्याचे शतशः धन्यवाद गात असतील यांत कांहीं संशय नाहीं. परंतु ज्ञानाविषयींची इतकी निःसीम लालसा बाळगून मानापमानाचा प्रश्न बाजूस ठेवणारा मनुष्य विरळाच. सामान्यत्वेंकरून मनुष्याला आपलें अज्ञान उघड झालें, आणि तेंही चारचौघांत उघड झालें तर आवडत नाहीं. ज्यावेळीं आपण एखाद्या गोष्टीचें ज्ञान प्राप्त झालें असें समजून आनंदांत किंवा आढ्यतेंत असतो, त्याच वेळेस दुसरा कोणी आपल्या ज्ञानाची फट्फजीती करूं लागला तर मनुष्य संतापून जातो. त्यांतही सॉक्रेटिसच्या पद्धतीप्रमाणें हा सर्व प्रकार अगदीं भर रस्त्यांत चालावयाचा. एखाद्या मनुष्याला अगदीं एकीकडे घेऊन त्याचा दोष दाखविला तर त्याला तितकें वाईट वाटत नाहीं; परंतु त्याच्या बरोबरीची किंवा त्यांतही त्याच्या हाताखालची मंडळी हजर असतांना त्याचा फजितवाडा उडविला तर त्याला त्याची मोठी चीड येते. आपले जे दोष दाखविले गेले ते खरे आहेत कीं खोटे आहेत, याची कसून चौकशी करण्याची बुद्धि होण्याच्या ऐवजीं भर चव्हाट्यावर आपल्या बुद्धीची अब्रू घेणाऱ्या पुरुषाचाही आपणास

केव्हां एकदां पाणउतारा करावयास सांपडेल, अगर तो केव्हां कैचींत सांपडेल व आपणही त्याला गयावया करतांना पाहूं, असें होऊन जातें. आपला दोष दाखवून आपला प्रगतिमार्ग खुला केला म्हणून त्याचे आभार मानण्याची गोष्ट तर दूरच; पण त्याच्या छिद्रान्वेषीपणामुळें आपल्याला खाली मान घालावी लागली म्हणून त्याला पाण्यांत पाहण्याची प्रवृत्तीच साहजिक अधिक; त्याचें मित्रत्व संपादून अगर त्याचें शिष्यत्व पत्करून आपलें ज्ञान सुधारण्याची गोष्ट स्वप्नांतही येणें दुर्लभ. त्याला कसा एकदां ठेचूं किंवा तुडवूं हीच द्वेषमय वांछा स्वाभाविक.

त्यांतही एखादा सामान्यच मनुष्य असेल तर त्याची इज्जत ती किती किंमतीची, व त्याचा द्वेषही काय उपयोगाचा ! परंतु सॉक्रेटिस ज्या लोकांची अब्रू घेई व त्यांच्या बुद्धीचा फोलपणा चव्हाट्यावर आणी, ते संस्थानांत नांवाजलेले पुरुष असत. त्यांनां आपली इभ्रत कमी झाली म्हणून अधिक द्वेष यावा हें साहजिकच आहे, व ते नांवाजलेले व अधिकारी पुरुष असल्यामुळें त्यांचा द्वेष त्यांनां उगवून घेणें अगदीं सुलभ होतें.

याशिवाय असें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, सॉक्रेटिस हा व्याख्यान देत नसून केवळ संवाद करीत असल्यामुळें, या अज्ञानप्रदर्शनाला व्यक्तिविषयक द्वेषाचें स्वरूप अधिकच येई. एखादा वक्ता श्रोतृसमुदायांतील कांहीं व्यक्तींचेच दोष दाखवीत असला तरी त्याला नामनिर्देश न करतां मोघमपणें बोलतां येतें, व त्यामुळें त्यानें अमुक एक व्यक्तीचाच अपमान केला असें स्पष्ट म्हणतां येत नाहीं. परंतु जेव्हां तो एकाच व्यक्तीशीं बोलतो तेव्हां त्यानें दुसऱ्याचें अज्ञानादिक दोष दाखविले तर हा अपमान अधिक स्पष्टपणें दिसतो. तसेंच एखाद्या व्याख्यानांत वक्तृत्वाच्या ओघामध्यें कित्येक गोष्टी संपादिल्या जातात. ज्या ठिकाणी गति एकाच दिशेनें असेल त्याठिकाणीं संभ्रम निदान फार होत नाहीं, पण परस्परविरुद्ध दिशेला जाणाऱ्या गतिमान वस्तूंचा संघर्ष

झाला म्हणजे आवाज होतो व प्रसंगीं ठिणग्याही पडतात. व्याख्यानांत व वादविवादांतही हाच फरक दृष्टोत्पत्तीस येतो. वक्ता एकटाच बोलत असतो व प्रत्युत्तराची आडकाठी वारंवार न आल्यामुळें त्याचा जोर तितका वाढत नाहीं; पण वादविवादच सुरू झाला म्हणजे शब्दाला प्रतिशब्द, कोटीस प्रतिकोटी, असा प्रकार वाढतां वाढतां इतका होतो कीं, त्या संघर्षांत द्वेषाग्नीच्या ठिणग्याच पडतात. दुसऱ्याशीं बोलतांना सॉक्रेटिस नेहमीं शांतवृत्ति ठेवी हें खरें; परंतु परन्यून दाखविण्याच्या या पद्धतींतील साहजिक दोष अगदींच टाळणें त्याला शक्य नव्हतें; व त्याच्या खोंचदार भाषणांचा अनिष्ट परिणाम होणें अनिवार्य होतें.

मोठमोठ्या व प्रसिद्ध व्यक्तीवर सॉक्रेटिस जी टीका करी, त्याचा अनिष्ट परिणाम खास घडून येईल असें भविष्य ॲनिटसनें पूर्वींच करून ठेविलें होतें. 'मेनो' या संवादांत सद्गुण शिकवून येतात किंवा नाहींत, याजवरून बोलणें चाललें असतां, मेनोला सद्गुणी व्हावयाचें असेल तर त्यानें मोठमोठ्या राजकारस्थानी पुरुषांकडे जावें, असा ॲनिटसचा सल्ला पडतो. सॉक्रेटिसचा यावर असा आक्षेप आहे कीं, हे थेमिस्टोक्लिस, पेरिक्लिस, इत्यादि पुरुष सद्गुण शिकविण्यास समर्थ असते तर त्यांनीं आपल्या मुलांनां खास शहाणें केलें असतें; परंतु त्यांचे मुलगे पहावे तर कुस्तींत किंवा घोड्यावर बसण्यांत मात्र पटाईत. बाकी सद्गुणांच्या नांवानें शून्यच. ॲनिटसला आपण राजकारस्थानी असल्याबद्दल अभिमान होता, व आपल्या आवडत्या राजकारणी पुरुषांची निंदा त्याला सहन न होऊन तो सॉक्रेटिसला म्हणतो, " सॉक्रेटिस, दुसऱ्याची निंदा करण्यास तूं नेहमीं एका पायावर तयार असतोस, पण माझें ऐकशील तर संभाळ, बहुतकरून असें कोठलेंहीं शहर नाहीं कीं, जेथें एखाद्याचें कल्याण करण्यापेक्षां त्याचें नुकसान करणें अधिक सोपें जाणार नाहीं. निदान अथेन्समध्यें तरी ही स्थिति आहे हें तुला ठाऊक असलेंच पाहिजे ".

( Meno ). सॉक्रेटिसवर फिर्याद करणारांपैकीं ॲनीटस हा एक असल्यामुळें वरील भाषणाला विशेष महत्व आलें आहे. ॲनीटसनें खरोखरच अशी सूचना केली होती किंवा नाहीं याबद्दल संशय असला तरी सॉक्रेटिसच्या टीकाप्रचुर भाषणाचा अनिष्ट परिणाम होत असे, हें प्लेटोलाही कबूल असल्यासारखेंच दिसतें.

ॲनीटसनें सॉक्रेटिसचा द्वेष करण्यास आणखीही एक विशेष कारण झालें होतें. ॲनीटसचा धंदा म्हणजे कमाविलेलीं कातडीं विकणें हा होता. त्याच्या मुलाला सॉक्रेटिसच्या संवादामध्यें गोडी लागली होती, व त्याची हुषारी पाहून त्यानें कातडीं विकण्याचाच धंदा करूं नये अशी सॉक्रेटिसची सूचना होती. नुकत्याच झालेल्या राजकीय उलाढालीमध्यें ॲनीटसला बरीच झीज सोसावी लागली होती, व तो आपल्या मुलानें आपणास मदत करून पुनः दौलत सांवरावी म्हणून निकड लावीत होता. आपला मुलगा सॉक्रेटिसच्या शिकवणीमुळें बिघडला व आपलें ऐकनासा झाला असें वाटून ॲनीटसचा द्वेष भडकला असल्यास त्यांत नवल करण्यासारखें कांहींच नाहीं. सॉक्रेटिस हा माझ्या मुलासारख्या दुसऱ्याही अनेक मुलांनां बिघडवीत असेल तर त्याला एकदां चांगलाच वठणीवर आणावा असा ॲनीटसचा विचार होऊन त्यानें सॉक्रेटिसवर फिर्याद केली असेल. कित्येकांचा तर असा तर्क आहे कीं, सॉक्रेटिसच्या निंदेनें ओतप्रोत भरलेलें 'मेघमाला' नांवांचें विनोदी नाटक लिहिण्यास ॲरिस्टोफेनसला ॲनीटसकडूनच प्रेरणा मिळाली होती, व पुढें मिलीटसला फिर्याद करण्यासही त्यानेंच सल्ला दिला असावा.

सारांश, सॉक्रेटिसनें आपल्या टीकास्त्रानें अनेक शत्रू उत्पन्न केले होते, व जरी त्यांची संख्या प्रथम प्रथम क्षुल्लक वाटली असली तरी हळूहळू हा शत्रुपक्ष बळावत जाऊन तोच अखेर विजयी झाला असें म्हटलें पाहिजे. सॉक्रेटिसच्या आत्मसमर्थनपर भाषणांतही याच प्राचीन व दृढमूल द्वेषाची अधिक मीति असल्याचें व्यक्त झालें आहे.

सॉक्रेटिसवरील फिर्यादीला खाजगी द्वेष कारण झाला हें कांहीं अंशीं खरें मानलें तरी तेवढ्यानेंच सर्व प्रसंगाची उपपत्ती लागत नाहीं. सॉक्रेटिसवरील फिर्याद जर केवळ खासगी द्वेषामुळेंच झाली असेल तर ती आधींच कां झाली नाहीं हें सांगता येत नाहीं. खासगी द्वेषाला कांहीं राजकीय गोष्टींची जोड मिळाल्यामुळेंच या फिर्यादीला कांहीं स्वरूप आलें. या राजकीय उलाढाली काय झाल्या त्यांचें स्वरूप संक्षेपतः सांगावयाचेंच आहे. केवळ खासगी द्वेष अशा अकल्पित रीतीनें फळास आला असता हें संभवत नाहीं. सॉक्रेटिसविषयीं लोकांची मतें दुर्ग्रह–दूषित झालीं नसतीं तर सॉक्रेटिसच्या मरणोत्तर सहा वर्षांनीं त्याच्या समर्थनासाठीं एक ग्रंथ लिहिण्याची झेनोफनला स्फूर्तीच झाली नसती. सारांश, या फिर्यादीच्या मुळांत केवळ व्यक्तिद्वेष नसून कांहीं दीर्घकालिक दुर्ग्रह असले पाहिजेत, हें उघड आहे.

अशा अनेक दुर्ग्रहापैकीं पहिला मोठा दुर्ग्रह म्हणजे सॉक्रेटिस हा सोफिस्ट आहे हा होय. आम्ही एका स्वतंत्र प्रकरणांमध्यें सॉक्रेटिस व सोफिस्ट यांजमधील भेद स्पष्ट करून दाखविला आहे, व वेळोवेळीं त्याजविषयीं अन्यत्रही उल्लेख केला आहे, त्यावरून सॉक्रेटिस व सोफिस्ट हे एक नव्हत हें स्पष्ट दिसेल; परंतु जी गोष्ट आज स्पष्टशी वाटते ती त्यावेळीं तशी नव्हती. या दुर्ग्रहालाच सॉक्रेटिस हा भौतिक शास्त्राभ्यासी आहे, या समजुतीचीही जोड मिळाली, व या उभयविध स्वरूपाचें ऐक्य करून ॲरिस्टोफेनसनें त्याची भूमिका रंगभूमीवर आणली होती. ॲरिस्टोफेसनें ‘मेघमाला’ हें नाटक केवळ व्यक्तिद्वेषानेंच लिहिलें हें म्हणणें अतिशय धाष्टर्याचें होईल. खुद्द प्लेटोच्या ‘सिंपोसियम्’ या संवादावरून पाहिलें तर ॲरिस्टोफेनस हा सॉक्रेटिसचा कट्टा शत्रू होता असें दिसत नाहीं. मग असें असून त्यानें सॉक्रेटिसवर निंदेचा असा भडिमार कां केला? व ही निंदाही एकाच नाटकांत नव्हे, तर ‘मेघमाला’ या नाटकानंतर अठरा वर्षांनीं लिहिलेल्या ‘दर्दुर’ (Frogs)

या नाटकांतही सॉक्रेटिसवर तसाच आरोप केला आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं, ॲरिस्टोफेनसच्या मनांतील आढी ही अल्प-स्वल्प कारणानें उत्पन्न झालेली नव्हती. आपल्या देशाचें कल्याण करण्याच्या बुद्धीनेंच त्यानें सॉक्रेटिसावर टीका केली. सॉक्रेटिसाचा चांगुलपणा आपणास जसा आतां स्पष्ट दिसतो तसा त्याकाळीं तो नव्हता. उलटपक्षीं त्याचे सोफिस्ट लोकांशीं जें साम्य होतें तेंच प्रामुख्यानें पुढें येऊन प्रचलित गैरसमजाला अधिक उत्तेजन मिळे. सॉक्रेटिस अज्ञान-पत्करतो म्हणजे ज्ञानाची शक्यताच नाकारतो; एखाद्या प्रश्नाच्या दोन्ही बाजू दाखवितो म्हणजे चांगलें तें वाईट, व वाईट तें चांगलें, कसें दाखवावें हें शिकवितो; ज्या मनुष्याला अक्कल आहे तोच खरा गुरु असें म्हणतो; याचा अर्थ सॉक्रेटिसचें वचन पाळण्यासाठीं आईबापांची अवज्ञा करण्यास फूस देतो, अशा रीतीचा गैरसमाज होणें अपरिहार्य होतें. सोफिस्टांची विचारपरंपरा देशहिताला विघातक असल्यामुळें खुद्द ॲनीटस त्यांचा किती द्वेष करी, याचा मासला प्लेटोच्या मेनोमध्येंही आलाच आहे.

याच्याच जोडीचा जो भौतिकशास्त्रवादित्वाबद्दलचा दुर्ग्रह त्याजविषयीं अधिक कांहीं लिहावयास नको. वास्तविक जी विचारसरणी ॲनॅक्झॅगोरॅसची होती तीच सॉक्रेटिसच्या नांवावर लादली गेली होती; व या नजरचुकीबद्दल सॉक्रेटिस आपल्या भाषणांत मिलीटसला बजावीत आहे.

सॉक्रेटिसच्या मतांचें दिग्दर्शन करतांना मागील एका प्रकरणांत असें दाखविण्यांत आलेंच आहे कीं, त्याचीं राजकीय मतें त्यावेळच्या प्रचलित मतांहून फार भिन्न व अथेन्स येथील लोकसत्तात्मक पद्धतीशीं विरुद्ध होतीं. सर्व राजकीय सत्ता ज्ञात्यांच्या ताब्यांत असावी असें त्याचें म्हणणें होतें. ती सत्ता कांहीं निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या हातांत असणें अगदीं वाईट आहे, असें त्याचें मत होतें; व या पद्धतीची तो चेष्टाही करी. नौका कोणी चालवावी, रोग्याला औषध कोणी द्यावें, याविषयीं मतें घेऊन

ठराव करणें व त्याप्रमाणें वागणें हे जसें मूर्खपणाचें, तसेंच सर्व लोकां-
तून बहुमतानें सत्ताधीश निवडणें हेंही मूर्खपणाचें आहे, असें तो बिन-
दिक्कत म्हणे. सॉक्रेटिसची ही कल्पना अभिजनसत्ता किंवा नियतसत्ता
( Oligarchy ) या कल्पनेसारखीच आहे; व अथेन्समधील लोक तर
या दोन्ही पद्धतीचा अत्यंत तिटकारा करीत असत; व या मतांचा प्रव-
र्तक म्हणून सॉक्रेटिसचें वर्तन आक्षेपार्ह वाटत होतें. त्यांतही हा मुद्दा
विशेष पुढें येण्यास कारण अथेन्समधील त्यावेळच्या राजकीय उलाढाली
झाल्या. सुमारे एक पिढीपर्यंत पेलॉपोनीशियन युद्धांत लढून लढून अथे-
न्समधील लोकसत्ता अगदीं क्षीण झाली होती, व सरतेशेवटीं तिला परा-
जय पत्करून स्पार्टानें नेमलेल्या तीस अंमलदारांच्या जुलमाखालीं मान
वांकवावी लागली, या तीस अंमल्दारांनीं जो कहर गुदरविला त्याची
साक्ष, ग्रीक इतिहास देत आहे. चौकशीवांचून देहांतशासनाच्या शिक्षा
झाल्या, परकीय शिपायांचा अथेन्सवर पहारा बसला, व लोकांनां
निःशस्त्र करण्यांत आलें. जुलमी सत्ताधाऱ्यांनां जीं जीं म्हणून
अनन्वित कृत्यें करतां येणें शक्य आहे, तीं तीं कृत्यें करून
व करवून या तीस जुलमी अंमल्दारांनीं अथेन्समधील लोकांची
मनें पिळवटून काढलीं होतीं. अशा या संकटस्थितींतून थ्रॅसिब्यूलसच्या
शौर्यानें अथेन्स नुकतेंच सुरक्षित बाहेर पडलें होतें; व लोकसत्तेचा
खुरटलेला किंवा जळून गेलेला वृक्ष पुनः टवटवीत दिसूं लागला होता.
ज्या महनीय देशभक्तांनीं या राजकारणांमध्यें महत्त्वाचा कार्यभाग
घेतला होता, त्यापैकींच ॲनीटस हाही एक असून त्यानें या कामीं
पुष्कळच झीज पत्करली होती. अशा प्रसंगीं जी एक साहजिक प्राति-
गतिक लाट उसळली, तीही सॉक्रेटिसच्या फिर्यादीला अंशतः कारण
झाली. जें जें अभिजनसत्ताप्रवर्तक किंवा नियतसत्तानुकूल असेल तें तें
चिरडून टाकावें, असें लोकांनां वाटत असतांच त्यांजपुढें सॉक्रेटिसची
लोकसत्ताप्रतिकूल मतें आलीं तर त्या मतांना व त्यांचा प्रवर्तक जो

सॉक्रेटिस त्याला बुडवून टाकावें अशी लोकांची इच्छा होणें साहजिक आहे. ॲनीटसच्या मनांत सॉक्रेटिसबद्दल खासगी द्वेष होताच, मग देश-भक्तीसारख्या महनीय गुणांच्या नांवाखालीं आपला खाजगी सूड उगवून घेण्याची संधि तो कसा दवडील ? व त्याचें म्हणणें कांहीं अंशी खरें असल्यामुळें लोकांनां तरी तो लबाड आहे असें कसें वाटेल ? ज्या मनुष्यानें एवढा स्वार्थत्याग करून संस्थानाचा बचाव करण्यास उदार-बुद्धीनें मदत केली, तो पुरुष कारणाशिवाय कोणावर आरोप करणार नाहीं, सॉक्रेटिसचीं मतेंच मोठीं घातक आहेत, त्याचें बुद्धिमानांचें राज्य म्हणजे तीस अंमलदारांसारखीच एक देशविघातक संस्था; व अशा दुष्टमतांचा प्रवर्तक म्हणजे एक प्राणदंडाला योग्य असा अपराधी, असें लोकांचें मत होणें अगदीं साहजिक आहे.

सॉक्रेटिसचा क्रिटियस, झेनोफन, अलकिबायडिस इत्यादि पुरुषांशीं असलेला संबंध म्हणजे या द्वेषाग्नींत घृताचा वर्षावच. सॉक्रेटिस हा कधीं स्वतः राजकारणांत शिरला नाहीं, व अधिकाराच्या जागा मिळविण्यासाठीं त्यानें कधीं खटपट केली नाहीं हें खरें; परंतु आपल्या मित्रांपैकीं जे कोणी राजसत्तेला योग्य त्यांनां राजकारणांत शिरण्याविषयीं तो उपदेश करी, व त्याला अयोग्य वाटत त्यांनां त्यापासून परावृतही करी. अर्थात् ज्या मनुष्याला सॉक्रेटिसनें राजकारणांत शिरण्याचा सल्ला दिला असा मनुष्य जें जें करील तें तें सॉक्रेटिसच्या मनाला अनुकूल किंवा त्याच्या शिकवणीचेंच फळ, असेंच लोकांस वाटणार. सॉक्रेटिसच्या अशा मित्रां-पैकीं क्रिटियस हा एक असून तो तीस अंमलदारांपैकीं एक असतां त्यानें केलेल्या अत्याचारांची स्मृति त्यावेळीं अगदीं ताजी होती; व अशा दुष्ट व नीच मनुष्याचा सॉक्रेटिस गुरू; मग तोही तसाच दुष्ट असला पाहिजे, या समजुतीनें क्रिटियसच्या जुलमांतून सुटलेल्या लोकांनीं त्याच्या गुरूवर सूड उगवून घ्यावा हें रास्तच आहे. ‘ शिष्यापराधे गुरोर्दंडः ’ ही म्हण अशाच प्रकारें कित्येक प्रसंगीं आचारांत आली

आहे. बरें, लोकसत्तेच्या डोळ्यांत सलणारा व सॉक्रेटिसच्या शिष्यांत मोडणारा क्रिटियस एकटाच होता काय? झेनोफन आणि च्यारमिडीस यांनांही त्यांच्या स्पार्टावरील प्रीतिस्तव अथेन्समधून हद्दपारीची शिक्षा झालीच होती व सॉक्रेटिसवरील फिर्यादीच्या प्रसंगीं ते हद्दपारच होते. अलकिबाइडिस हा कांहीं लोकसत्तेच्या विरुद्ध नव्हता, पण त्यानें दुसऱ्या बाजूच्या अतिरेकानें, त्याच्या हद्दपारीनंतर केलेल्या देशद्रोहानें, एकंदर दुर्गुणी वर्तनानें आपलें नांव बदू करून घेतलें होतें, व याबद्दलचाही दोष सॉक्रेटिसकडे 'गुरु' या नात्यानें येत होता. सॉक्रेटिसविरुद्ध लोकांस चिथवितांना त्याचे प्रतिपक्षी हींच उदाहरणें दाखवून सॉक्रेटिसच्या शिक्षणाचा परिणाम काय आहे तो प्रत्यक्ष पहा, म्हणून सांगत असतील. ज्या वृक्षाला अत्यंत विषमय फळें येनात, तो वृक्षच विषमय असला पाहिजे, व त्याला समूळ उपटून काढल्याशिवाय स्वस्थता होणें शक्य नाहीं, असा ते लोकांनां उपदेश करीत असत.

सॉक्रेटिसवर येणारा हा आक्षेप अगदीं वृथा होता असें म्हटलें पाहिजे. क्रिटियस किंवा अलकिबायडिस सॉक्रेटिसकडे येत ते बहुतकरून त्याच्या वादविवादांतील कोटया शिकावयास येत. हे दोघेही पुरुष अतिशय महत्त्वाकांक्षी असल्यामुळें जनसमूहावर छाप बसविण्याची विद्या अवगत करण्याची त्यांची जबरदस्त इच्छा होती व ती पूर्ण होण्यास सॉक्रेटिसच्या संगतीचा उपयोग होईल अशी कल्पना झाल्यामुळें ते त्याजकडे येत. त्यांचीं खरीं मतें किंवा खऱ्या आकांक्षा फार निराळ्या असत व प्रसंग-विशेषी त्यांचा मोठा विरोधही येत असे. क्रिटियसच्या बाबतींत तर हा विरोध फारच स्पष्ट आहे. क्रिटियस हा तीस जुलमी अंमलदारांपैकीं एक असतां त्यानें व दुसऱ्या एका अधिकाऱ्यानें सॉक्रेटिसला आपल्यासमोर बोलावून आणून उपदेश करणें बंद करण्याबद्दल हुकूम दिला होता. सॉक्रेटिसनें सॅलॅमिसहून लिऑन या नांवाच्या मनुष्याला फुसलाऊन आणावें व त्या अंमलदारांच्या स्वाधीन करावें, असाही हुकूम फर्माविला होता. सॉक्रे-

टिसनें यांपैकीं पहिल्या हुकुमाच्या नुसत्या चिंधड्या उडविल्या व दुसऱ्या हुकमाला धाब्यावर बसविलें. जर क्रिटियसच्या मनांत सॉक्रेटिसबद्दल आदर असता, फार काय पण त्याच्या अत्युत्कट दृढनिश्चयाची स्पष्ट कल्पना असती, तरी त्यानें असा प्रसंग घडूं दिला नसता. मग सॉक्रेटिसला 'गुरू' म्हणून मोठा मान देण्याचें तर बाजूलाच राहिलें. सॉक्रेटिसनें त्यावेळीं अगदीं जिवावर उदार होऊनच त्या जुलमी हुकमाला दाद दिली नाहीं. क्रिटियस आपला शिष्यच आहे तेव्हां आपणास फारसा त्रास पोंचणार नाहीं अशी अपेक्षा करण्यास त्याला पुरेशी कारणें खास नव्हती.

अलकिबायडिसच्या बाबतीतही हा विरोध स्पष्ट होता. अलकिबाइडिस तरुण होता, सुंदर होता, मोहक होता, व सॉक्रेटिसचें त्याजवर प्रेम होतें, यांत कांहीं संशय नाहीं. परंतु अलकिबायडिसच्या उच्छृंखल मनोवृत्तीला, फाजील महत्त्वाकांक्षेला त्यानें फूस तर दिली नाहींच, पण उलट याबद्दल त्याची निर्भत्सना करून त्याच्या डोळयांत अंजन घालण्याचें सामर्थ्य व धारिष्ट एका सॉक्रेटिसलाच असे. सॉक्रेटिसचा आपणावर फार वचक आहे याचें खुद्द अलकिबाइडिसलाच वैषम्य वाटूं लागे, व तो त्यापासून शक्य तितका दूर राहण्याचा प्रयत्न करी. त्याच्या मोहक भाषणाला आपण बळी पडलों तर जन्मभर त्याच्या पायाशीं तत्त्वज्ञानाचा अभ्यास करतां करताच आपले केस पांढरे होतील, जगांतील मौज किंवा अधिकार यांचा आपणास लाभ होणार नाहीं, अशी त्याला भीति वाटे. फार काय पण सॉक्रेटिस मरेल तर फार उत्तम असेंही त्याला वाटे. तो मेला तर आपणास वाईट वाटेल हेंही लगेच आठवून अलकिबाइडिस मोठा भांबावून जात असे. *

* But this Marsyas has often brought me to such a pass, that I have felt as if I could hardly endure the life which I am leading; and I am conscious that if I did not shut my ears against him, and fly as from the voice of the siren, my fate would

प्लेटोच्या ' सिंपोसियम ' मधील अलकिबाइडिसच्या वरील उद्गारांना ऐतिहासिक महत्त्व नाहीं, असें गृहीत धरून चाललें तरीही त्याच्या व सॉक्रेटिसच्या संबंधाविषयीं स्वतः प्लेटोचें मत त्यांत दृग्गोचर होत असल्यामुळें त्यांस फार महत्त्व आहे. अलकिबाइडिस किंवा क्रिटिअस जर नेहमीं सॉक्रेटिसजवळ राहून व त्याच्या मताप्रमाणें वागूनही बिघडले असते तर तो दोषार्ह ठरला असता. पण वस्तुस्थिति याहून अगदींच निराळी होती. पूर्वग्रहदूषित शत्रुपक्षाला या गोष्टी न समजाव्या, व समजल्या तरी त्या त्यांनीं छपवाव्या, व त्या तशा छपल्या जाव्या हें साहजिक आहे. कारण सॉक्रेटिसचीं कांहीं राजकीय मतें अशा दुर्ग्रहाला अनुकूल आहेत, हें वर लिहिलेंच आहे.

सॉक्रेटिसविषयीं अशा तऱ्हेचें दुर्ग्रह होणें हें इतकें अपरिहार्य होतें कीं, त्याजवर अखेर खटला झाला, हें मुळींच आश्चर्यकारक नसून तो

---

be like that of others,—he would transfix me, and I should grow old sitting at his feet. For he makes me confess that I ought not to live as I do, neglecting the wants of my own soul, and busying myself with the concerns of the Athenians; therefore I hold my ears and tear myself away from him. And he is the only person who ever made me ashamed, which you might think not to be in my nature, and there is no one else who does the same. For I know that I cannot answer him or say that I ought not to do as he bids, but when I leave his presence, the love of popularity gets the better of me. And, therefore I run away and fly from him and when I see him I am ashamed of what I have confessed to him. Many a time, have I wished that he were dead, and yet I know that I should be much more sorry than glad, if he were to die: so that I am at my wit's end.

Plato: Symposium. (Jowett).

होण्यास इतका कालावधी लागला हेंच आश्चर्य आहे, असें प्रसिद्ध इतिहासकार 'ग्रोट' याचें मत आहे. सॉक्रेटिसची राजकारणविषयक किंवा धर्मविषयक कांहींहीं मतें असलीं तरी त्याची स्वतःची प्रत्यक्ष कृती अगदींच अनाक्षेपार्ह होती. व प्रत्यक्ष कृतीवांचून केवळ विचार हे कायद्यानें शिक्षेस पात्र नसल्यामुळें सॉक्रेटिसला सवड मिळाली असावी, किंवा व्यक्तिस्वातंत्र्याची चहा करणाऱ्या अथीनियन लोकांनां सॉक्रेटिस-लाही मत-स्वातंत्र्य असलेंच पाहिजे, असें वाटून त्यांनीं तिकडे जाणून-बुजून कानाडोळा केला असावा. तीस अंमलदारांची सत्ता झुगारल्यावर जी उलट लाट फिरली त्यावेळीं मात्र हे विचार सामर्थ्यशून्य झाले असावे.

या किंवा अशाच कांहीं कारणांनीं सॉक्रेटिसवर फिर्याद दाखल झाली खरी. इ. स. पूर्वी ३९९ व्या वर्षी मिलीटस, अनीटस व लिकॉन या तिघांनीं मिळून सॉक्रेटिसवर फिर्याद केली, व कायद्याप्रमाणें एक आरोपपत्रक 'किंग आर्कन' म्हणून जो अधिकारी असे त्याच्या कचेरींत दाखल केलें. मिलीटस हा एक कवि होता, अॅनीटस हा लोकपक्षीय पुढारी होता, व लिकॉन हा एक अप्रसिद्ध वक्ता होता. आरोपपत्रकांत असें लिहिलें होतें कीं " सॉक्रेटिस हा गुन्हेगार आहे. कारण तो या शहराला पूज्य असलेल्या देवांची पूजा करीत नाहीं, परंतु आपल्याच पदरच्या नव्या देवता काढतो, व शिवाय तरुणांचीं मनें बिघडवितो. या अपराधाला योग्य शिक्षा म्हणजे देहांतशासन. "

ज्यावेळीं अशी फिर्याद झाली, त्यावेळीं तिचा निःसंशय प्रतिकूलच निकाल होईल असें सॉक्रेटिसच्या मित्रांनांहि वाटलें नसावें. सॉक्रेटिसला स्वतः मात्र असें खास वाटलें होतें कीं, आपणास शिक्षा झाल्यावांचून राहणार नाहीं. तथापि त्यानें आपलें समर्थन करण्याची कांहींच तयारी चालविली नाहीं. उलट युथिफ्रोमधील हकीगत पहातां ही फिर्याद दाखल झाल्यानंतरही सॉक्रेटिसचा नित्यक्रम अबाधित चालला होता असें दिसतें. त्यावेळीं अथेन्समध्यें अशी चाल असे कीं, ज्यावर फिर्याद झाली असेल त्यानें

स्वतः भाषण करून आपली बाजू पुढें मांडावी. अशा प्रसंगीं लोक आपण स्वतः भाषणें लिहून पाठ करीत किंवा आपणास न साधल्यास दुसऱ्याकडून एखादें सुंदर भाषण लिहून आणून तेंच पाठ करून बोलण्याचा प्रघात असे. सॉक्रेटिसवर फिर्याद झाली तरी तो या बाबतींत अगदीं स्वस्थ होता. त्याचा एक मित्र हार्मोजिनीस त्याजकडे येऊन त्याला असें न करतां कांहीं तरी भाषण तयार करण्याविषयीं सांगू लागला. तेव्हां तो म्हणाला, " मी आजपर्यंत जें निर्दोष व न्याय्य आचरण केलें तीच माझी आत्मसमर्थनाची पूर्व तयारी आहे. इतकें असूनही मी कदाचित् एखादें भाषण तयार करवून ठेविलें असतें, परंतु एकदां मी तशी जुळवाजुळव करूं लागलों असतां, मला नेहमींच्या अंतःसाक्षात्कारानें कळविलें कीं असें करूं नकोस. परमेश्वराच्या दृष्टीनें मी अधिक जगण्यापेक्षां मरणेंच बरें असें असावें; नाहींतर अशी सूचना मला मिळाली नसती. आजपर्यंत मी मोठ्या समाधानांत दिवस घालविले, कारण माझ्या नैतिक प्रगतीची जाणीव व स्नेही मंडळींचा अकृत्रिम लोभ, यांनीं मला आनंद दिला. आतां कदाचित् माझीं इंद्रियें शिथिल होतील, माझी बुद्धि मंद होईल, व माझें आयुष्य मला अगदीं असह्य होईल. उलटपक्षीं, जर मला आतांच मरणाची शिक्षा झाली तर ती अन्यायाची असल्यामुळें, मजकडे कांहीं एक दोष न येतां माझी कीर्ति वाढेल. "

याप्रमाणें आपल्या मनाचा निश्चय करून सॉक्रेटिसनें भाषणाची पूर्व तयारी केली नाहीं. आपला नेहमींचा साधेपणा कायम ठेऊन केवळ सत्य प्रतिपादन करावयाचें असा त्याचा बेत होता. फिर्यादी–पक्षाकडून कशीं कशीं भाषणें करण्यांत आलीं याविषयीं आपणास कांहीं माहिती नाहीं; पण सॉक्रेटिसविषयीं लोकांचीं मनें दुर्ग्रहदूषित होण्यास जीं कारणें मागें दिग्दर्शित केलीं आहेत, त्यांजवर जोर देऊन त्यांनीं आपली बाजू पुढें मांडली असावी. त्यांचा पुरावा झाल्यावर सॉक्रेटिसची बोलावयाची पाळी आली, त्यावेळीं त्यानें जें भाषण केलें तें प्लेटोनें 'ॲपॉलजी' या

नांवानें लिहून प्रसिद्ध केलें. या भाषणांत प्लेटोनें वस्तुस्थितीला धरून ऐतिहासिक अंशच अधिक संभाळून ठेविला असल्यामुळें पुढें सॉक्रेटिसचें हेंच सबंध भाषण थोडाफार फरक करून दिलें आहे. झेलरनें या भाषणाचें असें वर्णन केलें आहे कीं, ज्याप्रमाणें एखादा अपराधी गयावया करतो, त्याप्रमाणें त्या भाषणांत मुळींच वर्तन नसून, ज्याप्रमाणें एखादा मध्यस्थ केवळ सत्य–प्रतिपादनानें भ्रमनिरास करण्याचा यत्न करतो, अगर एखादा देशभक्त त्याला अविचारानें शिक्षा होत असेल तर गंभीर सूचना देतो, त्याप्रमाणें सॉक्रेटिसचें वर्तन होतें. फिर्यादीचें अज्ञान त्यांनां कबूल करावयास लावावें, व त्यांनीं केलेले आरोप या टीकेनें उडवून टाकावेत हीच त्याची इच्छा आहे. कोर्टाची अगदीं बेअदबी होईल अशी त्यानें भाषा वापरली नाहीं हें खरें, परंतु त्यांच्या निकालाविषयींची बेपर्वा त्यांत स्पष्ट आहे. परमेश्वराच्या प्रेरणेनें प्राप्तझालेलें कर्तव्यकर्म प्राणांतीही सोडावयाचें नाहीं, हा निश्चय त्यामध्यें उत्कटतेनें दिसून येतो.

* The language is not that of a criminal, wishing to save his life, but that of an impartial arbiter who would dispel erroneous notions by a simple setting forth of the truth, or of a patriot warning against wrong doing and overhaste. He seeks to convince the accuser of his ignorance, to refute the accusation by criticism. At the same time, dignity and principle are never so far forgotten as to address the judges in terms of entreaty. Their sentence is not feared, whatever it may be. He stands in the service of God, and is determined to keep his post in the face of every danger. No commands shall make him faithless to his higher calling, or prevent him from obeying God rather than the Athenians.

( Zeller: Socrates and the Socratic schools. )

# सॉक्रेटिसाचें आत्मसमर्थन.

सॉक्रेटिस म्हणाला, अथीनिअन देशबंधूंनो,

मजवर आरोप ठेवणाऱ्यांच्या भाषणाचा आपणावर काय परिणाम झाला असेल हें मला सांगतां येत नाहीं, पण त्यांचें भाषण इतकें परिणामकारक झालें कीं, माझें आत्मभान नाहींसें झालें. तथापि त्यांच्या भाषणांत एक अक्षर देखील खरें नाहीं. परंतु त्यांच्या असत्य भाषणांत एक विधान मला फारच आश्चर्यकारक वाटलें. माझ्या वक्तृत्वप्रवाहांत वाहून न जाण्याची आपण खबरदारी घ्यावी, असें त्यांचें म्हणणें आहे. मी बोलावयास सुरवात केल्याबरोबर माझ्या वक्तृत्वहीनतेची आपणास खात्री पटण्यासारखी असल्यामुळें व या गोष्टीबद्दल त्यांचीही खात्री असल्यामुळें तर मला हें विधान अत्यंत लज्जास्पद वाटतें. आतां वक्तृत्व म्हणजे सत्याचें सामर्थ्य असाच जर त्यांच्या मनांतील अर्थ असेल, तर मात्र मी खास मोठा वक्ता आहे. परंतु माझ्या वक्तृत्वाची सरणी त्यांच्या सरणीपेक्षां किती भिन्न आहे! असो. माझा सांगण्याचा मुद्दा येवढाच कीं, त्यांनीं जरी मुळींच सत्यभाषण केलें नसलें तरी मी जें जें सांगणार, तें तें सर्वस्वी सत्य आहे; परंतु त्यांच्या पद्धतीप्रमाणें मी तें अलंकारिक भाषेंत ललितपदन्यासांनीं सांगणार नाहीं. स्वयंस्फूर्तीनें मला जे शब्द किंवा मुद्दे सुचतील त्यांचाच मी उपयोग करीन; कारण माझ्या पक्षाच्या न्याय्यत्वावर माझा पूर्ण विश्वास आहे. माझ्या वयाच्या पुरुषानें आपल्यापुढें एखाद्या होतकरू पण शिकाऊ वक्त्याप्रमाणें भाषण करणें हें अनुचित होय, आणि मी तसें करण्याची आपण अपेक्षा बाळगूं नये. याकरितां मला आपणास येवढीच विनंती करावयाची कीं, माझी बाजू आपणापुढें मांडताना जर मी माझ्या नेहमींच्या सरावाप्रमाणें बाजारांत अगर सराफकट्ट्यांत किंवा इतरत्र प्रचारांत असलेलेच शब्द वापरले, तर आपण आश्चर्यचकित होऊन केवळ याच कारणाकरितां माझ्या भाषणास अडथळा आणूं नये. आतां

माझी उमर सत्तर वर्षांवर झाली असून, कोर्टाची पायरी चढण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग असल्यामुळें, कोर्टाची भाषा ही मला अगदीं परकी आहे. म्हणून जणूं काय मी एखादा परदेशीय मनुष्य असून आपल्या देशांतील रिवाजाप्रमाणें व आपल्याच मातृभाषेंत बोलत आहे असें समजून आपण मला क्षमा करावी. ही माझी विनंती गैरवाजवी आहे काय ? माझी पद्धत चांगली आहे किंवा नाहीं, याचा विचारच सोडून द्या, व मी म्हणतों तें खरें आहे किंवा नाहीं, इकडे सर्व लक्ष द्या. वक्त्यानें सत्यभाषण करावें व न्यायाधिशानें न्यायानें निवाडा द्यावा.

माझ्यावर यापूर्वीच जे जुने आरोप लादण्यांत आले आहेत, त्यांजविषयीं व ते आरोप ठेवणारांविषयीं आधीं बोलून मग मी प्रस्तुतच्या आरोपांकडे व फिर्यादीकडे वळेन. कारण यापूर्वीच कित्येकांनीं मजवर खोटे आरोप लादले आहेत. आणि हे आरोप पुष्कळ वर्षांचे असल्यामुळें प्रस्तुतच्या खटल्यांतील वादी अनीटस व त्याचे साथीदार याजपेक्षां मला त्यांची अधिक भीति वाटत आहे. कारण अनीटस व त्याचे साथीदार हे भयंकर असले तरी त्याजपेक्षां हे जुने वादी अधिक भयंकर आहेत. तुम्हीं सर्व जेव्हां अज्ञ बालकें होतां तेव्हांच त्यांनीं तुमचे कान भारले आहेत. त्यांच्या मतें सॉक्रेटिस हा कोणी आत्मसंभावित पंडित असून आकाशपाताळांतील वस्तूंची उठाठेव करणारा व असत्य वस्तूही सत्यस्वरूप आहेत असें भासविणारा आहे. माझ्याविरुद्ध अशी कंडी ज्यांनीं पिकविली त्यांचीच मला आज विशेष भीति वाटत आहे. अशी कंडी ऐकून कोणाचाही असा समज होतो कीं, अशा नसत्या उठाठेवी करणाऱ्या मनुष्याचा साहजिकच देवांवर विश्वास नसावा. दुसरें असें कीं, हे वादी पुष्कळ असून मी एकटा आहे, त्यांचे आरोप जुने असून तुम्ही बाल किंवा तरुण असतांना तुमच्या कोंवळ्या मनावर त्यांचा अधिक परिणाम झाला असल्यामुळें, माझें बोलणें तुम्हांस कदाचित् तितकें रुचणार नाहीं, हेंही संभवनीय आहे; आणि त्यावेळीं वरील आरोपांना

कोणीच उत्तर न दिल्यामुळें त्यांचा एकतर्फी निकाल होऊनही गेला आहे. आणि सर्वांत मोठी अडचण म्हणजे हीच कीं, हा आरोप लादणाऱ्यांची नांवनिशी मला देतां येणार नाहीं. फार झालें तर एखाद्या * विनोदी नाटककाराचें मी नांव सांगू शकेन. या सर्व लोकांनीं मत्सरानें व द्वेषानें आपलीं मनें कलुषित करून घेऊन तुमचींहीं मनें दूषित केलीं आहेत. आणि या वर्गांतील कोणालाही मला आज कोर्टांत बोलावून त्याची फेरतपासणी करतां येत नसल्यामुळें आत्मसमर्थनाकरतां मी त्यांना सवाल करणें म्हणजे केवळ छायेशी वाग्युद्ध करण्यासारखेंच आहे. सारांश, माझ्या सांगण्याप्रमाणें मजविरुद्ध जुने व नवे असे दोन तऱ्हेचे वादी आहेत असें समजून त्यांपैकीं प्रथमच्या वादींना आधी उत्तर देणें हेंच अधिक प्रशस्त आहे असें आपणास वाटेल; कारण त्यांनीं मजवर केलेले आरोप फार पूर्वीचे व पुष्कळदां उच्चारलेले आहेत.

असो. मला माझा पक्ष आपणांपुढे मांडला पाहिजे व पुष्कळ काळपर्यंत रूढ झालेली निंदा अल्पावकाशांत दूर केली पाहिजे. मला यश येणें हें माझ्या व तुमच्या हिताचें असेल किंवा माझ्या पक्षाला अनुकूल असेल तर तसें होईल. हें काम सुकर नाहीं हें मला ठाऊक आहे, आणि म्हणून यशापयशाचा भार देवावर सोंपवून मी कायद्याप्रमाणें माझा पक्ष आपणापुढें मांडीत आहे.

प्रथमतः ज्या आरोपाच्या जोरावर वादी मिलीटस यानें मजवर फिर्याद केली आहे, तो निंदामूलक आरोप मी आपणास सांगतो. माझ्याविरुद्ध कंड्या पिकविणारे जणूं काय फिर्यादी आहेत अशी कल्पना करून मी त्यांची कैफियत सादर करतों. ते म्हणतात, " सॉक्रेटिस हा एक विचित्र पापकर्मा आहे. स्वर्गमृत्युपाताळांतील गोष्टींची उठाठेव

* हा विनोदी नाटककार म्हणजे ' Clouds ' किंवा ' मेघमाला ' या हास्यरसप्रचुर व सॉक्रेटिसच्या निंदेनें ओतप्रोत भरलेल्या नाटकाचा कर्ता, ॲरिस्टोफेनस हा होय.

करून, वाईट असेल तेंच चांगलेसें भासवून, आपलीं मतें सर्वत्र प्रसृत करतो. " हें माझ्यावरील आरोपाचें सामान्य स्वरूप आहे; व ॲरिस्टोफेनसच्या प्रहसनामध्यें आपण हेंच वारंवार पाहिलें आहे. त्या प्रहसनामध्यें एक सॉक्रेटिस म्हणून पात्र दाखविलें आहे. हा सॉक्रेटिस ' मी हवेवर चालतो ' इत्यादि बालिश भाषणें करीत हिंडणारा आहे, आणि मला मुळींच अवगत नाहींत असे त्याच्या भाषणाचे विषय आहेत. भौतिकशास्त्राचा अभ्यास करणारांची निंदा करण्याचा माझा हेतु नाहीं. परंतु मिलीटसला मजवर असा आरोप लादणें शक्य असतें तर त्याजबद्दल मला खरोखरच वाईट वाटलें असतें; परंतु अथीनिअन बंधूनों, खरें पाहिलें असतां भौतिकशास्त्रांतील विशृंखल विचारांशी मला कांहींएक कर्तव्य नाहीं. मी बोलतों तें सत्य आहे याबद्दल येथे जमलेल्यापैकीं कित्येकजण साक्ष देतील. ज्यांनीं माझें भाषण ऐकिलें असेल त्यांनीं निःपक्षपातबुद्धीनें आपलें मत आपल्या शेजारच्यांनां सांगावें......... तुम्हीं त्यांचें उत्तर ऐकतच आहां, आणि माझ्या आरोपांतील या भागाच्या स्वरूपावरून देखील आपणास इतर भागांतील सत्यतेविषयीं सहजच प्रचीती येईल.

मी शिक्षक असून पैसे घेतों हें म्हणणें तितकेंच निराधार व असत्य आहे. तथापि जर एखाद्या मनुष्याच्या जवळ त्याच्या जातिबांधवांनां शिकविण्यासारखेंच कांहीं असेल तर तें शिकविण्याबद्दल पैसे मिळविणें हें मी उलट भूषणास्पदच समजतों. लिओंटियमचा गॉर्गिअस, सिऑसचा प्रॉडीकस, आणि इलिसचा हिपायस, हे शहरोंशहरीं हिंडत जातात व प्रत्येक ठिकाणीं तरुण मंडळी आपल्या देशबांधवांकडून फुकट मिळणारें शिक्षण सोडून त्यांजजवळ शिकावयास जातात आणि त्यांनां पैसे देतात. येवढेंच नव्हे तर पैसे देऊन तरी असें शिक्षण मिळविण्याची संधि दिल्याबद्दल ते त्यांचे आभार मानतात. हल्लींच अथेन्समध्यें पेरिआचा एक तत्त्वज्ञानी आला आहे. त्याजविषयींची मला माहिती लाग-

ण्याचें कारण असें झालें कीं, हिपोनिकसचा मुलगा कॅलिअस हा मला भेटला. यानें सोफिस्ट लोकांच्या पायीं पाण्यासारखा पैसा खर्च केला होता. कॅलिअसला मुलगे आहेत हें मला ठाऊक होतें, म्हणून मी म्हटलें "कॅलिअस, जर तुझीं मुलें म्हणजे आपलीं शिंगरें किंवा वासरें असतीं, तर त्यांना कोणाच्या देखरेखीखालीं ठेवावयाचीं हा प्रश्नच पडला नसता. एखाद्या रिंगमास्तराच्या किंवा शेतकऱ्याच्या हवाली त्यांना करून दिलें असतें म्हणजे त्यांनीं त्यांच्या गुणांचा पूर्ण विकास घडवून आणला असता. परंतु ज्याअर्थीं तुझी मुलें म्हणजे मनुष्यच आहेत, त्याअर्थीं तूं त्यांना कोणाच्या हवाली करणार आहेस? ज्याला राजकीय आणि नैतिक सद्गुणाचें बरोबर ज्ञान आहे असा कोणी आपल्या परिचयाचा आहे काय? कारण आपणास पुत्र असल्यामुळें आपण या गोष्टीचा विचार केलाच असेल." कॅलिअसनें यावेळीं एव्हेनसचें नांव सुचविलें व तो पांच मिने * फी घेतो म्हणून सांगितलें. मी मनांत म्हटलें 'खरोखरच एव्हेनसजवळ येवढें सत्यज्ञान असेल व तो तें येवढ्या थोड्या मोबदल्यांतच देत असेल तर तो मोठा भाग्यवानच म्हटला पाहिजे! माझें एवढें भाग्य असतें तर मी तर चढूनच गेलों असतों. पण खरी गोष्ट कबूल करावयाची म्हणजे मजजवळ तसें ज्ञानच नाहीं.

अथीनिअन देशबंधूंनो, आपणांपैकीं कोणी कदाचित म्हणेल कीं, 'सॉक्रेटिस, तूं म्हणतोस तें सर्व खरें, पण मग तुझ्यावर आलेल्या या आरोपाचें मूळ तरी कशांत आहे? तुझें वर्तन तसेंच चमत्कारिक असलें पाहिजे. जर तुझी वर्तणूक इतरांप्रमाणेंच असती तर तुझ्याविरुद्ध ही ओरड झालीच नसती. तर याच्या मुळाशीं काय आहे तें सांग. म्हणजे या प्रश्नाचा उतावीळपणानें निकाल लावण्याचा दोष आमच्यावर येणार नाहीं.' आपणांपैकीं कोणी असें म्हटल्यास तें योग्यच होणार आहे,

* मिना ( Mina ) हें एक ग्रीक देशांतील नाणें होतें, व त्याची किंमत ४ पौंड किंवा सध्याच्या मानानें ६० रु. होईल.

व म्हणून मला शहाणा ही पदवी मिळून देखील माझें नांव बदू कां झालें याचें कारण थोडक्यांत सांगतों तिकडे लक्ष द्या. हा सर्व केवळ थट्टेचा प्रकार आहे असें आपणांपैकीं कोणास वाटेल, पण मी खरें तेंच सांगतो, माझी शहाणपणाबद्दल जी येवढी ख्याति झाली आहे ती माझ्या एका विशिष्ट ज्ञानाबद्दल झाली आहे; आणि हें ज्ञान म्हणजे मनुष्याच्या बुद्धीला अगम्य असलेलें ज्ञान होय, आणि असें ज्ञान मला आहे हें मी कबूल करतों. परंतु मी ज्यांविषयीं बोलत आहे, त्यांचें ज्ञान म्हणजे मनुष्यांनां अगम्य आहे, व त्याचें ज्ञान मलाच नसल्यामुळें हें अतिबौद्धिक ज्ञान काय, याची मला कल्पना देता येणार नाहीं. व मला ही गोष्ट माहित आहे असें कोणी म्हणत असेल तर ती चूक आहे. मी कांहींतरी भ्रमिष्टासारखा बकतो आहे, असें समजून आपण मला व्यत्यय आणूं नका; कारण मी म्हणतों याला साक्ष प्रत्यक्ष डेल्फीचा देव आहे; आणि मी शहाणा आहे किंवा नाहीं, व असल्यास कशा प्रकारचा आहे, हें त्याजकडूनच आपणास कळेल. माझा जुना दोस्त कैरिफन् हा आपल्या परिचयाचाच आहे. कारण आपल्याबरोबरच तो हद्दपार झाला होता, व आपणाबरोबरच तो परत स्वदेशी आला. असो. कैरिफन् हा प्रत्येक गोष्टींत मोठा नादी असे, तो डेल्फीला गेला; व मोठ्या धिटाईनें त्यानें प्रश्न केला कीं, सॉक्रेटिसपेक्षां कोणी अधिक शहाणा आहे काय? आणि तेथील अतीन्द्रियवादिनीनें उत्तर दिलें, 'कोणी नाहीं.' कैरिफन् आज हयात नाहीं, पण त्याचा भाऊ येथें कोर्टांत हजर आहे तो माझ्या म्हणण्यास दुजोरा देईलच.

ही येवढी कुळकथा सांगण्याचें कारण काय, माझें नांव बदू होण्याचें कारण काय, हें तुम्हांस समजविण्याकरितां मी हें सांगत आहे. जेव्हां मी देवाचें हें उत्तर ऐकलें, तेव्हां मी मोठ्या घोटाळ्यांत पडलों. देवाच्या उत्तराचा अर्थ तरी काय आणि हें कोडें सुटणार तरी कसें! मी खरोखर सर्वांत शहाणा म्हणावें तर मला शहाणपणा तर

मुळींच नाहीं. मग मला सर्वांत शहाणा म्हणण्यांत देवाचा काय हेतु असावा ? देव तर कधीं खोटें बोलतच नाहीं. कारण तो देवच. पुष्कळ विचार केल्यावर हा प्रश्न सोडविण्याची मला एक युक्ति सुचली. जर मजपेक्षां अधिक शहाणा असा इसम मी शोधून काढला तर त्या उदाहरणाच्या जोरावर मला देवाचें म्हणणें खोटें ठरवितां येईल. कारण मग मी देवाला असें म्हणूं शकेन कीं, 'हा पहा माझ्यापेक्षां शहाणा मनुष्य, मग मी सर्वांत शहाणा कसा ? ' हा विचार ठरल्यावर मी एका शहाणपणाबद्दल विख्यात असलेल्या मनुष्याची गांठ घेतली. त्याचें नांव सांगण्याची कांहीं जरूर नाहीं. पण तो आपणास राजकारणी म्हणवीत असे, येवढें मात्र मी सांगतों. त्याच्याशी संभाषण केल्यावर मला साहजिकच असें वाटलें कीं, जरी लोक त्याला शहाणा म्हणत व तोही आपल्या शहाणपणाची अधिकच प्रौढी मिरवी, तथापि वास्तविक कांहीं तो शहाणा नाहीं. आणि ही गोष्ट त्याला समजाऊन देण्याचा मी प्रयत्न केला. पण याचा परिणाम येवढाच झाला कीं, तो व तेथें हजर असलेले इतर कांहीं लोकही माझा द्वेष करूं लागले. असो, मी तेथून निघून गेलों व माझ्याशींच विचार केला कीं, खरोखर सुंदर व चांगल्या वस्तुंच्या ज्ञानाभावांत तो गृहस्थ व मी सारखेच असलों तरी, माझी स्थिति त्याच्या स्थितीपेक्षां जरा बरी होती. कारण तो खरोखर अज्ञानी असून आपणास ज्ञानी मानीत होता; परंतु मला कांहीं माहीत नसलें तरी मला माझ्या अज्ञानाची जाणीव आहे हें खास. या दृष्टीनें मी त्याच्यापेक्षां कांहींसा श्रेष्ठ दिसतो खरा. यानंतर त्याच्याहीपेक्षां अधिक प्रसिद्ध पुरुषाकडे मी गेलों. त्या ठिकाणीं मला तोच अनुभव आला व शत्रुपक्ष अधिक वाढला.

अशा रीतीनें एकामागून एक शत्रू निर्माण होत गेले. मला या गोष्टीची जाणीव होती; व याबद्दल मला वाईटही वाटत होतें. पण माझा उपाय काय ! परमेश्वराच्या शब्दांचा प्रथम विचार केला पाहिजे. जे

जो मनुष्य शहाणासा वाटेल त्याजकडे जाऊन मला देवाच्या म्हण-ण्याचा अर्थ स्पष्ट करून घेतलाच पाहिजे होता. अथीनिअन देशबंधूंनों, मी शपथपुरःसर–छेः सत्यभाषणाच्या समर्थनाला शपथेची काय जरूर–मी आपणांस खरोखर सांगतों, मला असा अनुभव आला कीं, जे लोक सर्वांत अधिक प्रसिद्ध व मान्य ते सर्वांत मूर्ख व त्यांजपेक्षां कमी मान्य असलेले लोकच त्यांच्यापेक्षां बरे. परंतु हे सर्व हरक्यूलिअन ( भगीरथ ) प्रयत्न करूनही सरतेशेवटीं मला परमेश्वराचें म्हणणें आक्षेपणीय नाहीं हेंच कबूल करावें लागलें. राजकारणी पुरुषांची परीक्षा झाल्यावर मी सर्व तऱ्हेच्या कवीकडे गेलों, व या ठिकाणीं तरी मला माझा कमीपणा कबूल करावा लागेल अशी माझी समजूत होती. त्या त्या कवींच्या ग्रंथांतील निवडक उतारे घेऊन मी त्यांच्याकडे गेलों; व त्यांचा अर्थ त्यांनां विचारला. मला वाटलें होतें कीं, या बाबतींत तरी मला शिक-ण्यासारखें त्यांजजवळ कांहीं असेल, पण मला खरोखर अनुभव काय आला हें मी सांगितल्यावर तुम्हांस तो विश्वसनीय वाटेल कीं नाहीं कोण जाणें? मला वाटतें येथें हजर असलेला प्रत्येक इसम त्यांच्याच काव्यांची त्यांजपेक्षां अधिक चांगली फोड करून सांगत. त्या वेळीं मला प्रत्यय आला कीं, कवि आपलीं काव्यें शहाणपणाच्या जोरावर लिहीत नसून एक प्रकारच्या प्रतिभेनें व स्फूर्तीनेंच लिहितात. या बाबतींत त्यांचें अंगांत देवतासंचार झाला असतां भविष्य सांगणाऱ्यांशीं साम्य असतें. ते पुष्कळ चांगल्या गोष्टी बोलतात; पण त्या त्यांच्या त्यांनां समजत नाहींत. आणि मला आढळून आलें कीं, कवींची स्थिति जवळ जवळ तशीच असते. परंतु मला असें दिसलें कीं, केवळ या प्रतिमेच्या जोरावर ते कवि आपणांस सर्व विषयांत अप्रतिम शहाणे समजत. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. यामुळें मी त्यांनांही सोडून निघालों व ज्या अज्ञानाच्या जाणिवेमुळें मीं राजकारणी पुरुषांपेक्षां श्रेष्ठ, त्याच कारणास्तव मी या कवींपेक्षांही श्रेष्ठ अशी माझी समजूत झाली.

सरते शेवटीं मी कारागिरांकडे गेलों. मला असें वाटत होतें कीं, मला कांहींच ज्ञान नव्हतें; पण त्यांनां किति तरी चांगल्या गोष्टी अवगत होत्या आणि माझी ही समजूत कांहीं अगदीं चूक नव्हती. मला माहीत नाहींत अशा पुष्कळ गोष्टी ठाऊक असल्यामुळें तितक्या पुरते ते माझ्याहून श्रेष्ठ होते. परंतु मला असें आढळून आलें कीं, हे कारागीरही कवीप्रमाणेंच भ्रमांत होते. आपण चांगले कारागीर आहोंत तेव्हां आपणास ( तत्त्वज्ञानासारखे ) गहन विषयही येतातच, अशा भ्रमरूप अज्ञानानें त्यांचें ज्ञान आवृत झालें होतें. आणि म्हणून मी देवाच्या वतीनें आपणासच प्रश्न केला कीं, त्यांचें ज्ञानही नाहीं व अज्ञानही नाहीं, अशी माझी स्थिति बरी किंवा त्यांची बरी ? आणि मी देवाच्याच पक्षाला अनुकूल उत्तर दिलें, आणि माझीच स्थिति अधिक बरी असें ठरविलें.

या माझ्या चौकस बुद्धीनें मला मी अतीशय भयंकर आणि तीव्र शत्रू उत्पन्न करून घेतले आहेत; आणि पुष्कळसे लोकापवाद यामुळेंच उत्पन्न झाले आहेत. लोक मला शहाणा म्हणतात याचें कारण येवढेंच कीं, इतरांमध्यें जो गुण नाहीं म्हणून मी दाखवितों, तो गूण मजमध्यें आहे अशी ते आपली समजूत करून घेतात. परंतु अथीनिअन बंधूंनों, खरी गोष्ट म्हणजे एक ईश्वरच केवळ शहाणा आहे; व आपल्या उत्तरानें येवढेंच दाखविण्याची त्याची इच्छा आहे कीं, मानवी ज्ञान हें फार कोतें व म्हणून कवडीमोल आहे. माझ्याविषयीं विशेषतः कांहीं सांगावयाचें नसून केवळ उदाहरण म्हणून माझें नांव दिलें आहे. देवाच्या भाषणाचा आशय निराळ्या शब्दांत सांगावयाचा म्हटला तर असा होईल कीं, जो सॉक्रेटिसप्रमाणें आपलें ज्ञान कःपदार्थ आहे असें मानील तोच खरा ज्ञानी होय. आणि या कारणाकरितांच मी परमेश्वराची आज्ञा शिरसावंद्य मानून जो कोणी नागरिक अथवा परकीय शहाणपणाची छाननी करतो, व जर तो शहाणा नसेल तर देवाच्या

वाक्याचें सत्यत्व राखण्याकरितां मी तो शहाणा नाहीं हें त्याला दाखवितों. या उद्योगांतच नेहमीं चूर असल्यामुळें मला इतर कोणचेंही सार्वजनिक किंवा व्यक्तिविषयकही काम करतां येत नाहीं; आणि या देवावरील श्रद्धेचा एक अनुषंगिक परिणाम असा झाला आहे कीं, मी भिकारी आहे.

याशिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, ज्यांना बरेचसें रिकामपण असतें अशी श्रीमंतांचीं मुलें स्वेच्छेनें मजभोंवतीं जमतात. ज्ञानाचा दंभ माजविणाऱ्या लोकांचें अज्ञान मी कसें उघड करून दाखवितों तें पाहाणें त्यांनां आवडतें व पुष्कळदां ते स्वतः माझें अनुकरण करतात, व त्यांनां कोणी ज्ञानाचा दंभ माजविणारे भेटल्यास ते त्यांची माझ्या धोरणावर उलट तपासणी करतात, व त्यांचें अज्ञान बाहेर काढतात. अशा रीतीनें त्यांच्या कचाट्यांत सांपडलेली मंडळी त्यांच्यावर रागवायाचें टाकून मजवरच रागावतात. 'हा हलकट सॉक्रेटिस, तरुणांनां कुमार्गगामी करणारा—' अशा रीतीनें ते बोलूं लागल्यास जर कोणी विचारलें कीं, 'अहो ! सॉक्रेटिस काय वाईट आचरण करतो किंवा शिकवीतो?' तर त्यांनां त्याचें नीट उत्तर देतां येत नाहीं; परंतु आपण गोंधळलों असें दिसूं नये म्हणून साधारणतः तत्त्वज्ञान्यावर केव्हांही लादता येतील असे 'तयार' आरोप घेऊन ते मजवर लादतात. ते आरोप म्हणजे स्वर्गापवर्गाची उठाठेव, निरीश्वरता व वस्तुविपर्यास. त्यांच्या द्वेषाचें खरें कारण जें आत्मप्रतिष्ठानिरसन तें त्यांनां कबूल करावेंसें वाटत नाहीं. हे माझे प्रतिपक्षी महत्वाकांक्षी, खटपटी, पाताळयंत्री व बोलके असल्यामुळें त्यांनीं आपल्या दीर्घ व तीक्ष्ण निंदाप्रचुर भाषणांनीं आपले कान आधींच विषमय करून टाकले आहेत. या फिर्यादींतील वादी मिलीटस, अॅनीटस् आणि लिकॉन, हे मजविरुद्ध उठण्याला हेंच खरें कारण आहे. मिलीटस हा कवींच्या, अनीटस राजकारणी पुरुषांच्या व कारागीरांच्या, व लिकॉन हा अलंकारिकांच्या वतीनें माझ्यावर दावा

करीत आहेत. मीं प्रथमच सांगितलें आहे कीं, येवढ्या आरोपांचें एका क्षणार्धांत निरसन करणें अशक्य आहे. तथापि मी आपणांस सांगितली ही वस्तुस्थिति आहे. मी आपणांपासून कांहीं लपविलेंही नाहीं व कांहीं दांभिकपणानें आपल्यापुढें मांडलेंही नाहीं. मी इतका उघड व स्पष्ट बोलतों याबद्दल ते माझा द्वेष करतात हें मी जाणून आहे, पण यावरूनच मी बोलतों तें सत्य आहे असें सिद्ध होत नाहीं काय ? माझ्याविरुद्ध आपला गैरसमज होण्यास हेंच कारण आहे, असें आपणांस केव्हांतरी खास आढळून येईल.

माझ्यावर आरोप करणाऱ्या पहिल्या वर्गाबद्दल मला आत्मसंरक्षणार्थ जें सांगावयाचें तें मीं सांगितलें. आतां मी दुसऱ्या वर्गातील वादींकडे वळतो. त्यांमधील मुख्य म्हणजे आपणा स्वतःला सज्जन व देशभक्त म्हणविणारा मिलीटस आहे. यांच्या आरोपापासूनही मला माझें रक्षण केलें पाहिजे. त्यांच्या फीर्यादीचा सारांश असाः— सॉक्रेटिस हा पापकर्मी आहे, व तो तरुण मंडळींनां बिघडवितो. तो संस्थानच्या देवांवर विश्वास ठेवित नाहीं व त्यानें आपलेच कांहीं नवीन देव काढले आहेत. आतां आपण या आरोपांतील निरनिराळे भाग घेऊन त्यांचा विचार करूं. मिलीटस म्हणतो कीं, मी पापकर्मी असून तरुणांनां बिघडवतो, परंतु अथीनियन् बंधूंनों, वास्तविक मिलीटस हाच उलट पापाचरणी आहे. कारण वास्तविक तो गांभीर्याचा आव आणीत आहे; व ज्या विषयांत त्याला कांहीं गम्य नाहीं, अशा विषयांवरील दांभिक प्रेमानें तो वाटेल त्याजवर फिर्याद आणावयास तयार आहे. मी म्हणतों तें खरें आहे किंवा नाहीं, याचा प्रत्यय मी तुम्हांस आतांच आणून देतों.

" मिलीटस, मी तुला विचारतो कीं, तरुण मंडळीच्या सुधारणेविषयीं तूं पुष्कळच विचार करीत असशील ? "

" होय. "

"तर मग मिलीटस, तरुण मंडळीस सुधारणाराचें नांव काटोला सांग पाहूं. कारण ज्या अर्थी तूं त्यांनां बिघडविणाऱ्या मला शोधून काढून मजवर फिर्याद करण्याचें देखील श्रम घेतलेस, त्या अर्थी तुला माझ्यापेक्षां अगदीं विरुद्ध असा तरुणजनांचा सुधारकही ठाऊक असेलच. मग तो कोण, हें सांग पाहूं ? मिलीटस, लक्षांत ठेव कीं, तुला माझ्या प्रश्नाला उत्तर देतां येत नाहीं म्हणून तूं मौन स्वीकारलें आहेस; पण ही खरोखर लाजिरवाणी गोष्ट असून मी आतां म्हटलें त्याचीच प्रचीती आणीत नाहींस काय ? बोल, बोल, तरुण मंडळींनां सुधारणारा कोण ?"

"कायदेकानु."

"पण, भल्या गृहस्था, हा माझ्या प्रश्नाचा मुद्दा नाहीं. प्रथम मला सांग कीं, कायदेकानु कोणाला अधीक समजतात ?"

"सॉक्रेटिस, येथें हजर असलेल्या न्यायाधिशांनां."

"तर मग मिलीटस, तुझें असें म्हणणें आहे काय, कीं ते तरुणमंडळींनां शिकविण्यास व सुधारण्यास समर्थ आहेत ?"

"अर्थातच."

"काय, सर्वजण कां त्यांतील कांहींच ?"

"सर्वजण."

"अरे वा ! तर मोठी आनंदाची बातमी आहे. समाजसुधारकांची गर्दीच उसळली म्हणावयाची ! पण येथें जमलेल्या इतर लोकांविषयीं तुझें काय म्हणणें आहे ? ते तरुण समाज सुधारतात का ?"

"होय, ते देखील."

"आणि सिनेटर्स ?"

"होय, ते देखील तरुणांनां सुधारतात."

"पण कदाचित् साधारण समितीचे सभासद त्यांनां बिघडवीत असतील कां तेही त्यांनां सुधारतातच ?"

"तेही त्यांना सुधारतात."

"तर मग माझ्याशिवाय प्रत्येक अथीनियन त्यांनां सुधारतो व मीच केवळ बिघडवितो असें कां तुझें म्हणणें ?"

"माझें हेंच अक्षरशः म्हणणें आहे."

"तुझें म्हणणें खरें असेल तर मोठेंच दुर्भाग्य म्हणावयाचें. पण मिलीटस, मला असें सांग कीं, घोड्यांच्या बाबतींतील तुझा अनुभव कसा आहे ? एक मनुष्य त्याला बिघडवतो व सर्व जग त्याला सुधारतें काय ? याच्या विरुद्ध गोष्टच खरी नाहीं काय ? एखाद्या रिंगमास्तरासारखा विरळ मनुष्यच त्यांनां सुधारतो व ज्या ज्या इतरांचा घोड्यांशी संबंध येतो तेच त्यांनां बिघडवितात, असें नाहीं काय ? जसें घोड्यांचें तसेंच इतर प्राण्यांचेंही नाहीं काय ?"

"होय, तें असेंच आहे."

"मग तें तुला, कींवा ॲनीटसला पटो किंवा न पटो पण, जर तरुण मंडळींनां बिघडविणारा एकच असून जगांतील बाकी सर्व मंडळी सुधारणारीच असेल तर मोठें भाग्यच म्हणावयाचें, पण मिलिटस, तूं मात्र तरुणांविषयीं कधींही मनःपूर्वक विचार केला नाहींस, हें तुझ्याच निष्काळजीपणानें व मजवर स्वतःच आणलेल्या आरोपासंबंधीच्या अज्ञानानें सिद्ध करीत आहेस."

"याशिवाय, मिलीटस मी तुला असें विचारतों कीं, एखाद्याला वाईट लोकांमध्यें राहणें आवडेल कां चांगल्या लोकांमध्यें ? हा प्रश्न तर अगदींच साधा आहे. चांगले लोक आपल्या शेजाऱ्यांवर उपकार करतात व वाईट लोक त्यांनां पीडा देतात नाहीं काय ?"

"निःसंशय."

"आणि असा एखादा मनुष्य आहे काय कीं, ज्याला आपल्या शेजाऱ्यानें आपणावर उपकार करण्यापेक्षां आपणास इजा केलेलीच अधिक

आवडेल ? सांग, सांग, कायद्याप्रमाणें तुला उत्तर दिलेंच पाहिजे. कोणाही मनुष्याला आपणास इजा करून घेण्याची हौस असते का ?"

" निःसंशय नाहीं."

" आतां तरुण मनुष्यांनां बिघडवून अनीतिप्रवण करण्याविषयीं तूं मजवर आरोप ठेवतोस, त्यावेळीं मी तें जाणूनबुजून करतो असें कां तुझें म्हणणें ?"

"होय जाणूनबुजून—"

"पण तूं आतांच कबूल केलेंस कीं, चांगलीं माणसें आपल्या शेजाऱ्यांचें चांगलें करतात व वाईट माणसें अकल्याण करतात. तर मग हें सत्य तुला मात्र अगदीं अल्पवयांत, केवळ श्रेष्ठतर बुद्धीच्या जोरावर समजूं लागले आणि माझी वृद्धावस्था झाली असून देखील मी इतका अज्ञानी व मठ्ठ आहे काय, कीं मला येवढें देखील समजूं नये कीं ज्या मनुष्याच्या संन्निध मला रहावयाचें आहे तो बिघडला असल्यास माझें अकल्याणच करील ! पण तूं आपला म्हणतोसच कीं, मी त्याला जाणूनबुजून बिघडवितों. तूं काय वाटेल तें म्हणशील, पण माझा किंवा इतरांचा त्यावर कसा विश्वास बसावा ? याकरितां खरी गोष्ट अशी असली पाहिजे कीं, मी एकतर तरुणांनां बिघडवीतच नाहीं व यदाकदाचित् बिघडवीत असलोंच तर जाणूनबुजून बिघडवीत नाहीं. आणि या दोनही पक्षीं तुजकडे खोटेपणा येतो. कारण जर माझा अपराध अज्ञानमूलक असेल तर कायदा अशा अपराधांस दंड्य समजत नाहीं. मला एकीकडे घेऊन दोन समजुतीच्या गोष्टी सांगणें, हें तुझें कर्तव्य होतें. कारण जी गोष्ट मी केवळ अज्ञानानें करीत होतों, ती गोष्ट मी योग्य उपदेशाअंतीं खास खास टाकली असती. पण मजजवळ बोलण्यासारखें किंवा मला शिकविण्यासारखें मात्र तुजजवळ कांहीं नव्हतें, आणि आतां मात्र तूं मला कोर्टांत ओढलें आहेस. कोर्ट हें शिक्षणमंदिर नसून दंडस्थान मात्र आहे.

"अथीनिअन बंधूंनों, मजवर आणलेल्या आरोपाच्या बाबतींत मिलीटस बेफिकिर व निष्काळजी आहे हें आतां तुम्हांलाही पटेलच. तथापि मिलीटस, मी तरुण मनुष्यांनां कोणत्या बाबतींत बिघडवतों असें तुला वाटतें ? मला वाटतें, माझ्या आरोपपत्रकावरून पाहातां मी त्यांनां संस्थानांत मान्य असलेले देव न मानण्याविषयीं व त्याबद्दल दुसरेच देव अगर देवदूत मानण्याविषयीं शिकवितों, असा तुझा अर्थ असावा. तरुणांनां हेच धडे देऊन मी बिघडवितों असें तुझें म्हणणें ?"

" होय, होय, तेंच."

"तर मग ज्या देवांविषयीं आपण बोलत आहोंत त्याच देवांनां स्मरून आपलें म्हणणें अधिक स्पष्ट करून सांग. कारण तुझ्या म्हणण्याचा भावार्थ अजून माझ्या लक्षांत येत नाहीं. मी लोकांनां कोठल्यातरी देवांवर विश्वास ठेवण्यास सांगतो, तेव्हां मी पक्का नास्तिकवादी नाहीं, व तूं मजवर हा आरोप ठेवीत नाहींस; तर मी सांगतों ते देव व संस्थानाला मान्य असलेले देव एक नाहींत येवढाच तुझा आरोप ? कां मी पक्का नास्तिक आहे असा ?"

" तूं पक्का नास्तिक आहेस असा."

"वाहवा ! तर मग मिलीटस, इतर लोकांप्रमाणें मी सूर्यचंद्रादिकांतील देवत्व मानीत नाहीं असें कां तुझें म्हणणें ?"

"न्यायाधीश महाराज, मी सांगतों हा खास त्यांचें देवत्व मानीत नाहीं. कारण सूर्य हा एक दगड आहे व चंद्र हा पार्थिव आहे असेंच हा म्हणतो."

" मिलीटस, तू अॅनॅक्झॅगोरॅसवर आरोप करीत आहेस असें मला भासतें आहे. कारण तूं म्हणतोस हीं मतें अॅनॅक्झॅगोरासच्या ग्रंथांत भरलेलीं आहेत ही गोष्ट न्यायाधीशांनां माहीत नसण्याइतके ते नीरक्षर आहेत, अशी तुझी समजूत असल्यास ती चुकीची आहे. केवळ

एखाद्या * ड्राक्मावर पहावयास मिळणाऱ्या + नाटकांतून बहुधा सॉक्रेटिसच्या नांवावर हींच मतें लादण्यांत आलीं आहेत, आणि खरोखरच सॉक्रेटीस या मतांचा जनक असेल तर खुशाल त्यांनीं तिकिटाचे पैसे भरून सॉक्रेटिसच्या उपहासाची मौज करावी. असो. तर मग मिलिटस, तुला असें नक्की वाटतेंना कीं मी कोणत्याही देवावर विश्वास ठेवीत नाहीं."

"मी परमेश्वराची शपथ घेऊन सांगतों कीं, तूं कोणत्याही देवावर विश्वास ठेवीत नाहींस."

"या तुझ्या भाषणावर दुसरा कोणी विश्वास ठेवणार नाहींच, पण तुझा स्वतःचा देखील त्याच्यावर विश्वास नाहींच अशी माझी जवळ जवळ खात्री आहे. देशबंधूंनों, मला असें वाटतें कीं, मिलिटसनें माझें आरोपपत्र केवळ हलकटपणानें किंवा तारुण्याच्या गुर्मीनें विशृंखळ होऊन लिहिलें आहे. जणूं काय माझी परिक्षाच पहाण्याकरितां त्यानें त्यांतच एक कोडें घातलें नाहीं काय ? माझा हा हास्यकारक विरोध शहाणा म्हणविणारा सॉक्रेटिस हुडकून काढतो कां मीच त्याला व इतरांना फसवतों तें पाहूं या, असाच त्याचा विचार असावा. कारण त्याच्या आरोपपत्रकांतच सॉक्रेटिस देवावर विश्वास ठेवीत नाहीं व ठेवतो असेही आहे, आणि हें कांहीं गंभीर भाषणाचें लक्षण नव्हें.

देशबंधूंनों, मिलीटसच्या बोलण्यांतील विरोध उघडकीस आणण्यास तुम्ही मला मदत करा, व मिलीटसला माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देऊं द्या, व मी माझ्या नित्यक्रमानेंच बोललो तर आपण मध्यें व्यत्यय आणूं नका.

"मिलीटस, एखाद्यानें मानवीय वस्तूंवर विश्वास ठेवावा पण मानवांवर ठेऊं नये हें शक्य आहे काय? ........... बंधूनों, मी विचारलेल्या

* ड्राक्मा हें एक ग्रीसचें नाणें आहे. त्याची किंमत एक फ्रँक, ९½ पेन्स किंवा ९½ आणे होईल.

+ हा उल्लेख अरिस्टोफेनस किंवा यूरिपाइडीज याच्या नाटकासंबंधीं आहे.

प्रश्नांचीं त्याला उत्तरें देऊं द्या. दरवेळीं नुसता गलका उडवून देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. एखाद्या मनुष्याचा शिलेदारीवर विश्वास असावा, पण घोड्यांवर नसावा, मुरली वादनावर असावा पण मुरलीवादकांवर नसावा, हें शक्य आहे काय? नाहीं, महाराज, हें शक्य नाहीं. तूं उत्तर देण्याचें टाळीत असलास तर मीच तुझ्यावाटचें उत्तर देतों. हें कधींच शक्य नाहीं. आतां एका प्रश्नाचें मात्र उत्तर दे. एखाद्या मनुष्याचीं अतिभौतिक किंवा दैविक कार्यकर्त्यांवर श्रद्धा असावी, पण देवयोनिविशेषांवर किंवा देवांवर नसावी हें शक्य आहे काय?"

"नाहीं."

"कोर्टाच्या साह्यानें मी तुजकडून इतकें तरी वदविलें हें तरी मोठें भाग्यच म्हणावयाचें. पण, मिलीटस, आरोपपत्रकांत तर तूं शपथेवर म्हणतोस कीं, मी दैविक कार्यकर्त्यांवर श्रद्धा ठेवतों. ते दैविक कार्यकर्ते जुने असोत वा नवे असोत, येवढें तर खरें ना कीं तुझ्या वैफीयतीप्रमाणें मी कोणत्या तरी दैविक कार्यकर्त्यांवर श्रद्धा ठेवतो. आणि माझा जर दैविक कार्यकर्त्यांवर विश्वास असेल तर मला देवयोनिविशेषांवर विश्वास ठेवल्यावांचून सुटका आहे काय? तूं उत्तर देत नाहींस यावरूनच तुला हें कबूल आहे असें दिसतें. आतां देवयोनिविशेष म्हणजे देवच किंवा देवपुत्र नव्हेत काय?"

"होय, असेंच."

आणि तुझ्या भाषणांतील हास्यकारक विरोध म्हणून मी जो म्हणतो तो हाच. देवयोनिविशेष अगर देवदूत हे देवच. मग प्रथमतः तूं माझी देवावर श्रद्धा नाहीं म्हणून म्हणतोस व लगेच ज्याअर्थी माझा देवयोनिविशेषांवर विश्वास आहे त्याअर्थी देवावरही आहे असें होतें; हेंही तुझ्याच बोलण्यावरून निघतें. कारण जर देवयोनिविशेष हें देवांना अप्सरा अगर इतर असदृश कार्यांपासून झालेलीं अपत्यें, तर देवयोनिविशेषांवर श्रद्धा ठेऊनही देवांविषयीं नास्तिकभाव बाळगणें कोणत्या

मनुष्याला शक्य आहे ? खेचरांचें अस्तित्व कबूल करून घोडे किंवा गाढवें यांच्या अस्तित्वावर विश्वास नाहीं, असें म्हणण्यासारखेंच तुझें भाषण आहे. मिलीटस, अशा तऱ्हेची अर्थहीन शब्दयोजना केवळ माझी परिक्षा करण्याकरतांच तूं केली असावीस. माझ्यावर आरोप ठेवण्यास असें सत्यस्वरूप दुसरें कांहीच नसल्यामुळें तूं हे शब्द आरोपपत्रकांत घुसडून दिलेस असें मला वाटतें. परंतु अल्पतम ज्ञान असलेल्या मनुष्याची देखील अशी समजूत करून देतां यावयाची नाहीं कीं, एखाद्याचा अलौकिक व दैविक विभूतींवर विश्वास आहे, परंतु देवांवर, देवयोनींवर, किंवा स्वर्गस्थ वीरपुरुषांवर विश्वास नाहीं.

"मिलीटसनें आणलेल्या आरोपाविरुद्ध झालें हें बोलणें पुष्कळ झालें. यापेक्षां अधिक खोल चर्चा करण्याचें कांहींही कारण नाहीं. मी मजवर कितीजणांचा द्वेष ओढवून घेतला आहे हें मी चांगलें जाणतों, व जर कदाचित् माझा नाश झाला तर त्याला कारण मिलिटस किंवा अनीटस नसून पुष्कळ साधुपुरुषांच्या भूतकालीन व भविष्यकालीन नाशाला कारण असलेला लोकांचा मत्सर व निंदा हीच त्याची मूळ कारण आहे; व लोकनिंदेला माझा बळी कांहीं शेवटलाच ठरणार नाहीं.

कोणी म्हटलें ' सॉक्रेटिस, ज्याच्या योगानें तुजवर अकालीं मृत्यु ओढवत आहे, अशा आयुष्यक्रमाची तुला लाज वाटत नाहीं काय ?' अशा प्रश्नास उत्तर म्हणून मला असें सांगता येईल कीं, जर मनुष्यामध्यें कांहीं सार असेल तर त्यानें मरणाचा हिशोब बाळगतां कामा नये. आपण करतों हें चांगलें आहे किंवा नाहीं; सारांश, आपण चांगलें आहों किंवा नाहीं हें पाहण्यापुरतीच त्यानें खबरदारी घ्यावी. परंतु तुमच्याच म्हणण्याप्रमाणें पाहूं लागलें तर ट्रॉय येथील लढाईत कामास आलेले वीरही कुचकामाचे ठरतील; व अपमान सहन करण्यापेक्षां कसल्याही संकटास न जुमानणारा थेटिसचा मुलगा अकिलीज हा तर सर्वांतच कमी प्रतीचा ठरेल. हेक्टरला मारण्याविषयीं अकि-

लीज अगदीं उत्सुक झाला असतां, त्याची आई थेटीस त्याजजवळ येऊन म्हणाली, 'जर तूं पॅट्रोक्लसच्या मरणाचा सूड उगविण्यासाठीं हेक्टरचा जीव घेशील तर तूंही मरशील. हेक्टर मेल्यावर तुजवरच मरणाची पाळी येणार आहे.' ही सूचना ऐकून देखील आपल्या मित्राच्या निधनाबद्दल सूड न घेतल्यामुळें अपमानांत खितपत पडण्यापेक्षां अकीलीजनें संकट व मरणच पत्करलें. 'समुद्रांत उभ्या असलेल्या या ग्रीक जहाजांच्या पुढें हास्यास्पद व भुमिभारभूत होण्यापेक्षां मी शत्रूवर सूड उगविलेलाच चांगला' असें त्यानें उत्तर केलें. त्यावेळीं अकिलीजनें संकटाचा अथवा मृत्यूचा विचार केला काय? एकदा आपली जागा आपण मुकरर केल्यावर किंवा एखाद्या अधिकाऱ्याकडून नियुक्त केली गेल्यानंतर संकटसमयीं देखील आपणास तीच जागा संभाळून रहावयास नको काय? अशा वेळीं जिवाची पर्वा न करतां स्वाभिमानाचीच पर्वा धरावी हेंच म्हणणें खरें आहे.

देशबंधूंनो, पॉटीडिया, ॲंफिपॉलिस आणि डेलियम् येथील लढाईच्या प्रसंगीं तुम्ही निवडलेल्या सेनाधिपतीनीं मला जी जागा नेमून दिली होती, त्या जागीं मी प्रत्यक्ष मरणाला तोंड देण्यांत इतरांनां हार गेलों नाहीं; तर मग आतां प्रत्यक्ष परमेश्वरच मला तत्त्वज्ञान्याच्या जागेवर नेमून माझें व इतरांचें परीक्षण करण्याचें काम मजकडे सोंपवीत आहे, अशी माझी दृढसमजत झाली असतां मी मरणाच्या अगर इतर संकटाच्या भीतीनें माघार घेईन काय? जर असें होईल तर मग मात्र मी देवाचें अस्तित्व मानीत नाहीं, व मी वास्तविक शहाणा नसून शहाणा म्हणवून घेण्यांत प्रत्यक्ष आपॉलोची आज्ञा मोडतो, असा मजवर खरोखर आरोप येईल. मरणाची भीति म्हणजे केवळ ज्ञानाचा दंभ होय; तें कांहीं खरें ज्ञान नव्हे. कारण त्यांत अविज्ञेय वस्तूंचें ज्ञान गृहीत धरलें जातें. कारण जें मरण सर्वांनां इतकें कष्टतम वाटतें, तें सुखतम कशावरून नसेल हें कोणास कळलें आहे काय? अविज्ञात गोष्टी ज्ञात असल्याबद्दल दंभमाजविणें ही अज्ञानाची सीमाच नाहीं काय? या

बाबतींतच माझी वागणूक इतरांपेक्षां भिन्न असल्यामुळें मला शहाणा म्हणतां येईल, कारण मला परलोकाविषयीं ज्ञान नाहीं तर मी त्या ज्ञानाचें सोंगही आणीत नाहीं. परंतु मला हें निश्चित ठाऊक आहे कीं, आपल्यापेक्षां श्रेष्ठ अधिकाऱ्याची—मग तो मानवी अधिकारी असो, कीं परमेश्वर असो—आज्ञा मोडणें हें पापमय व लांछनास्पद आहे, आणि संभवनीय सुखाला भिण्याऐवजी निश्चित पापालाच टाळण्याचा मी अटोकाट प्रयत्न करीन. अनीटसच्या बोलण्यावर आपला मुळींच विश्वास बसत नसून मजवर फिर्याद करण्याचेंच कारण नव्हतें, अशी आपली समजूत होईल तर फारच उत्तम. कदाचित् मी अपराधी आहे व मला मोकळें सोडलें तर माझ्या उपदेशानें तुमचीं मुलेंबाळें बिघडतील, परंतु अनीटसनें सुचविलेली मृत्यूची शिक्षा फार जबर होईल अशा समजुतीनें आपण मजला अशी सूचना कराल कीं, सॉक्रेटिस, या-वेळी ॲनीटसचें कांहीं न ऐकतां आम्ही तुला सोडून देतों, पण अशा अटीवर कीं, तूं आपला हा विचारक्रम व परीक्षणमार्ग सोडून दिला पाहिजे, आणि जर तुला असेंच वर्तन करतांना पकडण्यांत आलें तर मात्र तुला प्राणदंडाची शिक्षा भोगावी लागेल, तर मी त्यास असें उत्तर देतों कीं, अथीनिअन बंधूंनों माझ्या मनांत तुमच्याविषयीं आदर व प्रीति ही दोन्हीही आहेत, परंतु तुमची आज्ञा पाळण्यापेक्षां मी परमेश्वराचीच आज्ञा पाळीन; आणि जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे व शरीरांत प्राण आहे, तोंपर्यंत मी तत्त्वज्ञान शिकविण्यास किंवा तें अमलांत आणण्यास कधींहीं कमी करणार नाहीं. मला जो कोणी मनुष्य भेटेल त्याला समजुतीच्या दोन गोष्टी सांगून मी म्हणेन " सद्-गृहस्था, अथेन्ससारख्या सुप्रसिद्ध, बलिष्ठ आणि बुद्धिविशिष्ट संस्था-नांतील तूं एक नागरिक आहेस. पैसा, मानमरातब व कीर्ती, यांचा हव्यास बाळगून तूं आपल्या आध्यात्मिक उन्नतीविषयीं व सत्याविषयीं एवढा निष्काळजी व अज्ञानी आहेस याबद्दल तुला कांहींच लाज

वाटत नाहीं काय ? " जर तो गृहस्थ म्हणेल कीं, " होय, पण मी त्या बाबतींत योग्य ती खबरदारी घेत आहे, " तर मी त्याला येवढ्यावरच सोडीत नाहीं; त्याला उलटसुलट प्रश्न विचारून विचारून जर माझी खात्री झाली कीं, त्याजमध्यें कांहीं सद्गुण नाहीं, परंतु तो त्याची बढाई मात्र मारीत आहे, तर मोठया गोष्टीची हेळसांड करून लहान सहान गोष्टींनांच अधिक महत्व देण्याबद्दल मी त्याची चांगली खरडपट्टी काढतों. मला भेटणारा इसम वृद्ध असो कीं तरुण असो, स्वदेशीय असो कीं परदेशीय असो—माझा स्वदेशीय असेल तर देशबंधु म्हणून विशेषतः—त्याला मी हेच प्रश्न पुनः पुनः विचारतों; कारण मला परमेश्वराची तशी आज्ञाच आहे; आणि माझ्या ह्या परमेश्वरसेवेइतके दुसरें कशानेंही देशाचें कल्याण आजपर्यंत झालेलें नाहीं. कारण मी दुसरा कांहीं धंदाच करीत नाहीं. आपल्या शरीराची अथवा संपत्तीची काळजी करण्याचे आधीं प्रथमतः महत्वाच्या आत्मिक उन्नतीची काळजी बाळगावी, हें मी आबालवृद्धांनां शिकवीत फिरतों. मी तुम्हाला सागतों कीं, सद्गुण हा पैशानें कमावला जात नाहीं, पण सद्गुणानें पैसाच काय परंतु मनुष्याच्या खासगी अगर सार्वजनिक कल्याणाच्या सर्वच गोष्टी सिद्ध होतात. माझें शिकवणें काय तें येवढेंच आणि जर तें तरुणांनां अपायकारक असेल तर मी उपद्रयापी खास आहे. जर कोणी हें माझें शिकवणें नाहीं म्हणून म्हणेल, तर तो साफ लबाड आहे. याकरितां देशबंधूंनों काय तो आपल्या मताचा निश्चय करा व ॲनीटसचें म्हणणें मान्य करून मला अपराधी ठरवा, अगर तें अमान्य करून मला निर्दोषी ठरवा; पण येवढें मात्र खास कीं, तुम्ही कोणताही मार्ग पत्करलात तरी मी माझा क्रम सोडणार नाहीं; मग त्यांत मला एकदाच काय पण शतशः मरण्याचा प्रसंग आला तरी बेहेत्तर.

देशबंधूंनों, ऐका, गडबड करूं नका. तुमचा माझा असा ठराव झाला नाहीं काय, कीं माझें बोलणें तुम्ही शेवटपर्यंत ऐकून घ्यावें ?

मला आतां जें सांगावयाचें आहे तें ऐकून तुम्ही चकितच व्हाल, व माझ्या विरुद्ध एकच ओरड कराल, पण माझी खात्री आहे कीं, मी सांगतों हें तुमच्या कल्याणाचें आहे, म्हणून शांतपणें ऐका. आपण हें खूप लक्षांत ठेवा कीं, माझ्यासारख्या मनुष्याला आपण जिवानिशी मारलेंत तर त्यांत माझ्यापेक्षां आपलेंच अकल्याण अधिक आहे. मिलीटस काय किंवा अनीटस काय, ते माझें अकल्याण करूं शकत नाहींत. कारण दुष्ट मनुष्याला आपल्यापेक्षां श्रेष्ठ मनुष्याचें नुकसान करतांच येत नाहीं. ॲनिटससारख्याला फार तर त्याचा जीव घेतां येईल, किंवा त्याला हद्दपार करतां येईल, किंवा त्याचे नागरिकत्वाचे हक्क काढून घेतां येतील, परंतु हें करणें म्हणजें त्याचें अकल्याण साधणें आहे असें जर त्याला किंवा इतरांनां वाटत असेल तर तें चूक आहे. कारण अनीटसप्रमाणें दुसऱ्याचा अन्यायानें जीव घेण्यापासून होणारें अकल्याण हें त्याच्या कितीतरी पट मोठें आहे.

देशबंधूंनो, मी हें भाषण करीत आहे तें मजकरितां नव्हे तर तुमच्याकरितां आहे. देवानें एक देणगी म्हणून मला तुमच्यामध्यें पाठविलें आणि तुम्ही मला दोषी ठरवलेंत तर तो देवाचाच अपराध होईल; व हें पाप तुमच्या हातून घडूं नये हाच माझा उद्देश आहे. जर तुम्ही मला मारलेंत तर माझ्यामागें माझें व्रत चालविण्यास दुसरा कोणीही मिळणार नाहीं. मी एक आपली गांवढळ उपमा देतो, ज्याप्रमाणें एखाद्या धष्टपुष्ट व स्थूलपणामुळें मंद झालेल्या घोड्याला दंश देऊन चालावयास लावण्याला गोमाशीची जरूर असते, त्याप्रमाणेंच संस्थानाला माझी जरूर असून मला परमेश्वरानेंच आपणाकडे पाठविलें आहे. आणि या संस्थानरूपी अश्वावर मी दंशासारखा दिवसभर भटकतो आणि तुमचीं मनें वळवतों किंवा तुमची खरडपट्टी काढतों. तुम्हाला माझ्यासारखा दुसरा कोणी सांपडणार नाहीं, म्हणून तुम्ही माझा प्राण वांचवावा अशी मी तुम्हास सल्ला देतो. झोपेंतून एकाएकीं उठविलेल्या माणसाप्रमाणें तुम्ही सध्यां अगदीं चिडून

गेलां आहांत आणि ॲनीटसनें सुचविल्याप्रमाणें मला चिरडून टाकल्यावर राहिलेलें आयुष्य तरी स्वस्थ निद्रेंत घालवितां येईल असें आपणास वाटत असेल. यांत व्यत्यय म्हणजे परमेश्वरानें माझ्यासारखाच कोणी दंश पाठविला तरच होणार. मला परमेश्वरानें कनवाळूपणानें तुमच्याकडे पाठविलें या म्हणण्याला प्रत्यंतर हेंच कीं, जर मी इतर सामान्य जनांप्रमाणें असतों तर इतकीं वर्षे माझा उद्योगधंदा सोडून व त्याजमुळें होणाऱ्या नुकसानीकडे दुर्लक्ष करून तुमच्या भानगडींत पडलोंच नसतों; व प्रत्येक मनुष्याला पित्याच्या किंवा ज्येष्ठ भ्रात्याच्या वात्सल्यानें प्रेरित होऊन सद्गुणाविषयीं काळजी वाहण्यास शिकविलेंच नसतें. कारण हें मनुष्यस्वभावाविरुद्ध आहे. हा उपदेश करण्यांत जर माझा कांहीं फायदा असता किंवा मला त्याबद्दल पैसे मिळत असते तर गोष्ट निराळी, परंतु माझ्यावर फिर्याद करणारांनां देखील मी उपदेश करण्याबद्दल लोकांकडून पैसे मिळवितों अगर उकळतों असें म्हणण्याची छाती नाहीं, व त्या म्हणण्याला कोणी साक्षिदारही नाहीं. परंतु माझ्या बाजूचा खात्रिलायक साक्षिदार म्हणजे माझें दारिद्र्य.

एकाद्याला कदाचित् आश्चर्य वाटेल कीं, मी खासगी रीतीनें लोकांनां उपदेश करीत व त्यांच्या कामाकडे लक्ष देत फिरतो, मग सार्वजनिक रीतीनें संस्थानच्या कामांत उपदेश करण्यास मी पुढें कां येत नाहीं ? मी तुम्हाला त्याचें कारण सांगतों. तुम्ही मला पुष्कळ प्रसंगी एका अंतःप्रवृत्तिविषयीं किंवा दैववाणीविषयीं बोलतांनां ऐकलें असेल. ही दैवी वाणी म्हणजेच मिलिटसच्या आरोपपत्रकांतील उपहासाचा विषय होय. ही दैवी वाणी म्हणजे एक तऱ्हेचा धनी आहे व मला तो लहानपणापासून ऐकूं येतो, व त्याच्या योगानें मला एखादें कृत्य करण्याविषयीं आज्ञा होत नसून एखादें कृत्य न करण्याविषयीं मात्र सूचना होते. आणि याच कारणामुळें मी राजकारणांत पडण्याचें टाळलें; आणि हें फार चांगलें झालें असें मला वाटतें. कारण, देशबंधूंनों, जर मी राजकारणांत पडलों

असतों तर यापूर्वींच जिवाला मुकलों असतों व त्याच्या योगानें तुमचें व माझें कोणाचेंच कल्याण झालें नसतें. मी तुम्हांस स्पष्ट काय तें सांगतों म्हणून रागावूं नका; पण खरी गोष्ट अशी आहे कीं, तुम्हांबरोबर किंवा कोठल्याही समुदायाबरोबर लढाईवर जाऊनही ज्याला संस्थानांत प्रचलित असलेल्या अनेक अनीतिपर व गैरकायदेशीर गोष्टीशी विरोध करावयाचा आहे तो मनुष्य फार वेळ जगणार नाहीं. सत्याकरितां झगडणाऱ्या मनुष्याला अल्पकालपर्यंत जरी जगण्याची इच्छा असली तरी सार्वजनिक आयुष्यापेक्षां खासगी आयुष्यक्रमच पत्करला पाहिजे.

मी म्हणतों याचें प्रत्यंतर शब्दांपेक्षां कृतीनेंच अधिक देतां येईल, व कृती ही शब्दांपेक्षां आपणांस अधिक मान्य आहे. मी माझ्या आयुष्यांतीलच एक गोष्ट आपणांस सांगतों. त्यावरूनच आपली खात्री होईल कीं, मरणाच्या भीतीनें मी कधीं अन्याय्य गोष्टीपुढें मान वाकविली नसती व माझ्या ताठरपणामुळें मजवर मृत्यु ओढवला असता. तो हकीगतही न्यायसंबंधीच आहे व आपणास रुचणारी नसली तरी खरी आहे. देशबंधूंनो, आजपर्यंत मी एकदांच सीनेटर या हुद्याच्या जाग्यावर होतो. अर्गिनुसीच्या लढाईनंतर प्रेतें लवकर उचलल्याबद्दल सैन्याधिकाऱ्यांवर जो खटला चालला होता, त्यांत माझ्या जातीला अध्यक्षत्वाचा मान होता. त्यांची चौकशी एकत्र करणें हें कायद्याविरुद्ध होतें, व मागून आपणासही तें पटलें. पण त्यावेळीं सर्व न्यायाधिशांमध्यें या गैरकायदा वर्तणुकीविरुद्ध मत देणारा फक्त मी एकटा होतो. त्यावेळच्या वक्त्यांनीं मला पकडण्याचा व मजविरुद्ध खटला चालविण्याचा केवढा धाक घातला होता, व तुम्हींही त्यावेळीं केवढी ओरड घातलीत, पण मीही त्याच वेळीं निश्चय केला कीं, माझें म्हणणें न्यायाला अनुसरून असतां केवळ कारागृहवास किंवा मरण यांच्या भीतीनें माघार घेण्यापेक्षां जें संकट येईल तें पुरवलें. ही झाली लोकसत्तेच्या वेळची हकीगत. असल्या येथें तीस जुलमी सरदारांची सत्ता चालू असतां त्यांनीं मला व आणखी

चारचौघांना मिनार कचेरींत बोलाऊन नेलें, व सॅलमिसहून लिऑनला घेऊन येण्याचा त्यांनीं आम्हांस हुकूम फर्माविला. यांत लिऑनला ठार करण्याचा त्यांचा बेत होता, व आपल्या दुष्टकृत्यांत शक्य तितके इतरानांही गुरफटविण्याकरितां ते कसे विचित्र हुकूम सोडीत याचा हा एक मासला होता. व त्यावेळीं मी शब्दानेंच नव्हे, तर प्रत्यक्ष कृतीनें असें सिद्ध करून दाखविलें कीं, मी मरणाला काडीचीही भीक घालीत नव्हतों. माझ्या हातून कोणतीही वाईट किंवा अन्यायाची गोष्ट घडूं नये, ही माझी एकच इच्छा होती, आणि त्या तीस सरदारांच्या सामर्थ्यानें भिऊन जाऊन मी पापकर्म केलें नाहीं. मिनार कचेरी सोडून निघाल्यावर मजबरोबरच्या इतरांनीं सॅलमिसहून लिऑनला आणलें; पण मी मात्र सरळ घरीं परतलों. त्याचवेळीं माझा जीव जावयाचा, परंतु त्यांची जुलमी सत्ता लवकरच नष्ट झाल्यामुळें तो वाचला; आणि मी त्यावेळीं काय भाषण केलें हें माहीत असलेले पुष्कळ लोक आहेत.

तर मग, जर मी राजकारणांत पडलों असतों, व प्रामाणिकपणें मी नेहमीं न्यायाची व सत्याचीच कड घेतली असती, तर मी इतकीं वर्षें जगलों असतों असें तुम्हांस वाटतें काय? मीच काय पण दुसरा कोणीही जगला नसता. परंतु एकंदरींत पाहतां माझें खासगी वर्तन हें माझ्या सार्वजनिक वर्तनाप्रमाणेंच होतें; व माझे शिष्य म्हणून संबोधिल्या जाणाऱ्यांची मनधरणी मी कधींही केली नाहीं. खरोखर म्हटलें म्हणजे माझे शिष्य असे कोणीच नाहींत. परंतु मी माझें व्रत चालवीत असतां जो कोणी आबालवृद्ध येईल त्याला मज्जाव नसते. या संभाषणाबद्दल मी कांहीं फी पण घेत नाहीं. श्रीमंत किंवा गरीब कोणीही मजकडे यावें व मला प्रश्नोत्तरें करावींत किंवा माझें म्हणणें ऐकावें; व जर तो चांगला अथवा वाईट निघाला तर त्याचें श्रेय किंवा दोष मजकडे येत नाहीं; कारण मी त्याला शिकविण्याचा केव्हांच वाणा बाळगीत नाहीं. आणि जर कोणी असें म्हणत असेल कीं, सर्व जगानें न ऐकलेला असा एकादा

कानमंत्र मी त्यास एकान्तात सांगितला तर त्याचें म्हणणें सपशेल खोटें आहे.

तुम्हीं विचाराल कीं, तुजबरोबर वादविवाद करण्यांत इतरांनां एवढी हौस कां वाटते? परंतु मी त्याचें उत्तर पूर्वींच दिलें आहे. ज्ञानाची आढ्यता मिरविणारांची उलटसुलट तपासणी मोठी गमतीची असल्यामुळें ती त्यांनां आवडते. आणि हें काम मला परमेश्वराच्या आज्ञेनेंच करावें लागत आहे, व ती आज्ञा म्हणजे दैवीसंचार, दैवीसाक्षात्कार इत्यादि अनेक मार्गांनी स्पष्ट झाली आहे. आणि ही जर परमेश्वराची आज्ञा नसेल तर ती क्षणार्धांत खोटी ठरेल. मी जर खरोखर तरुणांना नादी लावून बिघडविणारा असेन, तर ज्यांना मी त्यांच्या तरुणपणीं मिथ्योपदेश केला असें वाटत असेल, त्यांनीं पुढें यावें व मजवर फिर्याद करून आपला सूड उगवावा, किंवा त्यांनां पुढें येण्यास लाज वाटत असेल तर त्यांच्या वडिलांनीं, भावांनीं किंवा इतर नातेवाइकांनीं पुढें येऊन माझ्या उपदेशामुळेंच त्यांच्या कुटुंबाचें काय नुकसान झालें तें सांगावें. हीच त्यांची वेळ आहे; व त्यापैकीं येथें कांहींजण हजरही आहेत. माझ्या बरोबरचा क्रिटो, त्याचा मुलगा क्रिटोब्युलस, इत्यादि कित्येकजण येथें हजर आहेत. यापैकीं कांहींजणांनां मिलीटसनें साक्षीदार म्हणून आणावयास पाहिजे होतें, व अजून त्याची तशी इच्छा असेल तर तसें करण्यास माझी कांहींएक हरकत नाहीं. आणि माझ्यासारखा त्याचेजवळ पुरावा असेल तर त्याला तो पुढें आणूं द्या. परंतु देशबंधूंनो वस्तुस्थिति त्याच्या अगदीं उल्ट आहे. मिलीटस व ॲनीटस म्हणतात कीं, मी तरुणांनां बिघडविणारा आहे; परंतु येथें जमलेली येवढी मंडळी माझ्याच बाजूनें साक्ष देण्यास तयार आहेत. माझ्याबाजूनें साक्ष देणारे म्हणजे मी बिघडविलेले तरुणच असें असतें तर तें आक्षेपार्ह दिसलें असतें; पण त्यांचे न बिघडलेले वडील नातेवाईकही माझ्याच बाजूला आहेत. माझ्या बाजूनेंच बोलण्यांत त्यांचा न्याय किंवा सत्य-

याखेरीज काय हेतु असणें शक्य आहे? त्यांनां पूर्णपणें माहीत आहे कीं, मी बोलतों तें खरें आहे, व मिलीटसच लबाड आहे.

देशबंधूंनों, माझें समर्थन मला केवळ या किंवा अशाच शब्दांनीं करतां येईल. आपल्या स्वतःवर असाच किंवा यापेक्षां अत्यंत सौम्य स्वरूपाचा खटला चालू असतां देखील, आपण डोळ्यांत अश्रू आणून न्यायाधिशांची कशी मनधरणी केली, आपलीं बायकापोरें व इष्टमित्र यांनां कोर्टापुढें कसें आणलें, व कशी करुणा भाकली, हें आठवून, माझा प्रत्यक्ष जीव जाण्याचा प्रसंग आला असतांहि मी त्यापैकीं कांहींच करीत नाहीं, म्हणून आपणांपैकीं एखाद्यास माझा फार राग येईल, आणि या विरोधानेंच चिडून जाऊन तो कदाचित् मजविरुद्ध आपलें मत देईल. असा कोणी आपणामध्यें आहेच असें माझें म्हणणें नाहीं; पण जर असेल तर त्याला माझें उत्तर येवढेंच कीं, 'बाबारे, मीही इतरांसारखा हाडामासांचा मनुष्यच आहे. होमर म्हणतो त्याप्रमाणें मी कांहीं दगडाचा किंवा लांकडाचा नाहीं. मलाही कुटुंब आहे. तीन मुलगे आहेत. एक अगदीं वयांत आला असून दुसरे दोघे लहान आहेत. पण मी त्यांपैकीं कोणालाही येथें आणून माझ्या सुटकेची मागणी करूं इच्छित नाहीं. याचें कारण आत्मश्लाघा किंवा तुमच्याविषयीं अनादर नव्हे. मी मरणाला भितो किंवा नाहीं, हा प्रश्नच निराळा. केवळ सर्वसाधारण समजुतीच्या दृष्टीनें देखील अशी वर्तणूक मला, तुम्हाला व सर्व संस्थानाला लाजिरवाणी आहे. माझ्यासारख्या वयोवृद्धानें व शहाणपणासाठीं नावाजलेल्या मनुष्यानें आपलीच अवनति करून घेऊं नये. मी इतरांपेक्षां श्रेष्ठ आहे हें म्हणणें खरें आहे किंवा नाहीं ही गोष्ट निराळी; पण जगाची अशी समजूत झाल्यासारखी दिसते खरी. आणि जर कदाचित् शहाणपणा, धैर्य, किंवा इतर सद्गुण यांमध्यें प्रसिद्धीस आलेला कोणताही पुरुष आपलाच अपमान करून घेत असेल, तर ती किती लाजिरवाणी गोष्ट आहे? चांगल्या प्रसिद्धीस आलेलीं माणसें

देखील देहान्त शासनाची शिक्षा झाली असतां किती चमत्कारिक वर्तन करतात, हें मीं पाहिलें आहे. जणूं काय आपण मेलों तर आपणास मोठेंच संकट पडेल, व आपण परवानगी दिलीत तर ते अमर होतील अशीच त्यांची समजूत झाली असावी. परंतु असलीं थोर माणसें म्हणजे देशाचे कलंकभूत होत, आणि जर यदाकदाचित् एखाद्या परक्या गृहस्थानें त्यांची वर्तणूक पाहिली असती तर अथेन्स येथील अत्यंत मान्य पुरुष, स्त्रीयांपेक्षां श्रेष्ठ नसतात असें त्यानें म्हटलें असतें. माझें म्हणणें असें आहे कीं आम्हांपैकीं जे कोणी अब्रूदार असतील त्यांनीं असें वर्तन करूं नये, व आपण त्यांनां करूं देऊं नये. उलट तुम्ही असें दर्शविलें पाहिजे कीं, आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या बायकामुलांनां पुढें करून शोकमय प्रसंग उभा करून आपल्या शहराची इज्जत घालविणाऱ्या पुरुषाला, शांतवृत्ति धारण करणाऱ्या पुरुषापेक्षांही तुम्ही अधिकच दंडार्ह समजता."

"सामान्य मताची गोष्ट बाजूला ठेविली तरी, न्यायाधिशाला योग्य ती माहिती देऊन त्याची खात्री करण्याचें सोडून त्याची विनवणी करून आपली मुक्तता मिळवूं पाहणें, हें चुकीचें आहे. कारण न्यायाधीशाचें काम म्हणजें न्याय देणें आहे; बक्षिस देणें नव्हे. आणि त्यानें अशी शपथ वाहिली असते कीं, मी कायद्याप्रमाणें न्याय देईन. त्याला आपल्या मर्जीनुरूप न्याय द्यावयाचा नसतो. आणि म्हणून आम्हीं तुमची मनधरणी करूं नये व तुम्ही ती करूं देऊं नये; कारण तसें करणें हें वचनभंगाइतकेंच पापकारक आहे. त्यामध्यें पावित्र्याचा लवलेशही नाहीं. मग जें मी पापमय समजतों तेंच मी करीन अशी आपण अपेक्षा बाळगूं नका, व ज्याअर्थीं याप्रसंगीं मिलीटसनें मजवर, अपवित्रतेचा आरोप आणला आहे, त्याअर्थीं, आतां तर तें अगदींच अप्रयोजक होईल. कारण जर मी माझ्या मोहक बोलण्यानें आपणांस आपल्या शपथेचा विसर पाडूं पाहीन, तर मी तुम्हांस नास्तिक बनविण्याचाच प्रयत्न करीत आहे

असें होईल. आणि अशा रीतीनें माझें संरक्षण करण्याचा प्रयत्न करीत असतांनाच मी माझ्या आरोपाला कबुलीजबाब दिला असें होईल. पण खरी स्थिति तशी नाहीं. माझ्या फिर्यादीच्यापेक्षांही माझी देवावरील श्रद्धा दृढतर व उच्चतर आहे. आणि म्हणून परमेश्वरावर पूर्ण हवाला ठेऊन तुम्हाला माझ्या व तुमच्या दृष्टीनें योग्य वाटेल तो निकाल तुम्हीं द्यावा, असें मी आपणास सांगतों."

सॉक्रेटिसचें वरील भाषण वाचल्यावर कोणाही शहाण्या मनुष्यास असें वाटणार नाहीं कीं, त्यानें असें भाषण केलें नसतें तर बरें झालें असतें. त्या भाषणांत अभिव्यक्त होणारी उच्चतमभावना, मरणाविषयीं बेपर्वा व परमेश्वरावरील दृढश्रद्धा, ही अलौकिक आहे; व या गुणाकरि- तांच सॉक्रेटिस ही विभूती पूज्य झाली आहे. परंतु ज्या उद्देशानें आरोपी भाषण करतो, त्या उद्देशाला मात्र या भाषणामध्यें जाणून- बुजून उच्चाटण देण्यांत आलें आहे. आपणास शिक्षा होऊं नये, येव- ढाच एक उद्देश मनांत ठेऊन न्यायाधीशाची करुणा भाकणें, किंवा आपणा पोराबाळांविषयीं त्यांच्या मनांत दया उत्पन्न करणें, ही तर गोष्ट दूरच, पण सॉक्रेटिसच्या भाषणांत एकप्रकारचा उद्दामपणा दिसून येत होता, व हा प्रसंग अथेन्स येथील न्यायसभेला अगदींच नवीन होता. नामांकित वक्ते, राजकारस्थानी योद्धे, यांजवर असा प्रसंग आला असतां, त्यांनींही केवळ प्राणाच्या आशेनें केलेली आत्मस्तुती व लांगुलचालन उपभोगण्यास सवकलेल्या अथीनियन न्यायाधीशांनां या भाषणाची मोठी चीड आली असेल हें साहजिकच आहे; व प्लेटोनें सॉक्रे- टिसच्या भाषणांत जी मधूनमधून कांहीं वाक्यें घातलीं आहेत, त्यांवरून असें वाटतें कीं, हें भाषण चालू असतांनां तें बंद करण्यासाठीं त्यांनीं पुष्क- ळच ओरड केली असावी. परंतु सॉक्रेटिसनें त्यांच्या विरोधास न जुमा- नतां तें भाषण शेवटपर्यंत रेटलें. हें भाषण करतांनां सॉक्रेटिसच्या मनांत न्यायाधीशांचें मन वळविण्याची कल्पना नसून, जणूं काय तो भावी

पिढ्यांकरितांच आपलें भाषण करीत आहे असें वाटतें. असे उदात्त प्रसंग क्वचित्च पहावयास सांपडतात; पण ते जेथें असतील तेथें महनीयच आहेत. ग्रोटनें असें म्हटलें आहे कीं, सॉक्रेटिसच्या फिर्यादीपक्षानें त्याचें जेवढें नुकसान केलें असेल तेवढें त्याच्या एकट्या भाषणानें केलें. ही गोष्ट खरी आहे, परंतु असे मानी वर्तन ठेऊन सॉक्रेटिसला शिक्षा झालेलीच पत्करली. आपलें सत्त्व दवडून राखिलेलें अल्प जीवित त्याला मुळींच शोभलें नसतें. या भाषणाचा अर्थातच न्यायाधिशांवर फार अनिष्ट परिणाम झाला, व ज्यावेळीं त्यांचीं मतें घेण्यांत आलीं त्यावेळीं बहुमतानें सॉक्रेटिस दोषी आहे असा निकाल देण्यांत आला. त्यातल्यात्यांत आश्चर्य करण्यासारखी गोष्ट हीच कीं, दोन्ही बाजूंमध्यें फारच थोड्या मतांचा फरक होता. या संबंधाचा नक्की आंकडा काय याविषयीं वाद आहे; परंतु एकंदरीत हें बहुमत फार अल्पसंख्याक होतें, ही गोष्ट खरी.

सॉक्रेटिस हा दोषी ठरला; परंतु त्याला काय शिक्षा द्यावी हें अद्यापि ठरावयाचेंच होतें. अथेन्समध्यें त्यावेळीं अशी पद्धति होती कीं, फिर्यादीपक्षानें आपणास योग्य वाटेल ती शिक्षा सुचवावी, परंतु आरोपीलाही त्याऐवजीं दुसरी कांहीं अल्प शिक्षा सुचविण्याची सवड असे, व अशा दोन्ही सूचना आल्यावर न्यायाधीशसभा त्यापैकीं एक शिक्षा मुक्रर करी. सॉक्रेटिसला त्याच्या अपराधाबद्दल देहांत शासन झालें पाहिजे, अशी फिर्यादीपक्षाची मागणी होती; व अथीनियन अदालतीच्या नियमाप्रमाणें सॉक्रेटिस दोषी ठरल्यावर त्याऐवजीं त्यानें दुसरी कांहीं शिक्षा सुचवावयाची होती; पण या प्रसंगींही सॉक्रेटिसनें आपला मानीपणा मुळींच बाजूस सारला नाहीं. आपल्या शत्रुपक्षानें सुचविलेल्या शिक्षेऐवजीं दुसरी शिक्षा सुचविणें म्हणजे एक तऱ्हेनें आपला अन्याय कबूल करण्यासारखेंच आहे, व असा खोटेपणा पत्करण्यास सॉक्रेटिस मुळींच तयार नव्हता. आपण दोषी ठरल्याबद्दल मुळींच

आश्चर्य व्यक्त न करतां असा ठराव अत्यल्प बहुमतानें झाला याबद्दलच विस्मय दाखवून व कदाचित् एकटाच मिलीटस फिर्यादी असता तर त्याच्या बाजूला एक पंचमांश मतें न पडल्यामुळें त्यालाच जबरदस्त दंड भरावा लागला असता असा शेरा मारून तो म्हणाला, " माझ्या-विरुद्ध पक्षानें मरणाची शिक्षा सुचविली आहे आणि अथिनियन बंधूंनों त्याऐवजीं मी दुसरें काय सुचवावें ? अर्थात् जें मला योग्य तेंच. आणि मला काय योग्य आहे ? ज्या मनुष्यानें सामान्य मनुष्यांच्या द्रव्य विषयक किंवा अधिकारविषयक आकांक्षा तुच्छ मानून केवळ खासगी आयुष्य पत्करून तरुणमनुष्यांनां सदुपदेश करण्याचें महत्कार्य केलें, अशा मनुष्याचें योग्य बक्षीस काय आहे ? कदाचित् प्रिटेनियममध्यें संस्थानाच्या खर्चानें त्याची बडदास्त ठेविली तर साजेल. तुम्ही हा मान ऑलिंपस येथील विजयी खेळाडूंनां देतां, पण अशा खेळाडूंपेक्षां माझ्या सारख्या दारिद्र्यपीडिताला त्याची अधीक जरूर आहे. आणि मजविषयीं माझें प्रामाणिक मत विचाराल तर मला तीच शिक्षा योग्य आहे.

तुम्हांस कदाचित् असें वाटेल कीं, मी तुमचा उपमर्द करीत आहे, पण वस्तुस्थिति तशी नाहीं. मीं आजपर्यंत कोणाचेंही नुकसान केलें नाहीं. माझ्या निरपराधीपणाबद्दल तुमची एकादिवसांत खात्री होणें शक्य नाहीं. इतर ठिकाणच्या कायद्याप्रमाणें मृत्युदंडाची शिक्षा होणारी फिर्याद पुष्कळ दिवस चालवावी असा येथें निर्बंध असता तर तें कदाचित् शक्य झालें असतें. परंतु केवळ एका दिवसांत दीर्घकालीक पूर्वदुर्ग्रह नष्ट करणें शक्य नाहीं. तथापि मी ज्याअर्थी कोणाचें नुकसान केलें नाहीं, त्याअर्थी मी माझेंही नुकसान करूं इच्छित नाहीं. आपण म्हणतां कीं, मीं कांहीं शिक्षा सुचवावी, पण इतकी तरी आपल्या दोषाची कबूली मी कां द्यावी ? मरणाच्या शिक्षेला मी भितो म्हणून ? छे. छे. मरण चांगलें कीं वाईट हें मला ठाऊक नाहीं; तर मग जी दुसरी शिक्षा वाईट आहे अशी माझी खात्री आहे,

अशी शिक्षा मी काय म्हणून सुचवूं ? मी जन्मभर तुरुंगवास तरी काय म्हणून पत्करावा ? व जरीं मी मोठा थोरला मुदंड भरण्याची शिक्षा सुचविली तरी मजजवळ मुळींच पैसा नसल्यामुळें तुरुंगवासच पत्करावा लागणार. कदाचित् मी हद्दपारीची शिक्षा सुचवीन असें आपल्या मनांत असेल, पण जर माझा उपदेश खुद्द माझ्या जन्मभूमींत मला निर्विघ्नपणें चालवितां आला नाहीं, तर दुसरीकडे तें कसें साधेल ? प्रत्येक ठिकाणीं प्रस्तुतसारखाच प्रसंग येईल, व जीवितलंपटता बाळगल्यास मला माझ्या वृद्धापकाळीं देखील देशोदेशीं वणवण करीत भटकण्याचा प्रसंग येईल.

आपण कदाचित् असें म्हणाल कीं, मी दुसऱ्या देशांत जाऊन मूकवृत्ति धारण करावी म्हणजे मला कोणी त्रास देणार नाहीं; पण देशबंधूनों तें अशक्य आहे. माझें उत्तर तुम्हांस पटणें फार कठीण आहे हे खरें. असें मौनव्रत पत्करणें देवाच्या आज्ञेविरुद्ध आहे असें मीं म्हटलें तर तुमचा माझ्या भाषणावर मुळींच विश्वास बसणार नाहीं; व माझ्या व दुसऱ्यांच्या दोषांचे आविष्करण करून सद्गुणाविषयीं चर्चा करणें हेंच सर्वथा हितावह आहे असें मी म्हटल्यास तें तर तुम्हास त्याहून पटणार नाहीं. पण मी म्हणतों हें निःसंशय खरें आहे. माझ्याजवळ पैसा असता तर मी कांहीं दंड सुचविला असता, पण मी दरिद्री आहे. कदाचित् मला एक मिना दंड देतां येईल तर मी तोच दंड सुचवितों. माझे मित्र प्लेटो, क्रिटो, क्रिटोब्युलस व अपॉलोडोरस म्हणतात कीं, मी तीस मिने दंड सुचवावा, म्हणून मी तो दंड सुचवितो, व त्या रकमेसाठीं तेच लायक जामीन आहेत.

सॉक्रेटिसच्या पक्षाला जी कांहीं थोडी फार अनुकूलता होती, तीही या भाषणानें पार नाहींशी झाली. प्रिटेनियनमध्यें सरकारी खर्चानें बडदास्त ठेवणें, हा अथेन्सशहरांतील सर्वांत श्रेष्ठ मान समजला जात असे, आणि आपणास तोंच योग्य आहे, असें सॉक्रेटिसनें सुचविलेलें पाहून न्यायाधिकाऱ्यांचें पित्त खवळून गेलें असेल, व यापूर्वीं ज्यांनीं

सॉक्रेटिस निर्दोषी आहे म्हणून मत दिलें होतें त्यांनाही आतां पश्चात्ताप वाटला असेल. अशा रीतीनें त्याला कांहींशी अनुकूल असलेली मंडळीहि संतापून गेली, व त्याला देहांत शिक्षेचाच हुकूम फर्माविण्यांत आला. सॉक्रेटिसनें दुसरें कांहींएक न बोलतां तीस मिने हा दंड सुचविला असता, तरी देखील आरंभीं त्याला प्रतिकूल असलेल्या न्यायाधिकाऱ्यांनीं ती शिक्षा कबूल केली असती. सॉक्रेटिसचें भाषण ऐकून प्लेटो, क्रिटो, इत्यादिकांनाही फार वाईट वाटलें असेल, परंतु सॉक्रेटिसच्या दृढ निश्चयापुढें त्यांचें कांहीं चालण्याजोगें नव्हतें.

मरणाची शिक्षा फर्माविल्यावर शेवटचे दोन शब्द बोलतांनाहि सॉक्रेटिसनें आपला पीळ कायमच ठेविला. आपण त्यांनां रुचणारें मार्ग पत्करीत नाहीं म्हणूनच आपणास शिक्षा होत आहे, हें व्यक्त करून सॉक्रेटिस स्पष्ट म्हणाला कीं, त्याच्या पश्चात् त्याची शहाणा म्हणून कितीं होऊन न्यायाधिकारीच लोकनिंदेला पात्र होतील. मानहानी करून मरण टाळण्याचे पुष्कळ मार्ग आहेत. शत्रू पाठलाग करूं लागला तर शरण जाऊन जीव वाचवितां येतो, व प्रत्येक प्रसंगी मरण टाळण्याचा असा क्षुद्र मार्ग असतोच; पण खरा महत्वाचा प्रश्न म्हणजे मरण कसें टाळतां येईल हा नसून अपवित्रपणा कसा टाळतां येईल हा आहे. मरण आणि पाप यामध्यें मरण हें अधिक मंदगति आहे. मी वृद्ध असल्यामुळें मला भरभर धावतां येत नाहीं म्हणून मरणानेंच मला पकडलें. माझे शत्रू तरुण आहेत तर ते पापाच्या कबज्यांत सांपडले आहेत. परमेश्वरी नेमानेमच तसा दिसतो. माझे प्रतिस्पर्धी आणखी कांहीं दिवस थांबते तर मी निसर्गनियमानें आपोआपच मरण पावलों असतों, पण प्रस्तुत प्रसंगानें त्यांनीं अपयश मात्र संपादन केलें.

मरणाच्या वेळीं मनुष्याला भविष्यज्ञान होतें, त्यावरून मी आपणांस असें बजावतों कीं, आपणांस या पापाचें जबर प्रायश्चित्त लवकरच भोगावें लागेल. माझ्यापेक्षां तरुण व अविचारी टीकाकार तुमच्यावर

टीकेचा यथेच्छ मडिमार करतील. आपणावर टीका करणाऱ्या मनुष्याच्य तडाक्यांतून सुटावयाचें असेल तर त्याला मारून काय उपयोग ? आपले दुर्गुण टाकणें हा एकच योग्य उपाय आहे.

जे न्यायाधिकारी मला अनुकूल असून मी दोषमुक्त व्हावें म्हणून म्हणत होते, त्यांस माझें शेवटचें सांगणे येवढेंच आहे कीं, सध्यां मजवर जो प्रसंग आला आहे तो माझ्या हिताचाच असला पाहिजे. कारण जो अंतःसाक्षात्कार मी कांहीं अयोग्य गोष्ट करूं लागल्यास नेहमीं अट-काव करतो, त्या अंतःसाक्षात्कारानें आज माझ्या कोणत्याही कृत्याला बंदी केली नाहीं. व त्यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, झालें हेंच उत्तम झालें असलें पाहिजे. दुसऱ्या एका दृष्टीनें आपण विचार केला तरी हेंच दिसून येणार आहे. मरण म्हणजे एकतर वेदनाशून्य स्थिति असेल, किंवा कांहीं लोक म्हणतात त्याप्रमाणें परलोकगमन असेल. यांपैकीं पहिला पक्ष खरा धरला, तरी स्वप्नहीन सुषुप्तीप्रमाणें मरण म्हणजे एक निर्मर्याद सुखच म्हटलें पाहिजे. कारण मग सर्व काल हा अनंत पण एकरूप रात्रीसारखा होईल. ह्या जगांत आपण चौकशीच केली तर आपणांस आढळून येईल कीं, अगदीं कांहीं स्वप्नें न पडतां जी गाढ झोंप लागेल ती रात्र आपण फार सुखाची अशी मानतो. अशा सुखमय रात्रीं फारच थोड्या असतात. म्हणूनच मी म्हणतों कीं, मृत्यु हा स्वप्नहीन दीर्घकालिक निद्रा असेल तर त्यांत माझा फायदाच आहे. कदाचित् दुसरा पक्ष खरा असला तरीहि फारच उत्तम आहे. त्या ठिकाणच्या स्वर्गीय न्यायाधीशांचीं मी भेट घेईन. तेथें मला पुरातन योद्धे व पुरातन कवी भेटतील. माझें सत्यसंशोधनाचें काम तेथें ठीक चालेल. मी त्या प्रसिद्ध पुरुषांना प्रश्न करून त्यांच्या ज्ञानाची छाननी करीन व कोण खरा शहाणा व कोण ढोंगी हें उघड करीन. वाहवा ! यामध्यें केवढा तरी आनंद आहे ! केवळ दुसऱ्यास प्रश्न विचारण्याबद्दल तेथें कांहीं फिर्याद होत नसेल. कारण एक तर तेथील रहिवाशी आपणांहून अधिक

सुखी आहेत व ते अमरही असले पाहिजेत. ( व म्हणूनच देहांतशासन हें तेथें शक्य नाहीं. ) मृत्यूचा अर्थ हाच असेल तर मी पुनःपुनः मरण्यास तयार असलें पाहिजे. याकरितां सर्व दुःख दूर सारा, मला मृत्यु येत आहे तो परमेश्वराच्या योजनेनेंच येत आहे, व म्हणूनच मी माझ्यावर फिर्याद करणारांचा किंवा मला शिक्षा देणाऱ्या न्यायाधिशांचा राग मानीत नाहीं. त्यांचा मूळ उद्देश मात्र माझें हित करण्याचा नव्हता, व त्याबद्दलच मी त्यांनां फारतर थोडासा दोष देईन. तथापि त्यांजजवळही मला एक मागणें मागावयाचें आहे. ज्यावेळीं माझीं मुलें मोठीं होतील त्यावेळीं तीं सद्गुणसंपादन करण्यापेक्षां संपत्तीचीच हाव बाळगूं लागलीं किंवा त्यांच्या अंगीं नसलेल्या विद्वत्तेचा किंवा सद्गुणांचा दंभ माजवूं लागलीं, तर ज्या प्रमाणें मी तुम्हास त्रास दिला त्या प्रमाणेंच तुम्ही त्यांनांही द्यावात व त्यांनां ताळ्यावर आणावें; आणि आपण असें केलेंत म्हणजे आपलें माझ्याजवळ व माझ्या मुलांजवळ न्याय्य वर्तन झालें असें मी समजेन.

" आतां वेळ भरत आली आहे; आपणांस निरनिराळ्या वाटांनीं जावयाचें आहे. आणि मला मरावयास जावयाचें आहे तुम्हांस जिवंत रहावयास जावयाचें आहे; परंतु या दोहोंपैकीं अधीक चांगलें कोणचें हें एक त्या परमेश्वरालाच ठाऊक."

हें भाषण झाल्यावर लगेच सॉक्रेटिसाला कारागृहांत नेण्यांत आलें.



# प्रकरण ६ वें.

## शेवट.

सामान्य मनुष्याच्या अनुभवावरून बोलावयाचें झाल्यास आपणांस असें म्हटलें पाहिजे कीं, ज्या गोष्टी तडकाफडकी होऊन जातात, त्या दु:खदायक असल्या तरी मनुष्य त्याला धैर्यानें तोंड देऊं शकतो. परंतु दीर्घकालपर्यंत मनाचा धीर रहाणें हें असामान्य मनुष्यालाच साधणार. जुलमी सत्तेविरुद्ध बंड केल्यामुळें एखाद्या देशभक्ताला फांशीची अगर तोफेच्या तोंडी देण्याची शिक्षा झाली तर ती भोगणें त्याला फारसें अवघड वाटत नाहीं; परंतु आपल्या साथीदारांचीं नांवें फोडण्यासाठीं म्हणून जर त्याजवर हाल आपेष्टांचे प्रयोग होऊं लागले, तर त्याची स्वत्वच्युती होण्याची फारच मोठी भीति असते. वास्तविक दोन्ही ठिकाणीं मरण हेंच डोळ्यांपुढें दिसणार; पण एका ठिकाणीं तें झटकन् येतें व दुसऱ्या ठिकाणीं तें एकसारखें डोकावत असतें; पण पुढें मात्र होत नाहीं. त्याचा तो भयप्रद देखावा मात्र अत्युत्कटतेनें पुढें येतो, परंतु त्याची सर्वदु:खहारिणी किंवा निदान सध्यापुरती स्मृतिहारिणी मगरमिठी येऊन पडत नाहीं. प्रत्यक्ष मरणापेक्षां या मरणचिंतनाचें स्वरूप फारच भयंकर आहे; व अशा प्रसंगींही जो पुरुष यत्किंचितही डगमगत नाहीं, ज्याच्या हृदयाची स्थिरता अणुमात्र कमी होत नाहीं, ज्याची उल्हसितवृत्ती व परमेश्वरावरील दृढश्रद्धा कंप पावत नाहीं, तो पुरुषच खरा अलौकिक व संयमी म्हटला पाहिजे.

सॉक्रेटिस याही दिव्यांतून तावून सुलाखून अगदीं शुद्धस्वरूप बाहेर पडला, ही मोठी कौतुक करण्याजोगी गोष्ट आहे. त्यावेळीं दरवर्षीं अथेन्समधून डेलॉस येथील अपोलो देवाला पूजा बांधण्यासाठीं एक जहाज

रवांना होत असे, व तें जहाज अथेन्सहून निघाल्यापासून परत येईपर्यंत सरकारी हुकमानें कोणालाही मृत्यूची शिक्षा देणें हें अपवित्रपणाचें समजण्यांत येत असे. सॉक्रेटिसवरील खटल्याच्या आदल्या दिवशींच हें जहाज डेलॉसला जाण्यासाठीं रवाना झालें होतें, म्हणून तें परत येईपर्यंत सॉक्रेटिसला सरासरी तीस दिवसपर्यंत तुरुंगांत शृंखलाबद्ध स्थितींत रहावें लागलें. त्यांतल्यात्यांत सुखाची गोष्ट म्हणजे येवढीच कीं, त्याच्या मित्रमंडळींनां त्याला भेटावयाची सदर परवानगी असे, व ते दिवसभर त्याच्या जवळच असत. या दीर्घकाळांत सॉक्रेटिसनें आपल्यावर कोसळणाऱ्या संकटाबद्दल एकही दुःखोद्गार काढला नाहीं. आपणावर प्रसंग आला आहे हा संकटाचाच नव्हे, कदाचित् सुखाचाच असेल ही त्याची भावना इतकी जागृत होती कीं, त्याची उल्हसित वृत्ति किंवा तत्त्वविचाराची आवड मुळींसुद्धां कमी झाली नाहीं. ज्या वेळेस सॉक्रेटिसला मरणाची शिक्षा देण्याचा हुकूम करण्यांत आला, त्यावेळीं त्याचा मित्र व शिष्य अपोलेडोरस हा त्याजजवळ जाऊन म्हणाला, तुम्ही अगदीं निरपराधी असून मरतां याबद्दल मला फार वाईट वाटतें. यावर सॉक्रेटिसनें हंसून येवढेंच उत्तर केलें कीं, तर मग मी अपराधी असून मरावें अशी तुझी इच्छा आहे काय? या प्रश्नामध्यें जो कांहीं उल्हास व बेफिकिरपणा दिसून येतो, तोच उल्हास व बेफिकिरपणा त्याच्या तुरुंगांतील वर्तनामध्यें दिसून आला.

सामान्य जनांच्या चित्तवृत्ति व्यथित करणारी मरणकल्पनेची टोंचणी त्यानें टाळली हें तर खरेंच, पण सॉक्रेटिसची एका अन्य मोहाबद्दलही परीक्षा व्हावयाची होती. सॉक्रेटिससारख्या महात्म्यानें केवळ अन्याय्य शिक्षेला बळी पडावें, हें त्याच्या मित्रमंडळींनां तर पसंत नव्हतेंच, पण इतर ठिकाणच्या कित्येक लोकांनांही तें पसंत नव्हतें. त्यांच्या मनांत सॉक्रेटिसविषयीं फार आदर असे, व त्याचा प्राण वाचविण्यासाठीं वाटेल ती मदत करण्यास ते तय्यार होते. सॉक्रेटिसजवळ ही गोष्ट काढण्यास

कोणी योग्य मनुष्य असल्यास तो वयोवृद्ध क्रिटोच होता. त्यानें सॉक्रे-टिसला ही गोष्ट कशी सुचविली व सॉक्रेटिसानें त्यावर काय उत्तर केलें, हें प्लेटोनें आपल्या क्रिटो नामक संवादांत सांगितलें आहे.

सॉक्रेटिसच्या मृत्यूची पताकाच असें तें डेलॉसला गेलेलें जहाज अथेन्सच्या अगदीं जवळ आल्याची वर्दी येऊन पोंचली होती. तें जहाज खुद्द अथेन्सला येण्यास आतां फार तर एकदीड दिवसाचा अवकाश होता. सॉक्रेटिसची सुटका करावयाची असल्यास जें करणें असेल तें तावडतोब केलें पाहिजे अशी वेळ येऊन ठेपली होती. क्रिटो हा मोठ्या पहाटेस उठला व तुरुंगात सॉक्रेटिसकडे गेला. क्रिटो हा त्याज-कडे नेहमींच जात असल्यामुळें त्याला कोणीही अटकाव केला नाहीं. क्रिटो सॉक्रेटिसच्या खोलींत जाऊन पहातो तों तो गाढ निजलेला!! ज्या मनुष्याला मरणाची शिक्षा होण्याच्या अगोदर इतकी स्वस्थ झोंप येते, तो एकतर मृत्पिंडच असला पाहिजे, किंवा सॉक्रेटिससारखा संयमी महात्मा तरी पाहिजे. सॉक्रेटिस जागा झाल्यावर क्रिटोनें त्याला गलब-ताच्या आगमनाची वर्दी दिली. सॉक्रेटिसलाही याच बाबतींत एक स्वप्न पडलें असल्याबद्दल त्यानें सांगितलें. एक उज्वलवेषधारी सुंदर स्त्री त्याला दिसली व होमरच्या एका पंक्तीनें तिनें त्याला तीन दिवसांनीं तूं पर-लोकीं येशील अशी सूचना दिली होती. मरणाला न डगमगतां त्याची मार्गप्रतीक्षा करीत असणारा सॉक्रेटिस व त्याच्या मरणविषयक कल्प-नेनेंच व्यथित होणारा क्रिटो, असें हें चित्र मोठें संस्मरणीय आहे. 'पण सॉक्रेटिस मरणारच कां?' हा विचार क्रिटोच्या मनांत येत होता. सॉक्रेटिसनें मनांत आणलें तर त्याची सुटका होणें शक्य आहे, मग ती त्यानें कां करून घेऊं नये? क्रिटोनें सरते शेवटीं त्याजजवळ ही गोष्ट काढली. जर यावेळीं सॉक्रेटिसची सुटका करण्यांत आली नाहीं तर जग त्याच्या मित्रमंडळींना दोष देईल. क्रिटोजवळ पैसा होता व तो त्यानें खर्च केला असता तर सॉक्रेटिस सुटला असता; परंतु आपल्या मित्राचा

प्राण वाचविण्यासाठीं क्रिटोनें कांहींही केलें नाहीं, अशीच लोक त्याला नांवें ठेवतील. आपल्याकरितां नाहीं तर निदान आपल्या मित्रमंडळीच्या अब्रूकरितां तरी त्यानें निसटून जाण्याच्या बेताला आपली संमति द्यावी. सॉक्रेटिसला कदाचित् असें भय वाटण्याचा संभव होता कीं, मी निसटून गेल्यास माझ्या मित्रांनां उलट त्रास होईल, म्हणून त्याला क्रिटोनें बजाविलें कीं एकतर त्याचे मित्र त्याच्यासाठीं वाटेल ती चीज सोसण्यास तयार होते, व दुसरें असें कीं थोडाफार पैसा खर्च केला तर सॉक्रेटिसला बिनबोभाट निसटून जाणें शक्य होतें. क्रिटो तर आपला सर्व पैसा खर्च करण्यास तयार होताच, पण थीब्सचा रहाणारा सिमिथस व सॅमॉसचा रहिवासी सीब्स व इतर कित्येकजण या कामीं वाटेल तितका पैसा खर्च करण्यास तयार होते. ज्यावेळीं सॉक्रेटिसनें कोर्टांत भाषण केलें, त्यावेळीं हद्दपारीची शिक्षा न पत्करण्याचें त्यानें असें कारण दाखविलें होतें कीं, ज्या मनुष्याचा त्याचे देशबांधव किंवा संस्थानबांधव तिरस्कार करतात, त्याला दुसरेही मान देणार नाहींत, उलट त्याचा छळच करतील. परंतु क्रिटोचें असें म्हणणें होतें कीं, जर सॉक्रेटिस थेसली प्रांतासारख्या ठिकाणीं गेला तर लोक तेथें त्याचा आदरसत्कारच करतील. मग अशा रीतीनें आपला प्राण वाचण्याचा संभव असतां सॉक्रेटिसनें मुद्दाम मरण अंगावर ओढून घ्यावें काय? बरें, सॉक्रेटिस कांहीं अगदीं एकटा फटिंग नव्हता. त्याला मुलें होतीं. मग त्यांना जाणूनबुजून पोरकीं करण्याचें पाप त्यानें पत्करणें योग्य होतें काय? सारांश, सॉक्रेटिसनें निसटून जावें हेंच कित्येक बाजूंनीं योग्य होतें. अडचण जर कांहीं असेल तर त्याचा निश्चय होण्याचीच.

क्रिटोचें वरील प्रकारचें सर्व भाषण सॉक्रेटिसनें अगदीं संथपणें ऐकून घेतलें, व मग तो पुढें बोलूं लागला. क्रिटोची तत्परता ही अतिशय स्तुत्य होती हें खरें; पण ज्या तत्परतेचा विषय अन्याय्य. ती तत्परता तितकीच अश्लाघ्य ठरणार. यासाठीं क्रिटो सांगतो त्याप्रमाणें

वागणें योग्य आहे किंवा नाहीं, हें आधीं पाहिलें पाहिजे. जर तसें वागणें योग्य नसेल तर केवळ बहुतजनसमाज तसें म्हणतो ही सबब पुरेशी होणार नाहीं. फार काय पण बहुजनसमाजाच्या धाकाला अगर त्यानें केलेल्या शिक्षांना भीक घालणें देखील योग्य होणार नाहीं. सॉक्रेटिसनें व दुसऱ्याही अधिकारसंपन्न पुरुषांनीं हें तत्त्व अनेकवार सांगितलें आहे कीं, कित्येक पुरुषांचीं मतें अवश्य विचारणीय असतात, व कित्येकांची नसतात. उदाहरणार्थ, एकदोघा शहाण्यांचीं मतें शेंकडो मूर्खांच्या मतांपेक्षां अधिक मानार्ह असतात. सॉक्रेटिसनें व इतर थोर पुरुषांनीं प्रतिपादिलेला हा नियम सॉक्रेटिसला शिक्षा झाली या आकस्मिक गोष्टीमुळें बदलला आहे काय? क्रिटो हा या ठिकाणीं तटस्थ आहे, कारण हा प्रश्न त्याच्या स्वतःच्या मरणाचा नाहीं, व म्हणून या प्रश्नाचें उत्तर त्यालाच अधिक चांगलें देतां येईल.

सॉक्रेटिसच्या या वरील मुद्याला रुकार देणें क्रिटोला भागच आहे. या पुढील प्रश्न म्हणजे ज्या थोड्या लोकांचें आपण ऐकावयाचें ते कोण असावेत? जर एखाद्या मनुष्याला आपली शरीरसुधारणा करावयाची असेल तर तो भराभर अननुभवी लोकांचें म्हणणें न ऐकतां एकाद्याच तज्ज्ञ मनुष्याचा सल्ला घेतो व आपले आहारविहारादिक त्याप्रमाणें नियमित करतो. व त्याचें हें करणें बरोबर आहे असेंच आपण कबूल करतों. मग केवळ शरीर सुधारणेबद्दल जी गोष्ट खरी, ती न्याय्यान्याय्य गोष्टींचा निर्णय करतांनाही आपणास लक्षांत घेतली पाहिजे. या ठिकाणीं आपल्या शरीरापेक्षांही श्रेष्ठ अशा मनाच्या अगर आत्म्याच्या उत्कर्षाचा प्रश्न असल्यामुळें आपणास विशेष सावध राहिलें पाहिजे, व म्हणूनच केवळ लोक म्हणतात येवढ्यासाठीं एकादी गोष्ट करणें अयुक्त आहे.

मनुष्यानें जाणूनबुजून वाईट कृत्य करूं नये. फार काय पण दुसऱ्याचा सूड उगविण्यासाठीं देखील अन्याय्य कृत्य करूं नये. कारण जें वाईट तें अहितकारकच, मग तें कोणत्याही परिस्थितींत घडो. सॉक्रेटिसनें

या मताचें अनेकवार प्रतिपादन केलें होतें. आतांच तीं मतें टाकून देणें म्हणजे सर्वच पोरखेळ होणार, सबब सॉक्रेटिसला तीं मतें मान्य केलींच पाहिजेत. क्रिटोलाही ती मान्य आहेत, मग आतां पुढील प्रश्न हा कीं, अथीनियन लोकांनीं केलेल्या हुकमाच्या विरुद्ध तुरुंगांतून निसटून जाणें न्यायाचें आहे किंवा नाहीं. तें जर अन्याय असेल तर लोकनिंदा, मुला-बाळांचा पोरकेपणा, मरणाची व्यथा, या सर्व गोष्टींचा विचार बाजूसच सारला पाहिजे. मुख्य पहावयाचें म्हणजे मरणाचे आनुषंगिक परिणाम न पहातां ते टाळण्यांत कोणाचा अन्याय होतो आहे किंवा काय हें पाहिलें पाहिजे. या प्रश्नाचाच क्रिटोला अन्य रीतीनें विचार करावयाचा असेल तर घटकाभर आपण असें समजूं कीं, त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागावयाचें ठरवून सॉक्रेटिस पळून जाण्याच्या—पाहिजे तर सुटून जाण्याच्या म्हणा—तयारीला लागला, व तो काय करणार हे पाहून संस्थानाचे कायदे-कानु त्याजपुढें मूर्तिमंत उभे राहिले, व त्याला विचारूं लागले कीं, सॉक्रेटिस, हें तूं काय करीत आहेस? सर्व लोकांनीं मान्य केलेल्या कायद्यांचा हुकूम मोडणें तुला योग्य आहे काय? जर तुझ्याप्रमाणें सर्वचजण कायद्यानें केलेले हुकूम मोडूं लागले, तर समाजव्यवस्था तरी शांततेनें व सुरळीत चालेल काय? तूं असें म्हणशील कीं, कायद्यानें मला अन्याय्य शिक्षा केली म्हणून मी तो मोडतो, तर त्यावर आम्ही तुला असें विचारतों कीं, तुझा आमचा असा कधी करार झाला होता काय, कीं तुला आमच्या विरुद्ध अशी काय तक्रार आणतां येणार आहे कीं, ज्याच्या योगानें तुझ्या या वर्तमानकृत्याचें समर्थन होऊं शकेल? तुझा सर्व जन्मच सर्वस्वी आम्हांवर अवलंबून नाहीं काय? तुझ्या आई-बापांनीं ज्या कायद्याप्रमाणें लग्न केलें, व ज्या कायद्यामुळें तूं जगांत निर्माण झालास, ते विवाहाचे कायदे तुला मान्य नाहींत काय? ज्या कायद्यानें तुला शिक्षण देणें तुझ्या पित्याला भाग पडलें ते शिक्षण-विषयक कायदे तूं मानीत नाहींस काय? तुझ्या बापजाद्याप्रमाणें तूंही

आमचें एक अपत्य किंवा आमचा एक गुलाम नाहींस काय ? तूं आमच्याशी मुलाच्या नात्यानें वागावेंस व आमचा उपमर्द करूं नयेस, हें योग्य नाहीं काय ? जर एखाद्या बापानें रागाच्या आवेशांत आपल्या मुलाला मारिलें, तर मुलानें बापास उलटून मारावें ही नीति आहे काय ? व ही त्याची कृतज्ञताबुद्धि आहे काय ? मग आईबापांपेक्षांही आपला देश व त्याच्या सुस्थितीला अवश्य असणारे कायदे हें अधिक पूज्य आहेत ही गोष्ट तुझ्यासारख्या तत्त्वज्ञान्यालाही समजूं नये काय ? आपले आई-बाप आपणावर रागावले तरी त्यांचा उपमर्द न करतां ते करतील ती शिक्षा निमूटपणें सोसणें हें जर अत्यंत अवश्य, तर कायद्यानें केलेला हुकूम कितीही दुःखदायक असला तरी तो शब्दशः पाळणें त्याहीपेक्षां शतपट अवश्यक नाहीं काय ?

इतकेंच नव्हे. सॉक्रेटिस, आम्ही तुला जन्म दिला, लहानाचा मोठा केला, तरीही तुला आमच्या कक्षांत राहणें पसंत नसेल तर तुला तशी मोकळीक होती. तूं जेव्हां वयांत आलास त्यावेळीं आपली सर्व चीजवस्त घेऊन सुरक्षितपणें व राजरोसपणें तुला वाटेल तेथें जातां आलें असतें. अशा रीतीनें एखादा मनुष्य एक संस्थान सोडून दुसरीकडे जावयाला लागला तर त्याला कोणत्याच कायद्याची आडकाठी नाहीं; पण सॉक्रेटिस तूं तसें केलें नाहींस. तुला हें संस्थानच फार आवडलें. इतर लोक प्रवा-साच्या निमित्तानें तरी बाहेर जातात, पण तुझें या संस्थानावरील प्रेम इतकें जबरदस्त कीं, तूं त्याला सोडून क्वचितच राहिलास. संस्थानाच्याच वतीनें पॉटीडियासारख्या ठिकाणीं लढावयास किंवा अगदीं क्वचित प्रसंगीं कॉरिंथला शर्यती पहावयास गेला असशील तेवढाच; नाहींतर अगदीं आंधळ्यापांगळ्यांप्रमाणें तूं आपणास या संस्थानांत डांबून ठेवलेंस. तुला इतर संस्थानांविषयीं व तेथील कायदेकानूंविषयीं माहिती नव्हती असेंही नाहीं; पण इतकें असूनही ज्या अर्थीं तूं येथेंच राहिलास त्याअर्थीं

तुझी आमच्यावर प्रीति होती, व आमची आज्ञा पाळण्याची तूं जाणून बुजून कबुली दिली होतीस, असें म्हणावयास काय हरकत आहे ?

कदाचित् तूं असें म्हणशील कीं, माझ्यावर अशी अन्याय्य फिर्याद होईपर्यंत माझी तुमच्यावर प्रीति होती, पण मजवर हा गहजब गुदरल्यापासून ती उडून गेली. तर आम्हीं तुला असें विचारतों कीं, ज्यावेळीं तुला मरणाव्यतिरिक्त दुसरी कांहीं शिक्षा सुचविण्याचा कोर्टाचा हुकूम झाला होता, त्याच वेळेस तूं हद्दपारीची शिक्षा कां सुचविली नाहीस ? ती शिक्षा तूं सुचविली असतीस तर कदाचित् ती न्यायाधिकाऱ्यांनीं मान्य केली असती; व मग तुला राजरोसपणें दुसरीकडे जातां आलें असतें. परंतु त्यावेळीं तुला हद्दपारीपेक्षां मरणच बरें वाटलें; मग आतां कायद्याविरुद्ध पळून जाण्याची इच्छा कां करतोस ?

आमचा उपमर्द करून तूं पळून गेलास तर तुझ्या मित्रांनां हद्दपारीची शिक्षा होईल, त्यांची संपत्ती सरकारजमा होईल, ही तर आपत्ती आहेच; पण तूं जाशील तरी कुठें हा प्रश्नच नाहीं का ? तूं जर मिगारा किंवा थीब्ससारख्या सुसंघटित संस्थानांमध्यें गेलास, तर तेथील लोक तुला आपला शत्रूच समजतील, कारण ज्यानें एका संस्थानाचें कायदे बिनदिक्कत मोडले, तो दुसऱ्या संस्थानांचे व तेही परकीय संस्थानाचे कायदे मोडील हें उघड आहे. व असा कायदे मोडणारा पुरुष तरुण मुलांनां बिघडविणारा आहे, हेंही त्यावरून ओघानेच प्राप्त होईल. तर मग सद्गुणी संस्थानें सोडून तूं दुर्गुणानें बुजबुजलेल्या संस्थानांकडे वळशील काय ? अशाच अटींवर केवळ कसें तरी जीवित कंठणें तुला शोभतें काय ? कां तूं आपला निर्लज्जपणानें त्या चांगल्या संस्थानांतच जाशील ? पण असा गेलासच तर तूं तेथें सद्गुण, समाजसुस्थिति, न्याय, इत्यादि विषयांवर अवाक्षर तरी काढूं शकशील काय ? क्रिटोचें थेसलीमध्यें कांहीं मित्र आहेत, त्यांजकडे तूं गेलास तर साघेलसें वाटतें खरें; कारण आजकाल थेसलीमध्यें मोठीच

अंदाधुंदी माजली आहे; परंतु हें तरी किती दिवस चालेल ? जोंपर्यंत तूं तेथें नवीन आहेस, तुझ्या निसटून येण्याच्या कृत्यांतील वैचित्र्य जोंपर्यंत कायम आहे, तुझ्या वेषांतरादिकांतील गमती जोंपर्यंत विनोदकारक आहेत, तोंपर्यंत तुला तेथें चांगला आश्रय मिळेल. पण या गोष्टी लवकरच शिळ्या व बेचव होतील, आणि मग तुला केवळ गोळाभर अन्न मिळविण्यासाठीं सगळ्यांची हांजी हांजी करून रहावें लागेल. मग तुझे उदात्त विचार कोठें जातील?

आपल्या मुलाबाळांच्या कल्याणासाठीं तूं हा अश्लाघ्य मार्ग पत्करतोस म्हणून म्हणावें, तर आम्ही असें विचारतो कीं, आपल्या मुलांनां थेसलीमध्यें नेऊन त्यांचा अथेन्सच्या नागरिकत्वाचा हक्क बुडविण्याचा कां तुझा विचार आहे? त्यांच्यावर तूं उपकार करणार तो हाच काय ! तूं थेसली प्रांतांत जिवंत असलाच तरच तुझे मित्र येथें त्यांची अधीक काळजी घेतील असें तुला वाटत असेल, तर हा तुझा भ्रम आहे. जे तुझे खरे मित्र आहेत ते, तूं थेसलीमध्यें असलास काय किंवा परलोकांत असलास काय, आपलें कर्तव्य करावयास कधींही चुकणार नाहींत.

याकरितां सॉक्रेटिस, आमचें ऐक. तूं अविचारानें वागलास तर या लोकीं तुझें, तुझ्या मित्रांचें, तुझ्या मुलाबाळांचें कल्याण होणार नाहींच उलट तूं या लोकांत असशील तेथपर्यंत या विश्वासघाताबद्दल आम्हीं तुझा तिरस्कारच करूं; पण तूं परलोकीं गेल्यावर आमचे बांधव जे तेथील कायदे तेही तुझा, आमचा शत्रू या नात्यानें तिरस्कार करतील. तूं आतां मेलास तर तुजकडे पाप येत नाहीं, तूं सत्याचरणासाठी बळी पडतो असेंच होत आहे. म्हणून क्रिटोचें ऐकूं नकोस.

क्रिटो, माझ्या कानांमध्यें हाच ध्वनी सारखा दुमदुमून राहिला आहे, व त्यानें मला दुसरें कोणचेंही भाषण ऐकूंच येत नाहीं. यास्तव तूं जा, व मला परमेश्वर धाडील तिकडे जाऊं दे.

क्रिटोच्या संवादांतील वरील विचार वाचून, ज्या सॉक्रेटिसची न्यायनिष्ठा येवढी जबरदस्त व ज्याची समवृत्ति येवढी निश्चित, तो त्रिवार धन्य होय असेंच वाटतें.

सॉक्रेटिसच्या ऐहिक आयुष्यांतील शेवटच्या दिवसाची हकीगत प्लेटोच्या फीडों या संवादांत आली आहे. त्या दिवशीं प्लेटो हा स्वतः आजारी असल्यामुळें तुरुंगांत सॉक्रेटिसला भेटावयास गेला नव्हता, परंतु सॉक्रेटिसची इतर सर्व मित्रमंडळी व परगावांहून सॉक्रेटिसचे शेवटचे दोन शब्द ऐकण्याच्या औत्सुक्यानें आलेले प्रसिद्ध पाहुणे वगैरे मंडळी त्या दिवशीं पहाटेच्याच सुमारास तुरुंगाजवळ आली. सॉक्रेटिसकडे नित्य येण्याचा त्यांचा क्रमच असे. सॉक्रेटिसचा इन्साफ ज्या कोर्टांत झाला ती कोर्टाची जागा अगदीं नजीकच होती; त्या ठिकाणी ही मंडळी उजाडतांच एकत्र जमत व तुरुंगाचे दार उघडल्याबरोबर सॉक्रेटिसकडे जात. डेलॉसहून जहाज परत आल्याची बातमी त्यांनां आदल्या दिवशीं संध्याकाळींच समजली होती; व आपणास आतां सॉक्रेटिसचें दर्शन पुनः होणार नाहीं, व त्याच्या अमृतमधुर वाणीचा लाभ आपणास पुनः मिळणार नाहीं, या विचारानें व्यथित झालेली त्याची स्नेही मंडळी त्या दिवशीं रोजच्यापेक्षांही लवकरच जमलीं होती. तुरुंगावरील अधिकाऱ्यानें नित्याप्रमाणें दार उघडलें, पण एकदम त्यांनां आंत जाऊं दिलें नाहीं. अथेन्समधील अकरा अधिकाऱ्यांचें मंडळ सॉक्रेटिसकडे गेले असून त्याच्या बिडया काढण्याचा व त्याला आजच विषप्राशन केलें पाहिजे अशी सूचना देण्याचा कार्यक्रम सुरू होता. हें काम आटपल्यानंतर सॉक्रेटिसच्या मित्रमंडळीनां आंत घेण्यांत आलें.

सॉक्रेटिस आपल्या बिछान्यावर पडला असून त्याच्या पायांतील बिडया काढण्यांत आल्या होत्या. त्याची बायको झँटिपी ही आपल्या मुलाला घेऊन त्याच्याजवळच बसली होती. सॉक्रेटिसच्या मित्रमंडळीनां आंत येतांनां पाहून ती मोठ्यानें आक्रोश करीत म्हणाली,

तुमच्या व यांच्या संभाषणाचा आज शेवटचा प्रसंग आहे. ' तिचा तो आक्रोश ऐकून सॉक्रेटिस म्हणाला, ' क्रिटो, तुझ्या माणसांपैकीं कोणा-बरोबर तरी हिला घरी पोंचवून दे. ' क्रिटोनें त्याप्रमाणें व्यवस्था केली, व झँटिपी रडत ओरडत व ऊर बडवीतच तेथून निघून गेली. नंतर सॉक्रे-टिस उठून बसला व आपले पाय चोळीत चोळीत म्हणाला, सुख म्हणून ज्याला नांव देतात ती वस्तु किती चमत्कारिक आहे, व त्याचा दुःखाशी असलेला संबंध तरी किती चमत्कारिक आहे? त्यांपैकीं दोन्हीही एकाच काळीं एकत्र नसतात; पण एखाद्या मनुष्यानें एकाचा पाठलाग केला, कीं दुसरें त्याच्या पाठीस लागलेंच म्हणून समजावें. त्यांची शरीरें दोन आहेत, पण डोकें जणूं एकच आहे. इसापला जर या जोडीची आठवण झालीं असती तर त्यानें अशी कांहींतरी गोष्ट लिहिली असती. देवाला सुख व दुःख यांचे भांडणच मिटवितां येईनां म्हणून सरतेशेवटीं त्यानें त्यांची डोकीं एकत्र बांधून एकजीव करून टाकलीं आणि या कारणामुळेंच एक जाईल तिथे दुसरेंही धावतें. माझाच अनुभव पहा. बिड्या घातल्यामुळें मला पूर्वी दुःख झालें तर आतां त्या काढल्यामुळें सुख झाले.

हें भाषण ऐकून सीब्स म्हणाला, सॉक्रेटिस, आपण इसापबद्दल गोष्ट काढली, हें बरें झालें. मला कित्येकजणानीं विचारलें व सुप्रसिद्ध कवी इव्हेनस यानें तर नुकतें परवांच विचारलें कीं, सॉक्रेटिसनें आज-पर्यंत कवितेची एकही पंक्ति लिहिली नाहीं, असें असून आतां तुरुंगांत तो काय म्हणून इसापच्या गोष्टींचें कवितांत रूपांतर करीत आहे? त्यानें ऑपोलो देवावर एक स्तोत्रही केले आहे म्हणतात! इव्हेनस मला पुनः भेटला तर तो पुनः मला असेंच विचारील—तर आपली इच्छा असल्यास मी त्याला काय सांगावें तें मला कळवा.

सॉक्रेटिस म्हणाला, थीब्स तुला तो भेटला तर त्याला सांग कीं, त्याच्याशी स्पर्धा करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं; व

त्याच्याशी स्पर्धा करणें कांहीं सोपें नाहीं. इसापच्या गोष्टीवर कविता करण्यांत माझा हेतु येवढाच कीं, मला निरनिराळ्या वेळीं एकाच अर्थाचें स्वप्न पडे, व त्यांत मला संगीतरचना करण्याबद्दल आज्ञा होत असे. मला असे वाटें कीं, तत्त्वज्ञान हेंच सर्व श्रेष्ठ संगीत होय व त्याची रचना तर मी नित्य करीतच आहे. ज्याप्रमाणें एखाद्या शर्यतीच्या वेळीं प्रेक्षक लोक आधीच धावत असणाऱ्या मनुष्याला अधिक जोरानें धावण्यास प्रोत्साहन देतात, त्याप्रमाणेंच मला ही आज्ञा होत आहे, असा मी अर्थ केला. परंतु मला याबद्दल असा संशय होता कीं, या आज्ञेंत संगीत शब्द रूढअर्थींच तर वापरला नसेल ना? या संशयामुळें येणाऱ्या अस्वस्थतेंतून सुटण्यासाठीं सूर्यदेवाच्या सणामुळें मला मिळालेल्या फुरसतीचा मी फायदा घेतला. प्रथमतः त्या देवावरच मी एक स्तोत्र रचलें. परंतु कवीचें काम म्हणजे केवळ शब्दरचना करावयाचें नसून कांहीं तरी गोष्ट किंवा कथा जुळविण्याचेंही आहे. मला तर कांहीं गोष्ट जुळवितां येतच नाहीं तेव्हां आयत्या इसापच्या गोष्टी घेऊन मी त्यांवरच कविता करण्यांस आरंभ केला. सीब्स, ही हकीगत इव्हेनसला सांग, आणि त्याला म्हणावें, कीं तूं शहाणा असशील तर माझ्या मागून ये. मला तर आज गेलेंच पाहिजे, असा अथीनियन लोकांचा हुकुमच झाला आहे. सिमीयसची व इव्हेनसची चांगली ओळख होती; व त्यावरून त्यानें कळविलें कीं, इव्हेनसला हा सॉक्रेटिसचा उपदेश मुळीच रुचणार नाहीं. सॉक्रेटिसचा त्यावर असा प्रश्न आहे कीं, इव्हेनस हा तत्त्वज्ञानी आहे नां, मग त्यानें मरणाला कां भ्यावें.

यावरून अमरत्वाचा प्रश्न निघाला, व त्यावर विस्तृत चर्चा झाली. या संवादांतील मतांचें दिग्दर्शन मागील एका प्रकरणीं करण्यांत आलेंच आहे. सध्यां त्या मतांचे पृथक्करण करण्याचा किंवा त्यावरून सुचणाऱ्या इतर साधकबाधक प्रमाणांचा विचार न करतां आम्हास येवढेंच सुचवा-वयाचें आहे कीं, मरणाच्या दारांत उभ्या असलेल्या सॉक्रेटिसानें हा विषय

चर्चेला घेऊन त्याचें इतके समत्वबुद्धीनें विवेचन करावें हीच गोष्ट मोठी उपदेशक व आश्चर्यकारक आहे. सॉक्रेटिसनें योजलेलीच उपमा येथें योग्य आहे. ज्याप्रमाणें एखादा हंस आपल्या मरणाच्यावेळीं अधिकच सुस्वर गायन करतो त्याप्रमाणें सॉक्रेटिसची ही वर्तणूक होती. ज्यानें आपलें सर्व आयुष्य तत्त्व चिंतनाच्या स्वर्गीय संगीत लहरींत घालविलें त्यानें स्वर्गांत जातां जातां त्याच संगीताची रागपरिवाहिणी लकेर मारीत, विश्वजनानां मोहित करावें यांत काय नवल ? नवल हेंच कीं असे राजहंसप्रकृति पुरुष या जगतांत जन्माला येतात व पृथ्वीपेक्षां श्रेष्ठ भूमींची जणूं साक्षच देतात. या संवादासारखें मोहक वाङ्मयखाद्य क्वचित्‌च मिळावयाचें व याचमुळें सर्व सहृदय लोकांची अंतःकरणें या प्रसंगानें हालवून सोडिलीं आहेत. *

हंसाचें दशदिशांनां मोहित करणारें संगीत चालू असतांच त्याच्या अमृतमधुर आलापांनींही न द्रवणारें मरण त्याला गाठींत असतें व क्षणोक्षणीं त्याचा आवाज अधिक खोल खोल जात असतो. सॉक्रेटिसचें बोलणें असेंच सारखें चालू राहिलें तरी चालेल, म्हणून सर्व श्रोते

* But the picture which the dialogue presents of the temper and state of mind of Socrates during the last hours of his life, is one of immortal beauty and interest, exihiliting his screne and even playful equanimity amidst the uncontrollable emotions of his surrounding friends-the genuine unforced persuasion, governing both his words and his acts, of what he had pronounced before the Dikasts, that the sentence of Death was no calamity to him and the unabated maintenance of that earnest interst in the improvement of man and society, which had for so many years formed both his paramount motive and his active occupation.

Grote: History of Greece.

स्तब्ध झाले होते, पण निर्घृण काळाचा ओघ तसाच चालला होता; व अखेर त्यानें विष प्यावयाची वेळ झाल्याची सूचना केलीच. आपल्या प्रेताला बायकांनीं स्नान घालण्यापेक्षां आपण विषप्राशनापूर्वीच स्नान करावें, असा सॉक्रेटिसचा हेतू होता, म्हणून तो स्नानास जावयासाठीं उठूं लागला. त्यावेळीं क्रिटोनें विचारलें, सॉक्रेटिस, आपल्या मुलाबाळां-विषयीं अगर इतर कांहीं गोष्टींविषयीं आम्हांस कांहीं सूचना करावयाच्या आहेत काय ? सॉक्रेटिसनें म्हटलें कीं, तुम्ही नीटपणें वागलांत म्हणजे त्यांत सर्व आलें.

क्रिटोनें विचारिले, ' आपणास मूठमाती कशी द्यावयाची ? '

सॉक्रेटिस म्हणाला, ' तुम्हाला वाटेल तशी. पण मग मला आधीं पकडून ठेविलें पाहिजे हो ! ' नंतर तो इतर मंडळीकडे वळला, व हंसत हंसत म्हणाला, तुमच्याशीं संभाषण करणारा व आपल्या भाष-णाचीं संगती लावणारा जो ( अतर्वर्ती जीव ) तोच सॉक्रेटिस, अशी मला क्रिटोची समजूत घालतां येत नाहीं. त्याला वाटतें थोड्या वेळानें आप-ल्यापुढें पडणारें प्रेत म्हणजेच सॉक्रेटिस. आणि म्हणून तो मला विचा-रतो कीं, तुम्हाला मूठमाती कशी द्यावी. मी एकदां विष प्यालों म्हणजे पुण्यवंतांच्या आनंदमय लोकीं जाईन असें दाखवून, मीं तुमचें व माझें समाधान करण्याचा यत्न केला, पण क्रिटोवर माझ्या शब्दांचा कांहींच परिणाम झाला नाहीं असें दिसतें. याकरितां आतां तुम्हीं मजसाठीं क्रिटो-प्रमाणेंच जामीन राहिलें पाहिजे. ही जामिनकीची बाब मात्र फार निराळी आहे. क्रिटो मजबद्दल कोर्टांत असा जामीन राहिला होता कीं, सॉक्रेटिस तुरुंगांतून पळून जाणार नाहीं; पण आतां तुम्हीं मजसाठीं क्रिटोला जामिनकी द्या, कीं मी विष प्यायल्यावर खास येथें राहणार नाहीं. याच्या योगानें माझें प्रेत जळतांनां अगर गाडतांनां पाहून त्याला तितकें वाईट वाटणार नाहीं. माझ्या दुर्दैवाकरितां म्हणून क्रिटोनें दुःख करावें किंवा मला त्यानें पुरलें म्हणून म्हणावें, हेंच मला पसंत नाहीं,

असले अपशब्द मोठे वाईट असून ते आत्म्यालाही विटाळतात. याकरितां क्रिटो, आपला शोक आवर व माझ्या केवळ शरीराला पुरावयाचें आहे, असें म्हणून त्याची शिरस्त्याप्रमाणें विल्हेवाट लाव.

इतकें बोलून तो उठला, व स्नान करावयास गेला. त्याची मित्रमंडळी बाहेरच बसली होती, व एखाद्या आसन्नमरण पित्याच्या रुग्णशय्येवर आपल्या भावी पोरकेपणाची हृदयभेदी चित्रें काढतां काढतां म्लानवदन झालेल्या अर्भकांप्रमाणें त्यांचीं तोंडें उतरून गेलीं होतीं. सॉक्रेटिसचें स्नान झाल्यावर त्यानें आपणास भेटावयास आलेल्या मुलांची व घरच्या बायका माणसांची गांठ घेऊन काय निरवानिरव करावयाची ती करून तो पुनः आपल्यामित्रमंडळींत येऊन बसला. आतां जवळजवळ सूर्यास्ताची वेळ झाली होती. थोड्याच वेळानें तुरुंगावरील अधिकारी सॉक्रेटिसकडे आला. आपण सॉक्रेटिसला विष देणार, पण तें हुकमाचे ताबेदार म्हणून देणार. ही कांहीं आपल्या इच्छेची गोष्ट नव्हे; व म्हणूनच त्या कृत्याचा दोषही त्याचा नाहीं. इतर अज्ञ जन विष घेतेवेळीं त्यालाच शिव्या देतात; पण सॉक्रेटिस खास तसें करणार नाहीं, इत्यादि भाषण बोलतां बोलतां तो एकदम मागें वळला व ढळढळा रडूं लागला. हा अधिकारी सॉक्रेटिस तुरुंगांत आल्यापासून त्याच्याशी फार चांगल्या रीतीनें वागत असे; व त्याजकडे नेहमीं येत असे. त्याच्या सध्याच्या वर्तनावरून त्याचा मायाळू स्वभाव चांगलाच दिसत होता. सॉक्रेटिसनें त्याची तारीफ करून त्याच्या सांगण्याप्रमाणें चाकरास विष तयार करण्याची सूचना करण्यास क्रिटोला सांगितलें. क्रिटो म्हणाला, अजून सूर्य पुष्कळ वर आहे, व कित्येक लोक मरण्याचे दिवशीं या काळीं शक्य तितकी चैन करीत असतात व विष पिण्यास शक्य तितका विलंब करतात, हें मीं पाहिलें आहे. मग आतांच येवढी घाई कां ?

सॉक्रेटिस म्हणाला, क्रिटो, ज्यांनां असा विलंब करण्यांत कांहीं फायदा आहे असें वाटत असेल त्यांची गोष्ट निराळी; पण मला त्यांत कांहींच

अर्थ वाटत नाहीं. जें जीवित परकीय झालें तें वाचविण्याची धडपड कशाला ? चल तर उगाच आडकाठी करूं नकोस.

क्रिटोनें त्या चाकराला खूण केली व तो बाहेर गेला आणि थोडया वेळानें विषाचा पेला घेऊन आंत आला. त्यावेळीं त्याजबरोबर तुरुंगावरील अधिकारीही होता. सॉक्रेटिसनें त्याला म्हटलें; गडया, तूं यांतील अगदीं दर्दीच आहेस, तर मला कसकसें करावयाचें तें सांग. तो म्हणाला, कांहीं नाहीं. आपण फक्त पाय जड पडेपर्यंत फिरत रहा, व मग स्वस्थ पडा म्हणजे झालें. आपल्यावर विषाचा परिणाम होईल. इतकें म्हणून त्यानें तो पेला सॉक्रेटिसाकडे केला, व सॉक्रेटिसनें तो अगदीं सहज लीलेनें घेतला. त्यावेळीं त्याच्या चेहेऱ्यावर विषादाची अगर भयाची एक छटा देखील दिसली नाहीं. आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या गडयाकडे अगदीं टक लावून पहात त्यानें विचारलें, कायरे, या विषांतलें थोडें विष देवाच्या नांवानें जमनीवर टाकण्यास हरकत आहे काय ? तो म्हणाला, महाराज, आम्ही फक्त एका माणसास पुरेल येव-ढेंच विष तयार करतों. सॉक्रेटिस म्हणाला, ठीक आहे; तथापि माझा हा परलोकचा प्रवास सुखकर व्हावा म्हणून मी देवाची प्रार्थना केलीच पाहिजे. तथास्तु. इतकें म्हणून सॉक्रेटिसनें तो विषाचा पेला तोंडाला लावला; व मोठया आनंदानें व उत्सुकतेनें त्यांतील विष पिऊन टाकलें.

इतका वेळ त्याच्या मित्रमंडळीनीं पुष्कळ अवसान धरलें होतें; पण तो विष ध्यायला हें पाहून त्यांचा धीर सुटला व त्यांच्या डोळ्यांतून घळघळा अश्रू वाहूं लागले. क्रिटोला आपला दुःखावेग आवरेना म्हणून तो बाहेर निघून गेला. इतका वेळ आपोलोडोरस सारखा स्फुंदतच होता, परंतु आतां तर त्यानें मोठ्यानें किंकाळीच फोडिली. सॉक्रेटिस मात्र अगदीं निर्विकार होता. ती आरोळी ऐकून तो म्हणाला, हें काय ? अशा रीतीनें कांहीं गैरवर्तणूक होऊं नये म्हणून तर मी बायकांमाण-

सांनां, मघाच लाऊन दिलें. मनुष्यानें मरतांनां अगदीं शांत असावें असें मीं ऐकलें आहे, तर शांत व्हा.

हें त्याचें भाषण ऐकून त्याची मित्रमंडळी स्तब्ध झाली. त्याचें फिरणें चाल्लेंच होतें. लवकरच त्याचे पाय जड पडले व तो पूर्वसूचनेप्रमाणें बिछानावर उताणा निजला. त्याला विष देणारा गडी पुनः पुनः त्याचे पाय पाही, व ते चेपून त्याला आपणास कांहीं कळतें काय म्हणून विचारी. हलके हलके पाय व मांड्या बधीर झाल्या. सॉक्रेटिसनें स्वतः त्याचा अनुभव घेतला, व याच क्रमानें अंतःकरणापर्यंत गेलें कीं आटपलें, असें म्हणून त्यानें आपल्या अंगावर पांघरूण घेतलें. त्याच्या नामीपर्यंत बधिरता गेली असेल अशा सुमारास त्यानें आपल्या तोंडावरचें पांघरूण काढलें, व तो क्रिटोला म्हणाला, क्रिटो, एस्क्लॉपियसला एक कोंबडा बळी द्यावयाचा राहिला आहे तेवढा दे. यानंतर सॉक्रेटिस कांहींएक बोलला नाहीं. थोड्याच वेळानें कांहीं बारिक आवाज ऐकूं आला, त्याचें पांघरूण काढून पाहातात तों त्याचे डोळे थिजले होते.

अशा रीतीनें हा पुरुषसूर्य अस्तंगत झाला, व ही दुःखदायक गोष्ट पाहूनच काय ! सूर्यही अस्ताला गेला ! सॉक्रेटिसला सुखरूप आपल्या पुत्राच्या नगरींत पोंचविण्यासाठींही तो गेला असेल, नाहीं कोणी म्हणावें ? तसेंच कांहींतरी असावें. कारण सॉक्रेटिसच्या सुखरुपतेबद्दल त्याची पक्की खात्री नसती तर तो पुनः दुसऱ्या दिवशीं हंसतमुखानें प्राचीच्या मंदिरांत संचार करताना कसा दिसला असता ?



# प्रकरण ७ वें.

## उपसंहार.

ज्या प्रचंड वृक्षाच्या आश्रयानें कित्येक वर्षेंपर्यंत आपण राहिलों, त्यावर आपलीं घरटीं बांधलीं, आपल्या मुलांबाळांचें संगोपन केलें, त्याच वृक्षावर कुऱ्हाडीचे प्राणघातक प्रहार पडूं लागले म्हणजे त्या पक्ष्यांना, त्यांची मर्जी असो वा नसो, तेथून आपलें बिऱ्हाड हालवावेंच लागतें. सॉक्रेटिसाला देहांतशासन झाल्यानंतर त्याच्या आवडत्या शिष्यांची व स्नेही मंडळींची हीच अवस्था झाली. सॉक्रेटिसला शिक्षा झाली येवढ्या-वरच हें प्रकरण न थांबतां, कदाचित् आपणावरही भयंकर प्रसंग येतील, त्याच्या आधींच सावध झालेलें बरें; म्हणून प्लेटो वगैरे मंडळी अथेन्स शहर सोडून मैगारा संस्थानांत गेली व तेथें युक्लीडच्या घरीं राहिली. युरोपायडिस हा नाटककार मात्र अथेन्समध्येंच राहिला, व त्यानें एका करुणरसप्रधान नाटकामध्यें पालामिदीन या नांवाखालीं सॉक्रेटिसची भूमिका रंगविली, व अथीनियन लोकांची कानउघाडणी केली, असें कांहीं लेखकांचें म्हणणें आहे. कित्येकांच्या मतें युरिपायडिस हा सॉक्रे-टिसाच्याही आधींच मरण पावला असल्यामुळें ही गोष्ट शक्य नाहीं. ही वादभूत गोष्ट सोडून दिली तरी, एकंदरींत सॉक्रेटिसच्या अनुयायांना त्याच्या मरणानंतर बरीच वर्षें हालअपेष्टेंत काढावीं लागलीं हें खरें आहे.

कित्येक लेखकांचें असें म्हणणें आहे कीं, सॉक्रेटिसला शिक्षा झाल्यावर कित्येक दिवसांनीं अथेन्समधील लोकांनां फार पश्चात्ताप

झाला. सॉक्रेटिसाचें न्यायानुवर्तित्व, लोकहितविषयक तत्परता, निःस्वार्थिपणा, उपदेशांतील अखंडता, हीं ध्यानांत येऊन त्यांना फार वाईट वाटलें. त्याजवर आरोप करणारांनां कोर्टांतून बोलावणें आलें व मिलिटसला देहांत शासनाची व दुसऱ्यांस हद्दपारीची शिक्षा झाली. प्लुटार्क लिहितो कीं, सॉक्रेटिसच्या मरणाला जे जे कोणी साक्षात् या परंपरेनें कारण झाले होते, त्यांचा अथीनियन लोक अगदीं विटाळ मानूं लागले, व या समाजबाह्यत्वामुळें ते इतके त्रासले कीं, त्यांनीं आत्महत्या केली. अथीनियन लोकांनीं सॉक्रेटिसच्या शत्रूंचें पारिपत्य केलें येवढेंच नाहीं, तर त्याची एक मूर्ति तयार करून ती एका प्रसिद्ध ठिकाणीं ठेवण्यांत आली, व त्याला हळूहळू देवाप्रमाणें मान मिळूं लागला.

ही गोष्ट ग्रोट वगैरे इतिहासकार खरी मानीत नाहींत. सॉक्रेटिसच्या निधनानंतर सहा वर्षांनीं झेनोफननें आपल्या गुरुच्या समर्थनार्थ मेमोरॅबिलिया किंवा आठवणी, हा ग्रंथ लिहिला, त्यावरून सॉक्रेटिबद्दलचे अथीनियन लोकांचे दुर्ग्रह त्यावेळेपर्यंत मुळींच कमी झाले नव्हते हें उघड आहे. फार काय, पण या नंतर सरासरी पन्नास वर्षांनीं देखील एसचीनस या वक्त्यानें आपल्या भाषणांत असें म्हटलें आहे कीं, सॉक्रेटिस हा सोफिस्ट असल्यामुळें त्याला ठार मारण्यांत आलें. यावरून सॉक्रेटिसबद्दलचा अथीनियन लोकांचा दुर्ग्रह फार वेळपर्यंत टिकला, असेंच म्हटलें पाहिजे. सॉक्रेटिसचा पट्टशिष्य म्हणून नांवाजलेला प्लेटो आपल्या गुरूच्या मरणानंतर दहा वर्षेपर्यंत बाहेर भटकत होता, व नंतर परत अथेन्सला आला, यावरूनही वरील अनुमानालाच अधिक बळकटी येते. सरतेशेवटीं सॉक्रेटिसच्या विचारांचें पुनः अथेन्स मध्यें आरोहण झालें, येवढेंच नव्हे तर ' उत्खात प्रतिरोपित ' कलमाप्रमाणें तें बहुफळ झालें, ही गोष्ट निराळी. सॉक्रेटिसच्या उदात्त मरण प्रसंगानेंच त्याच्या तत्त्वज्ञानाचा अखेर जय झाला. मानवी मनाचा मोठे-

पणा व तत्त्वज्ञानाचा प्रभाव, श्रद्धेचा विश्वास व अंतःकरणाचा उल्हास, यांचें तें आकृत्रिम संघट्टन होतें. ज्या प्रसंगानें आज आपलीं अंतःकरणें इतकीं थरथरतात त्या प्रसंगाबद्दल सॉक्रेटिसच्या शिष्यांनां काय वाटत असेल ! आपल्या गुरूविषयीची त्यांची श्रद्धा, त्यांचें अनुकरण करण्याची तीव्र इच्छा, व त्याच्या उपदेशावरील विश्वास, हा या प्रसंगानें द्विगुणित झाला असेल. सॉक्रेटिसनें आपल्या मरणानें कांहीं नवीन तत्त्व शिकविलें नाहीं हें खरें, पण त्याचा परिणाम मात्र सुकर केला, व आधींच बीजारोपण झालेल्या शेताचा फलसमृद्धिकाळ जवळ आणला. या पिकाची हकीगत म्हणजेच प्लेटो, ॲरिस्टॉटल व सॉक्रेटिक पंथ यांचा इतिहास होय, व तो यापुढील ग्रंथांचा विषय आहे.

खरा श्रेष्ठ पुरुष कोण, याविषयीं लिहितांनां साधुवर्य तुकाराम म्हणतात, ‘ हिरा ठेवितां ऐरणी । वाचे फोडितां जो घणीं ।। तोचि मोल पावे खरा । ऐराणीचा होय चूरा ।।’ संतश्रेष्ठ तुकारामाचें हें वचन सॉक्रेटिसला पूर्ण लागू आहे. सॉक्रेटिसचे झालेले हाल व सरतेशेवटीं त्याच्या मरणोत्तर त्याच्या मतांनां मिळालेला मान, या दोन्ही गोष्टी लक्षांत घेऊन आपल्याकडील अनेक संतांच्या चरित्राची आठवण होते. जगतावर उपकार करण्यासाठीं आलेल्या संतांचा जगाकडून पहिल्या प्रथम छळ व्हावयाचाच हा सार्वत्रिक नियमच दिसतो. आमचे कडील संतांनां त्यांच्या जिवंतपणींच मान्यत्व मिळालें व सॉक्रेटिसला तें मरणोत्तर मिळालें. आमच्या कडील संतचरित्रांत, विष प्राशनादिकासारख्या प्रसंगानंतरही त्यांची शरीरें परमेश्वर भक्तीच्या सामर्थ्यानें दृढ राहिलीं, सॉक्रेटिसनें तशी कधीं इच्छाच केली नाहीं, इत्यादिक भेद हे फार गौण आहेत. एकंदरींत सॉक्रेटिस ही विभूती कोणत्याही देशाला भूषणभूत होण्यासारखीच आहे.

खुद युरोपखंडाच्याच इतिहासाकडे पाहिलें तर सॉक्रेटिसला देवदूत ख्रिस्ताचा पूर्वगामी म्हणण्याची वहिवाट आहे. या दोन चरित्रांमध्येंही असेंच महत्त्वाचें व मनोरंजक साम्य आहे. दोघेही आपल्या देशबांधवांकरितां झटले, दोघांचाही आपल्या काळीं प्रचलित असलेल्या कल्पनांपैकीं चांगल्या अंशावर दृढ विश्वास होता, व त्याच अंशाला त्यांनीं प्राधान्य दिलें. पण दोन्ही प्रसंगींही त्यांच्या विरुद्ध काहूर माजविण्यांत आलें, व दोघांनींही आपल्या परमेश्वरीय संदेशाची पूर्तता, मरण पत्करूनच केली. देवदूत ख्रिस्ताचें शरीर पुनः सचेतन झालें असा भाविक लोकांचा समज आहे. सॉक्रेटिसबद्दल तशी कांहीं कल्पना नाहीं; परंतु प्लेटो, ॲरिस्टॉटल यांच्या काळीं त्याच्या तत्त्वविचारांचा जो उत्कर्ष झाला, तेंच त्याचें खरें व अधिक महत्त्वाचें पुनरुत्थान होय.



## श्रीसयाजी साहित्यमालेंतून प्रसिद्ध झालेले

# मराठी ग्रंथ

| ग्रंथांचें नांव | किंमत रु. आ. पै. |
|---|---|
| १ संस्कृत वाङ्मयाचा इतिहास–ले. सी. वा. पेंडसे, बी. ए. | २–८–० |
| २ बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण–ले. वा. गो. आपटे, बी. ए. | ०–८–० |
| ३ सुधारणा आणि प्रगति–ले. दा. ना. आपटे, बी. ए.एलएल.बी. | ३–०–० |
| ४ शिस्त–जनरल नानासाहेब शिंदे व मेजर के. एन. सावंत | १–०–० |
| ५ दीघनीकाय–भाग १ ला–ले. चिं. वी. राजवाडे, एम. ए. बी. एस. सी. ... ... ... ... ... | १–८–० |
| ६ हिंदुस्थानचा लष्करी इतिहास व दोस्तराष्ट्रांच्या फौजा–ले. जनरल नानासाहेब शिंदे ... ... ... | २–८–० |
| ७ महाराजा शिवाजी–ले. सी. वा. पेंडसे, बी. ए... ... | १–६–० |
| ८ हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास–मराठी रियासत–मध्यविभाग–ले. गो. स. सरदेसाई, बी. ए. ... ... | २-१२-० |
| ९ सदर–मध्यविभाग–भाग २ रा–सदर... ... ... | ३–०–० |
| १० सदर–मध्यविभाग–पानिपत प्रकरण–सदर ... ... | २–४–० |
| ११ जबाबदार राज्यपद्धति–ले. म. रा. भिडे, एम. ए. ... | ०-१३-६ |
| १२ मिराबाई–ले. दाजी नागेश आपटे, बी, ए., एलएल. बी. | ०-१५-० |
| १३ इंग्रजी शिष्टाचार–ले. चिं. वि. जोशी, एम्. ए.... ... | ०-१४-० |
| १४ पार्लमेंट–ले. दा. ना. आपटे, बी. ए., एलएल. बी. ... | १–८–० |
| १५ सनई वादन पाठशाळा–ले. ग. पि. वसईकर, पुस्तक १ लें– | ०-१२-० |
| १६ ,, सदर ,, पु. २ रें. ... | ०–८–० |
| १७ ,, सदर ,, पु. ३ रें. ... | १–२–० |
| १८ ,, सदर ,, पु. ४ थें. ... | १-१२-० |
| १९ सगुणोपासना व मूर्तिपूजा-ले. शि. म. फडके ... ... | १–८–० |
| २० नागरिकांचीं कर्तव्यें–ले. कृ. गं. गोगटे, बी, ए,... ... | ०-१४-० |
| २१ सजीव सृष्टीची उत्क्रांति–स. ना. दातार, एम. ए., बी. एस. सी. | २-११-० |
| २१ (अ) पाश्चात्य-तत्त्वज्ञान–ले. द. गो. केतकर, एम. ए. ... | १-१२-० |

## श्रीसयाजी बाल-ज्ञानमाला